(युनिव्हर्सिटीनें मॅट्रिक्साठीं पूर्वी बऱ्याच वेळां पाठ्य पुस्तक म्हणून नेमलेलें पुस्तक)

# 'निवृत्तिविनोद'

लेखक

अतिसुखशंकर कमलाशंकर त्रिवेदी, एम्. ए., एल्एल्. बी.,
प्रोफेसर नैतिक व मानसिक तत्त्वज्ञान बडोदा कॉलेज,

फेलो, मुंबई ॲकॅडेमिक कौन्सिलचे व पोस्ट ग्रॅज्युएट बोर्डचे सभासद, मुंबई व इतर युनिव्हर्सिटींतले परीक्षक.

सन १९३४



किंमत १-८-०

# प्रस्तावना

हें लहानसें पुस्तक वाचकांना अर्पण करण्यांत मला आनंद होत आहे; कारण माझ्या शुद्ध आनंदाचे हें एक स्वरूप होय; यांत ज्ञान नाहीं, पण भावना आहेत. तर्कसिद्ध युक्तिवाद नाहीं, पण जशा असतलि तशा माझ्या भावनांचें आविष्करण आहे. ज्याला मी आवडत असेन, त्याला हें पुस्तकाहि आवडेल. ज्याला हें पुस्तक आवडेल, त्याला मींहि आवडेन.

या पुस्तकाच्या सहवासांत वाचकांना कांहीं शांति, कांहीं विनोद, कांहीं रसिकता, याचा अनुभव येईल अशी आशा आहे. विशेष कांहीं न लिहितां, प्रियवाचक, तुम्हांला पुढें चलण्याविषयीं विनंती करतो.

—अ. क. त्रिवेदी

## PREFACE TO THE MARATHI EDITION

While placing this Marathi version of my *Nivṛtti Vinoda* before the Marathi knowing public, I must offer my hearty thanks to my friend and colleague Professor V. P. Dandekar, who willingly undertook to translate the book as a labour of love. Indeed Professor Dandekar has put me under a debt of deep obligation. But for his real love of literature and exceptional regard for me his kindness would have been impossible.

BARODA, *19–6–34*.

A. K. TRIVEDI

# अनुक्रमणिका

# निवृत्तिविनोद

## १

## जुनें आणि नवें

जुनें म्हणजे काय? जुन्या काळांत, भूतकाळांत होऊन गेलेलें कीं, भूतकाळापासून वर्तमानकाळापर्यंत चालत आलेलें? या दोन अर्थांच्या गुंतागुंतीमुळें जुन्याचे पक्षकार नव्याच्या पक्षकारांबरोबर लढत आले आहेत. इतके कीं, "जुनें आणि नवें" हा विषयहि प्रत्येक देशांत पाहिजे तेवढा जुना झाला आहे.

दुरून डोंगर साजरे. याच न्यायानें आपल्या काळापासून दूरच्या काळांत होऊन गेलेल्या आचारविचाराच्या पद्धती आणि धार्मिक, सामाजिक, व नैतिक संस्था—हें सर्व आपणाला मोहक वाटतें. आपण विधवाविवाहाच्या विरुद्ध असतों. कां? जुन्या वेळीं तसें होतें म्हणून. आपण ज्ञातिसंस्थांना घट्ट बिलगून राहतों. कां? जुन्या वेळीं तसें होतें असें आपण मानतों म्हणून. आपण फाजील स्त्रीस्वातंत्र्याच्या विरुद्ध असतों. कां? जुन्या काळीं तसें होतें म्हणून. आपण स्त्रियांच्या उच्च शिक्षणाचे विरोधी बनतों. कां? जुन्या काळीं तसें शिक्षण नव्हतें म्हणून. अशा रीतीनें पूर्वीं जें जें होतें तें तें फक्त पूर्वीं होतें म्हणून आपणास स्वीकार्य वाटतें. खुशाल वाटो! मी म्हणतों खुशाल वाटो. तें स्वीकार्य वाटण्यानें आपलें फारसें

विघडत नाहीं. स्वीकार करणें हें अनर्थकारक नाहीं, पण त्याच्याबरोबर त्याचें करण्यांत येणारें **समर्थन** हें अनर्थकारक असतें. या समर्थनापासून अनिष्ट उत्पन्न होतें. हें समर्थन भयंकर होय. आणि हे समर्थन फक्त अशाच रीतीचें असतें कीं "जुनें तेवढे चांगलें," "आपले पूर्वज काय मूर्ख होते?"

दुर्दैवाची गोष्ट ही कीं पूर्वी होऊन गेलेले लोक आपले पूर्वज होते. म्हणजे जुन्याला मान न देण्यांत आपण आपल्या पूर्वजांना मान देत नाहीं असा अर्थ करण्यांत येतो. वस्तुस्थिति अशी आहे कीं जुन्यावर कोणाचें प्रेम नसतें. फक्त स्वतःच्या पूर्वजांवरच सर्वांचें प्रेम असतें. जुन्याची पूजा ही खरोखरच जुन्याची पूजा नसते, पण पूर्वजांची असते. दुसऱ्या देशांतील जुने आचारविचार किंवा संस्था यांवर कोणाचें प्रेम नसते. येथील जुन्याचा पुढारी इंग्लंडांतील किंवा फ्रान्समधील जुने आचारविचार व संस्था यांना चाहील काय? कदापि नाहीं. आपल्या देशांतील जुने आचारविचार व संस्था यांच्याशी त्यांचा विरोध होत असतांना त्यांचा स्वीकार तर तो करणारच नाहीं, पण त्यांच्याकडे दुर्लक्ष करील. इतकेंच नाहीं तर त्याच्याहि पुढें जाऊन त्यांना 'जंगली' 'अशिष्ट' 'अशिक्षित' अशा शब्दांनीं धिःकारील. 'सर्व देशांत' जुन्याचा पुढाकार घेणाऱ्यांची हीच वृत्ति असते. जुन्यावर प्रेम करणारे, स्वतःच्या पूर्वजांवर प्रेम करतात आणि म्हणतात, मात्र असें का, 'आम्ही जुन्यावर प्रेम करितों.'

समजा कीं एका देशांतील लोक दुसऱ्या देशांत जाऊन वसताहेत, एखादा देश जिंकल्यानंतर पुष्कळ वेळां असें होतें.

मूळ राहाणाऱ्यांच्या जुन्या आचारविचारांकडे जरा देखील प्रेमाच्या दृष्टीनें ते बघतील का ! कदापि नाहीं. तिथें देखील ते आपल्या देशांतील जुन्यालाच चिकटून राहतील. जुन्यावर प्रेम करणें म्हणजे पूर्वजांवर प्रेम करणे. याखेरीज दुसरा कांहींहि अर्थ नाहीं.

पण आपल्या पूर्वजांबद्दल आपल्या मनांत आदरभाव असतो, याचें कारण काय ? हा भाव कांहीं जसा तसा नसतो. तो एक-प्रकारच्या धार्मिक भावनेंत परिवर्तन पावतो आाण, पूर्वजपूज , हें धर्माचें एक महत्वाचें स्वरूप मोजण्यांत येतें. पण धर्माची भावना असली म्हणून तरी काय? त्याचा थोडा हेतू तरी बुद्धिगम्य असायला हवा. पूर्वजांबद्दल आदर असण्याचें हेंच कारण असूं शकेल कीं, पूर्वज म्हणजे आपलें " पूर्वीचे शहाणे वडील," असा रूढार्थ तयार झालेला असतो. "आपले पूर्वज मूर्ख होते" अशा वाक्याचा उच्चार झाल्यास कटुता उत्पन्न होण्याचाच प्रसंग यावयाचा. "पूर्वज" आणि " शहाणे " हे दोन जणूं काय लोकांच्या मतें एकच आहेत. पण याचें देखील कारण असलें पाहिजे. याचें कारण हें आहे कीं, ज्या प्रमाणे आपल्या कुटुंबांत आपल्यापेक्षां वडील असलेल्यांना आपण शहाणे समजतो, कां कीं ते वयोवृद्ध असतात, त्याचप्रमाणें आपले पूर्वजदेखील अनुभववृद्ध असणारच, असें मानण्यांत येते व त्यांच्याबद्दल पूज्यबुद्धि म्हणजे दुसरें कांहीं नसून अनुभवसिद्ध वस्तूंबद्दल आपली आदरबुद्धि हें होय.

आतां प्रश्न असा उत्पन्न होतो कीं, जर असेंच असेल तर जुन्याची केवळ जुनें म्हणून पूजा कशाला हवी ? " जुन्या काळीं होऊन गेलेलें " म्हणून त्याची पूजा करणें केवळ हास्यास्पद होय.

त्याचें समर्थन जर अनुभवाच्या आधारावर आहे तर जुन्या-बद्दलच प्रेम म्हणजे " जुनें झालेलें, भूतकाळापासून वर्तमानकाळा-पर्यंत टिकलेले, अनुभवसिद्ध व अनुभवांत जुनें, याबद्दलचे प्रेम होय असेच खरोखर म्हणतां येईल. अशा रीतीनें पाहातां जुनें म्हणजे काय ? जुन्या काळीं होऊन गेलेंलें कीं नव्या काळांतील असेल तें ? प्राचीन काळापेक्षां अर्वाचीन काळ अधिक जुना आहे. अनुभवांत अधिक सरस आहे, कारण आपणाला इतिहासाची मदत होते. भूतकाळांत जें जें होऊन गेललें असतें तें सर्व वर्त-मानकाळापर्यंत येतें आणि त्यामुळें वर्तमानकाळाला अनुभवाच्या गोष्टी भूतकाळापेक्षां अधिकच माहीत असतात. भूत नाहीं पण वर्तमानकाळच अनुभवांत पुढे गेलेला आहे, जुनें नाहीं पण नवेंच अनुभवांत वाढलेलें आहे; आणि " जुनें " या शब्दाचा अर्थ "टिकून राहिलेले", असा घेतला तर, जुन्यापेक्षां नव्यांतच अधिक जुनेंपणा आहे, हें उघड आहे. नवें हेंच जुनें आहे. तुलनेच्या दृष्टीनें जुनें तर नवें आहे. जर " जुनें " म्हणजे " अनु-भवानें भरलेलें ", ' टिकलेलें ', ' अधिक ज्ञानसंपन्न ' असा अर्थ असेल आणि अशा अर्थामुळें आपलें त्याच्यावर प्रेम असेल — खरोखर असेच असायला पाहिजे – तर आपण जुन्याचें नव्हें पण नव्याचेंच पूजक बनायला हवें.

बदल हा सृष्टीचा अगत्याचा नियम आहे. जिथें बदल नाहीं तिथें जीवन नाहीं; स्थिरता म्हणजे मृत्यु. प्रत्येक काळ मनुष्या-करितां नवीन परिस्थिति निर्माण करितो, आणि त्याला अनुकूल असे आचारविचार करण्यांतच बुद्धीची उत्कृष्टता सामावलेली

असते. जुन्याला चिकटलें राहून आपलें जीवन बदलत्या परिस्थितीला अनुकूल न बनविणें ही मोठ्यांत मोठी चूक होय. आणि तिचा परिणाम म्हणून व्यक्ति व समाज जीवंत मृत्यूची दुःखद अवस्था भोगीत आहेत.

—: :—

२

# सत्य

सत्य निसर्ग आहे, निसर्ग सत्य आहे. असत्य निसर्गाचें उल्लंघन आहे. सत्य सांगणारा निसर्गाला अनुसरतो. कृत्रिमतेनें निसर्गाचा भंग झाल्यानें असत्याचा अविर्भाव होतो, निसर्गच सत्याचें स्वरूप आहे. निसर्गाचे नियम सत्याचा विकास करितात.

सत्य नैसर्गिक आहे. म्हणूनच सत्य सरळ, सोपें सुगम आहे. निसर्गाच्या विरुद्ध जाणें वाईट आहे. पडणें सोपें असतं, चढणें अवघड आहे. डोंगरावर चढणें किती कठीण असतें ? निसर्ग एक आहे, अन्य निसर्गाच्या विरुद्ध आहे.

पण जगांत सत्य सोपें वाटत नाहीं. असत्य सोपें वाटतें. सत्य शत्रू उत्पन्न करतें. सत्याच्या ठिकाणीं कडुपणा असतो. सत्य महाग असतें. सत्य असभ्यहि समजलें जातें. असत्य मित्र निर्माण करतें असत्य गोडी उत्पन्न करतें. असत्य स्वस्त असतें. असत्य सभ्य आहे. हें काय खरें आहे. ? दिसायला खरें आहे. सत्याला शत्रू असनात. पण ते भित्रे असतात. सत्याला ते भितात. सत्य त्यांना

भीत नाहीं. सत्य शक्ति आहे. असत्य अशक्त आहे. सत्य त्यांना भीत नाहीं, सत्य ईश्वर आहे, असत्य सैतान आहे. असत्य थैमान घालतें, पण विशेष काय करूं शकणार ? असत्य सत्याला त्रास देतें, पण त्यामुळें सत्याचें बळ कांहीं कमी होत नाहीं. सत्यांत कडूपणा आहे, पण सत्य कडू नाहीं. क्किनाईनमध्यें कडूपणा आहे, पण तें कडू नाहीं. कोण म्हणेल कीं क्वीनईन कडू आहे ? कडू आहे तर पैसे खर्चून तुम्हीं तें कां विकत घेतां ? तें तुम्हांला फार गोड वाटतें म्हणूनच. तुम्हीं त्याच्या कडूपणाकडे लक्ष न देतां तें घेतां. सडलेला अवयव शस्त्रप्रयोगानें दूर करणारा डॉक्टर कडूपणा वापरतो, पण कसा गोड वाटतो ! तसें नसेल तर काय दुःख विकत घेण्याकारितां तुम्हीं त्याला पैसे देतां ? वस्तु स्वतः तिच्या दिसणाऱ्या गुणांपेक्षां निराळी असतें. त्याचे हे दृष्टांत. सत्यांत कडूपणा आहे, पण सत्य कडू नाहीं. सत्य महाग आहे. कबूल. तें पण त्याच रीतीनें. किती व्यापारी ऐपतीचा कर बरोबर भरतात ? किती कारखानें नियमाप्रमाणें चालतात ? किती प्रवासी शहरांत जातांना कर देतात ? असें कां ? तें सर्व महाग पडतें. असत्य स्वस्त आहे, सत्य महाग आहे. तरी पण असत्य पकडलें गेलें तर तें किती महाग निघतें ! शिक्षा भोगावी लागते व असत्य पकडलें जाऊं नये म्हणून खास प्रयत्न करावे लागतात, खोट्या हिशोबाच्या वह्या, लांच, लपवाछपवी वगैरे प्रयत्न करण्यांत शक्ति वापरावी लागते ही शक्ति जर मोजण्यांत आली, आणि असत्य सुरू ठेवणाऱ्याच्या मनःस्थितीचा जर विचार करण्यांत आला तर असत्य स्वस्त आहे असें क्वचितूच कोणी म्हणेल. द्रव्य आणि

शक्ति या दोन वस्तूंची तुलना कशी करणार? या प्रश्नाचें उत्तर हें कीं, द्रव्य हें शक्तीचें एक स्वरूपच आहे. ज्या कामांत शक्ति ज्यास्त लागते तें महाग व कमी लागते तें स्वस्त. असत्यांत शक्ति ज्यास्त खर्ची पडते, सत्यांत कमी. सत्य असभ्य आहे? आहे. पण सत्याचा असभ्यपणा आचारांत असतो; हृदयांत नाहीं. असत्याची यापेक्षां उलटच स्थिति असते. खरें पाहातां लाभाच्या दृष्टीनें सत्यच पसंत करण्याजोगें असतें.

सत्य कां बोलावें? सत्य निसर्गाचे स्वरूप आहे, सत्य ईश्वराचे स्वरूप आहे म्हणून चोर चोरी केल्याचें नाहीं म्हणत असतांना निसर्गाला खोटें ठरवीत असतो; झालेलें, नाहीं झालें असें म्हणतो. सृष्टींत कोठेंहि निसर्गाचा भंग झालेला निसर्ग सहन करीत नाहीं. शिक्षा करतेंच; तर काय येथें अपवाद होईल? कधींहि होणार नाहीं. खाणेंपिणें, झोंप घेणें व फिरणेंबिरणें—हें सर्व नैसर्गिकपणें तुम्हांला आवश्यक आहे. अनियमितपणें तें करा. परिणाम म्हणून तुम्हांला आजारी पडावें लागेल. रात्रीमागून दिवस व दिवसामागून रात्र हा क्रम सुरू आहे. समजा, पृथ्वी कांहीं वेळ विश्रांति घेत आहे, किंवा सूर्य थंड पडला आहे: परिणाम किती भयंकर होईल याची कल्पना करतां येईलच. निसर्गाचा भंग झाल्यास त्याचा इलाज निसर्गच आहे—निसर्गाचा दुसरा एखादा नियम. निसर्गाला काय म्हणून खोटें ठरवावयाचें? शिवाय सामाजिक जीवन कित्येक नियमांच्या आधारानेंच शक्य आहे; हे नियम शब्दांत किंवा कागदावर नोंदलेले नियम नाहींत, पण हृदयानें मानलेल्या नियम आहेत. मी सत्य दिलें नाहीं

तर मला मिळणार कसें ? माझा त्याच्यावर काय अधिकार ? मी असत्य बोलेन तर असत्याचीच मला दुसरीकडून आशा बाळगावी लागेल. असत्याची वस्तुस्थिति काय आहे ? असत्य बोलणारा मनुष्य दुनियेकडून असत्याची अपेक्षा करीत नाहीं. चोरी करणारा दुसऱ्यांनीं त्याच्या द्रव्याला मान देऊं नये, असें इच्छित नाहीं. हा विरोध आहे, आणि विरोध म्हणजेच अनीति. सत्याचा नियम ठरवितां येईल, असत्याचा ठरवितां येणार नाहीं; कारण तसा ठरविण्यांत त्याला विरोध नडेल, आणि जो नियम नाहीं ती नीति नाहीं.

सत्याचे उपासक सत्यालाच मात्र चाहतात. कित्येक आईबाप, आप्तजन, इष्टमित्र किंवा राज्याच्या अधिकाऱ्यांचा भीतीनें सत्य बोलतात. कित्येक त्यांना संतोषविण्याकरितां व कित्येक त्यांच्या खुशामतीकरितां बोलतात. कित्येक मात्र सत्य संवयीनेंच बोलतात. कित्येकांना सत्याची आवड उत्पन्न झालेली असते. कित्येक सत्यवक्ता म्हणून नांवलौकिक मिळविण्याकरितां किंवा टिकविण्याकरितां सत्य बोलतात. थोडे फार दूर हे सर्व अजून सत्याच्या उंबऱ्यावर आहेत. सत्याच्या दिव्य मंदिरांत सत्याला सत्य म्हणून चाहणाराच प्रवेश करितो. असा मनुष्य नेहमीं व कोणत्याहि परिस्थितींत सत्याचें पालन करूं शकतो. सत्य लाभ देवो किंवा हानि करो, प्रसंग पडो वा न पडो, मान देवो किंवा अपमान देववो, सरल असो किंवा बिकट असो,—या गोष्टी त्याच्या मनांत नसतातच. शेवटीं द्रव्य, प्रीति, मान वगैरे गोष्टी सत्याची खुशामत करूं लागतात. सत्याचा त्यांच्यावर आधार नाहीं, त्यांचा सत्यावर आहे.

सत्याचा उपासक फक्त सत्याचीच चाड बाळगतो. तो स्वतः निसर्ग असतो म्हणून निसर्गाचें एक अंग अशा सत्याला तो चाहतो. जर लाभ किंवा प्रीतीची आशा तो ठेवीत असला तर फक्त त्याचा कर्ता, परमेश्वराच्याच प्रीतीची आशा ठेवतो. त्याच्याच प्रीतिकरितां त्याचें सत्य असतें.

असा मनुष्य दुनियेला पण प्रिय असलाच पाहिजे. दुनिया अजून सुधारत आहे—ईश्वराकडे ती जात आहे. सैतानी अंश तिच्यांत आहेत. म्हणून प्रगट रीतीनें किंवा परिचित अवस्थेंत सत्य कदाचित् दुनियेंत अप्रिय पण होतें. तरी पण शेवटीं तें प्रिय झालेंच पाहिजे, तें प्रिय आहेच या श्रद्धेच्या आधारावर आपलें जीवन अवलंबून आहे.

---

३

# प्रेम

प्रेम जीवन आहे. जीवन प्रेम आहे. जीवन कलह आहे असें विज्ञान शिकवितें. सृष्टींत जीव जीवाला मारतो आणि अशा प्रकारें सृष्टीचा निर्वाह होतो. मनुष्याच्या शरीरांतहि अनेक जंतु एकमेकांचें भक्षण करीत असतात. निसर्गांत पशुपक्षी एकमेकांचा संहार करतात. संसारांत बलिष्ठ निर्बलाला चिरडून आपला निर्वाह करतो. व्यापारांत कलह आहे, व्यवहारांत कलह आहे, जीवनांत कलह आहे, जीवन कलह आहे—असें विज्ञानवादी म्हणतात. मी

म्हणतों जीवन प्रेम आहे व प्रेम जीवन आहे. जर जीवन कलह आहे तर त्या कलहाचा टिकाव पण प्रेमच करते. प्रेमावांचून कलहाचें जीवन नाहीं. हें खरें कीं जीवमात्र दुसऱ्या जीवाचा संहार स्वार्थाकरितां करतो. पण स्वार्थहि एकप्रकारचें प्रेमच नाहीं का ? अर्थात् तें प्रेम हलक्या जातीचें असतें. तरी पण तें प्रेमच. प्रेम आहे म्हणूनच त्याचा टिकाव लागतो.

आयुष्याची कोणती बाब प्रेमावांचून शक्य आहे ? आणि यदाकदाचित् शक्य असली म्हणून काय ? प्रेमाच्या पवित्र पोषणावांचून कर्तव्याचा शुष्क वृक्ष एक तर सुकून जाईल नाहींतर खुरटून जाईल. प्रेमानें केलेलें कर्तव्यच खरें कर्तव्य होय. कित्येकांचे असें म्हणणें आहे की, कर्तव्य मात्र कर्तव्याच्याच बुद्धीनें करावयाला हवें; कळकळ किंवा प्रेमाच्या भावनेनें तें करण्यांत आलें तर तेवढ्या मानानें तें रोगिष्ट समजावें. आजाऱ्याची प्रेमपूर्वक सेवा करणारा मनुष्य व शुष्क कर्तव्यबुद्धीनें सेवा करणारा मनुष्य या दोघांत दुसराच आजाऱ्याच्या दृष्टीनें उच्चतर आदर्श साध्य करतो. समजा कीं पाहवलाहि आवडणार नाहीं अशी आजाऱ्याची स्थिति असून, कोणी त्याची केवळ कर्तव्यबुद्धीनें सेवा करीत आहे. आणि असेंहि समजा कीं अशा आजाऱ्याची कोणी प्रेमानें सेवा करीत आहे. या दोघांत श्रेष्ठ कोण ? पहिला कदाचित् बिकट काम करीत असेल, तरी पण दुसराच उच्चतर आदर्श साध्य करितो. जिथें प्रेम आहे तिथेंच उच्चतर कर्तव्य होणें संभवनीय आहे, आणि तिथेंच कर्तव्यबुद्धि दीर्घकालपर्यंत टिकून राहणें संभवनीय आहे. प्रेमावांचूनची कर्तव्यबुद्धि अनेक विघ्नांनीं क्षीण होऊन जाईल;

प्रेममय कर्तव्यबुद्धि अनेक विघ्नांत बलवत्तरच होत जाईल.

प्रेमावांचून पुष्कळ करण्यांत येतें, पण काय तें चांगलें होतें ? गुरुशिष्यांचा संबंध तपासा. ज्ञानाचें जणूं काय भांडार असे शिक्षक शिष्यांच्या विषयीं तिरस्कार किंवा शुष्क कर्तव्यबुद्धि जर ठेवतील तर त्याचें फळ काय येईल ? शिष्याला शुष्क ज्ञानाची जरूरी नसते. तसें ज्ञान कधीं देतां येणेंहि शक्य नाहीं. त्याला गुरु या व्यक्तीकडून मिळणाऱ्या ज्ञानाची जरूरी असते. असें ज्ञानच सुलभतेनें संपादन करतां येतें. असें ज्ञानच दीर्घ काल टिकूं शकतें ? प्रेमावांचून कोणत्या गुरूला शिष्याच्या अन्तःकरणाचा ठाव लागेल ? तो ज्ञान दाखवील, पण देऊं शकणार नाहीं. डॉक्टर आणि रोगी, यांचा संबंध पाहा. पुष्कळ डॉक्टरांना असें वाटतें कीं रोगी हा जणूं काय आपला कैदी आहे. रोग्यालाहि त्यांच्यापासून दूर गेल्यावर असें वाटते कीं आपण कैदखान्यांतून मुक्त झालों. रोग्याला जंगली मनुष्याप्रमाणें ते मानतात "तुम्हांला काय समजतें आहे ? ताप कितीं का असेना, तुम्हांला काय करायचें आहे कळून ? रोगाचें नांव ?....तुम्हीं लक्ष घालूं नये अशा गोष्टींत. पुरें, आलें लक्षांत. सांगायचें होतें तें सांगून झालें. ज्यास्त वटवट करूं नका " इत्यादि सुंदर शब्द श्रवण करीत रोग्याला जावें लागतें. याच्या उलट कांहीं डॉक्टर असेंहि असतात कीं जे रोग्याला आईबाप किंवा भाऊबहिणीप्रमाणें प्रेमानें प्रश्न विचारून त्याचें सांगणें लक्षपूर्वक ऐकतात व रोग्याचा निम्मा आजार स्वतःच्या प्रेमळ स्वभावानें बरा करितात. पहिल्या प्रकारच्या डॉक्टरांनीं रोग नाहींसा केला म्हणूनहि काय मोठें ? खरें पाहिलें असतांना ते

रोग्याची मुळींच सेवा करीत नाही. अगदीं उत्तमांतला उत्तम जरी डॉक्टर असला तरी जर तो पहिल्या प्रकारचा असेल तर त्याला यश मिळणें कठीण जाईल.

प्रेम हा जीवनाचा खेळ आहे. जीवनाची विश्रांति आहे. आयुष्यांत कर्तव्य आहे, गांभीर्यहि आहे तरी व्यायामानंतर ज्याप्रमाणें विश्रांतीची जरूरी, त्याप्रमाणें कर्तव्यानंतर गंमतीचीहि जरूरी असते. व्यायामांतहि गंमत असेल तर तो व्यायाम उत्तमप्रकारें होऊं शकतो. तसेंच कर्तव्यांत जर प्रेम असेल, खेळ असेल, गंमत असेल, तर त कर्तव्य उत्तम प्रकारे होतें.

कलापि म्हणतो:—

हर्ष कुठला जीवनांत, अन् कुठला मृत्यूंतहि,
प्रेम रंगें रंगलें ना जगत् असतें हें जरी !

हें खरें आणि हर्षावांचून दुनियेंत काय पिकतें ?

प्रेमाच्याच सामर्थ्यावर निराधार बालक जीवंत राहातें व मोठें होतें. प्रेमामुळेच समाज व कुटुंबांतील कलह सहन केले जातात. प्रेमामुळेंच बिकट कामें होऊ शकतात. कोणते शास्त्रीय शोध प्रेमावांचून शक्य आहेत ? कित्येक शोध करितां त्या त्या शोधकांना किती तरी श्रम होतात. ते कां करीत असतील श्रम ? त्यांना त्यांच्या देशाबद्दल प्रेम असते म्हणून. केवळ द्रव्यासाठी काम करणारे बिकट प्रसंगीं टिकू शकत नाहींत. आणि टिकले तरी शिक्षेच्या भयानें किंवा प्रशंसेच्या लोभानें. तें भय व तो लोभ प्रत्येक प्रसंगीं टिकूं शकत नाही, आणि ज्या क्षणीं त्याचा नाश होतो त्याच क्षणीं कार्यहि अदृश्य होतें.

४

# आशा

आशा अमर आहे. आशा गोड आहे आशेंत मनुष्य जगतो. आशा हीच आयुष्याची किल्ली आहे.

आशा सर्वांना असते. आशा लहान मुलाला असते, आशा मोठ्यांना असते, आशा रावाला असते, आशा रंकाला असते, आशा स्त्रीला असते, आशा पुरुषाला असते.

मनांत आणलेल्या सर्वच गोष्टी मनुष्य करूं शकत नाहीं. अपयश मिळाल्यानें मनुष्याला दुःख होतें. दुःखाच्या सर्दीनें जेव्हां तो त्रस्त होतो तेव्हां आशेची उष्णताच त्याला टिकविते. भूतकाळ बिघडला, भविष्यकाळ तुझ्या हातांत आहे. कां तो चांगला निघणार नाहीं? चांगला निघेल अशी श्रद्धा म्हणजेच आशा.

स्वतःच्या इच्छेप्रमाणें करूं शकणारा मनुष्यहि आशारहित नसतो. आणखी करण्याची त्याची आशा असते. आशेच्या वातावरणांतच आपण रात्रंदिवस असतो.

असंतोषांत आशा शांति आणते. आशा दाखवा आणि सर्वजण संतुष्ट होतील.

आशेंत उद्योग आहे. आशेंत उत्साह आहे. निराशेंत आलस्य आहे, निराशेंत मंदी आहे. आशेची उर्मी कोणाला माहीत नाहीं? निराशा कोणाला लाथाडून टाकीत नाहीं.?

आशा आणि आरोग्य यांचा दृढ संबंध आहे. आशा आणि वय यांचाहि संबंध आहे. चांगल्या प्रकृतीचा मनुष्य आयुष्याला

आशामय मानील. अशक्त, रोगीट, मुर्दाड मनुष्य नेहमीं कहारी स्वभावाचा राहील. तारुण्यांत मनुष्य सर्वांत अधिक आशा बाळगतो. तें वय चांगले विचार, चांगल्या भावना, चांगल्या आदर्शांचें असतें. झालें हें फार थोडें झालें, व्हावयाचें पुष्कळ आहे. बिघडलेलें त्या वयांत थोडें असतें, आणिक सुधरविण्याचें मार्गहि पुष्कळ असतात. तारुण्यांत कल्पनेची सृष्टि फार मोठी असते. जसजसें वय वाढत जातें. तसतसें पुष्कळ झालेलें असते व व्हावयाचें थोडें असतें. आणि बिघडलेलें सुधरविण्याचे मार्गहि अमुक एका मर्यादेच्या पुढें बंद होतात. अशा वेळीं आशेला उत्तेजित करण्याची आवश्यकता असते

आशा कल्पनेच्या आधारावर राहते. प्रत्येक कल्पनेला कांहीं चांगली आशा म्हणतां येणार नाहीं. हवेंत इमले बांधणें म्हणजे कांहीं आशा नव्हें. आशा भूतकाळाच्या पायावर उभारलेली असावी.

आशेचें क्षेत्र विस्तृत ठेवणाऱ्याला अपयश फार क्वचित् मिळतें. एकाच वस्तूची आशा ठेवणाऱ्याला ती वस्तू न मिळाल्यानें मेल्यासारखें वाटतें, त्याचें सारें आयुष्य बिघडतें. जगाविषयीं त्याला तिरस्कार वाटतो. तो निस्तेज होतो. तो आळशी बनतो. आणि शेवटीं दुःखी किंवा कित्येक वेळां अनीतिमान बनतो. पण ज्याला विविध प्रकारच्या आशा असतात, त्याला वेगळ्याच प्रकारचा अनुभव मिळतो. त्याची एक नाहीं तर दुसरी, दुसरी नाहीं तर तिसरी, तिसरी नाहीं तर चौथी आशा पूर्ण होते. तसें झाल्यानें तो संतुष्ट होतो. शिवाय जगाचा असा कांहीं चमत्कारिक

नियमच दिसतो कीं ज्या विषयीं मनुष्याची अति प्रबळ आशा असेल ती वस्तू त्याच्यापासून बहुतेक दूरच राहते. अशा प्रसंगीं ती वस्तू नाहीं तर तिच्यापेक्षां कमी महत्वाची वस्तू त्याला अचानक मिळते आणि ती मिळाल्यानें मनुष्याला संतोष वाटतो. म्हणून आशेचें क्षेत्र जितकें मोठें तितकें तें चांगलें.

आयुष्याचें ध्येय व आशा यांचा गाढ संबंध आहे. साधारणतः आशावादाचा स्वीकार करणाऱ्यालाच चांगलीं ध्येयें सुचतात. आशाच नाहीं, तर ध्येय तरी कशाला ? ध्येयविहीन आयुष्यांत मनुष्यत्वापेक्षां पशुत्वच अधिक असतें. खावें, प्यावें व चैन करावी हें तर पशूंनाहि प्रिय असतें. पण आपल्या सामर्थ्याविषयीं उच्च कल्पना बाळगणें, केलें व करितां येईल या दोहोंतील विरोध पाहाणें, यांतच मानवी जीवनांतलि मौज आहे. मनुष्यत्व उमलणें या गोष्टीवरच अवलंबून आहे. ज्यानें हा विरोध सर्वांत अधिक पाहिला आणि तो नाहींसा करण्याची ज्याला सर्वांत अधिक इच्छा झाली, तोच कांहीं करूं शकेल.

आशावादी होण्याचा प्रयत्न प्रत्येकानें करणें इष्ट आहे. आशा स्वभावजन्य आहे. शरीराच्या बांध्यावरहि ती आधारलेली असते. पण कांहीं मर्यादेपर्यंत तिची जोपासना करणेंहि शक्य आहे. आनंददायक वस्तूंच्या सहवासांत राहूनहि कित्येकांना आनंद मिळूं शकत नाहीं. तरी पण कृत्रिम रीत्या आनंद मिळविण्याचा ज्याचा दृढ निश्चय झाला असेल तो कांहीं दिवसांनीं का होईना पण आनंदी बनू शकतो. आनंदी मित्र, आनंद उत्पन्न करतील अशीं पुस्तकें, असलें आनंदाचें साधारण वातावरण नेहमीं इष्ट असतें.

ज्याच्या ठिकाणीं सर्वांत अधिक आशा असेल अशाचा समागम कांहीं तरी लाभदायक होईल.

एखाद्या तरुणाचा मृत्यु झाला असतां त्याच्या आप्त मंडळींना अत्यंत दुःख होतें. दुःख होतें, आणि तें स्वाभाविक आहे तें दुःख स्नेही गेल्यानें झालेलें असतें. स्नेहाचें एक पात्र गेल्यानें दुःख होणारच. पण त्या दुःखाचें खरें कारण, आणि तें दुःख फक्त आप्त जनांनाच नाहीं तर साऱ्या जगाला होण्याचें कारण, निराळेंच आहे. आणि तें फार भक्कम आहे. एखाद्या तरुणाचा मृत्यु म्हणजे आशेचा मृत्यु. एखाद्या तरुणाचा मृत्यु म्हणजे ध्येयाचा मृत्यु. एखाद्या तरुणाचा मृत्यु म्हणजे जगाच्या प्रगतीचा मृत्यु होय. आज जें आशेंत आहे, तें उद्यां घडेल; आज जें व्हावयाचें असेल तें उद्यां होईल. आज जें ध्येय असेल तें उद्यां सिद्ध होईल. तरुणाचें हृदय हें आशेचें पवित्र मंदिर नसतें असें कोण म्हणेल ? त्या मंदिरांचा नाश ! अरेरे केवढा मोठा नाश ? किती तरी भक्त त्यामुळें दुःखी होतील !

आशा आशेचें संगोपन करिते व निराशेचा नाश करिते. निराशा नेहमीं निराश उत्पन्न करिते. क्षुद्र गोष्टींनहि आशावंत व्हा. निराशेपासून नेहमीं दूर राहा.

---

५

# चंद्रिका

चंद्रिका कोणाला शांतिदायक नसते ? चंद्रिका कोणाला आनंदप्रद नसते ! चंद्रिका कोणाला सुखकर नसते ! चंद्रिकेच्या ताब्यांत असतांना निसर्ग आणि मानव शीतलता प्राप्त करितात. चंद्रिकेच्या ताब्यांत असतांना निसर्ग आणि मानव नवीनता आणि रम्यता प्राप्त करितात. सूर्याच्या तापानें तप्त झालेलें निसर्ग चंद्रिकेंत विश्रांति घेत असतें.

अशी परिस्थिति विश्रांतीला अनुकूल आहे. आतां निसर्ग निवृत्तींत आहे. निसर्गहि झोंपलें आहे. आतां कोणत्याहि प्रकारची भानगड नाहीं. म्हणूनच आतां दोन घटका निसर्गाचें निरीक्षण करण्याला व त्यापासून शुद्ध आनंद मिळविण्याला योग्य समय आहे. असें असून कितीं माणसें चंद्रिकेंत फिरण्याचा आनंद लुटतात ? फारच थोडीं. शांत आनंद मिळविण्याच्या अशा प्रसंगीं आपण घरांत बसून राहतो. इतकेंच नाहीं तर रात्रीं बाहेर निघण्याचा विरुद्ध आपले विचार इतक्या हद्दीपर्यंत गेले आहेत कीं **निशाचर** या शब्दाचा अर्थ फार पूर्वीपासून अनर्थसूचक बनला आहे. अशा सुधारणांचा डोईजड होणारा भार टाकून द्यावा आणि मग पाहावें कीं आनंद कुठें आहे, पवित्रता कुठें आहे, शुद्धता कोठें आहे ? सर्व तिथे आहे. आतां निसर्गांत विविधता आणि रमणीयता फार दिसते. कारण आतां लहानमोठ्या वृक्षांच्या सावल्या, त्या त्या वृक्षांपेक्षांहि अधिक आकर्षक बनत असतात.

टेकड्या आणि डोंगरावरून दूर दिसणारी झाडी इतकीं सुंदर आणि स्वतःकडे पाहाणाऱ्याची दृष्टि खेंचून घेणारी दिसते कीं, दिवसा तसें कांहींच नसते. यावेळीं नदी आणि ओढे यांतून वाहणाऱ्या पाण्यांत पाणी नाहीं तर मूर्तिमंत सौंदर्य वाहत आहे, आणि जलपृष्ठावर शीतल प्रकाश व किनाऱ्यावरील वृक्षांच्या सांवल्या एकमेकांशी शुद्ध क्रीडा करीत आहेत, आणि तुमच्या ठिकाणीं आहे का असला निर्दोष क्रीडा असें म्हणून मनुष्याला लाजवीत आहेत. यावेळीं तलावांत भोंवतालचें निसर्ग किंवा आजूबाजूच्या वस्तु इतक्या हुबेहूब प्रतिबिंबित होतात कीं, एखाद्या सुंदरांतलि सुंदर चित्रांतहि तसें क्वचित्‌च दिसेल. या वेळीं पांढऱ्या वस्तु अधिक पांढऱ्या होतात आणि डोळयांना क्वचित्‌च आनंद-विल्या खेरीज राहतात. या वेळीं जिकडे तिकडे शांतता असल्या-मुळें कर्णेंद्रियांना देखील अनुपम आनंद मिळूं शकतो, कारण नदींत होणारा खळखळ आवाजहि फार मधुर लागतो. या वेळीं कठोर आवाज काढणाऱ्या पक्ष्याच्या ऐवजीं मृदु आवाज काढणाऱ्या पक्ष्यांचीच गाणीं ऐकू येतात. यावेळीं शीतलता आहे, त्यामुळें काणताहि ऐकू येणारा आवाज साधारणपणें मधुर बनतो. शिवाय घ्राणेंद्रियाला देखील या वेळीं पाहिजे तेवढी तृप्ति मिळते. बागबगीचे व वृक्षमात्र संमिश्र व कांहिसा अव्यक्त असा मधुर सुवास अर्पण करीत आहेत; या वेळीं सर्व इंद्रियें सतेज होत असूनहि किती निसर्गाचें अवलोकन करितात !

बाहेर निघण्याची गोष्ट एक राहूं द्या, पण घरीं बसलेले लोकहि कुठें मागें पुढें बघतात ! बाकी त्यांनीं उंच बघितल्यास

त्यांना पैशावांचून सुंदर देखावा दिसेल. चंद्रिकेच्या कमीज्यास्त प्रफुल्लतेप्रमाणें आकाशांत कमीज्यास्त प्रकाशांत असंख्य तारे अनुपम तेजाच्या असंख्य रत्नकणिकांप्रमाणें मोहक वाटतात. त्यांचा चकचकाट शीतल असल्यामुळें आणि आकाशांत ते सुट्टे सुट्टे असल्यामुळें डोळ्यांना दूर-दूर-सुदूर असे ओढून नेतात कीं तो देखावा विश्वाच्या अनंतत्वाचा आपणाला साक्षात्कार करवितो; सृष्टींत भव्यता आहे त्याची जाणीव करून देतो. मनाला किंवा शरीराला कितीहि थकवा आला असला तरी, दोन घटका गच्चींत बसून चंद्रिकेला बिलगणारा कोणत्या मनुष्याला आपण सुखी नाहीं असें वाटतें ?

गाणें नेहमीं रात्रीं गोड लागतें. चांदण्यांत तें विशेष गोड लागतें. गरब्याच्या पद्धतीला मी फारच पसंत करतों. दुर्दैवानें ती शिथील होऊं लागली आहे. उच्च वर्गाच्या स्त्रियांनीं त्यांत अधिकाधिक भाग घेऊन संस्कारी वर्गांना त्याचा आनंद मिळवून दिल्यास तितका वेळ संसारांत कोणाला स्वर्ग प्राप्त होणार नाहीं ? पण गाणें अधम वर्गाच्या हातीं गेलें आहे, आणि त्याकरितां अवश्यक अशा शुद्ध भावनांच्या ऐवजीं, विशेषतः अधम वर्गांत अशुद्ध भावनांनीं आपलें ठाणें दिलेलें दिसतें. जेथें संगीत आहे तेथें त्याचे भोक्ते शुद्ध नाहींत, आणि जेथें भोक्ते आहेत तेथें संगीत नाहीं. व्यवस्थित गरब्याकरितां तसा समाज हवा. तसें झाल्यास स्त्री-पुरुषांना, आणि विशषतः स्त्रियांना आनंदाचें पवित्र साधन प्राप्त होईल, आणि त्याच्या द्वारें संस्कारी जीवन अधिक संस्कारी बनवितां येईल, धर्म आणि नीति यांचें उच्चप्रकारचें एकीकरण

करतां येईल आणि मोडकळीस आलेलें जुनें संगीत पुनः आपल्या घरांत सुधारणा करून प्रजाकीय भावना जागृत करील. अशा प्रकारचे स्त्री–समाज संगीतानें चंद्रिकेला हजार पट अधिक मधुर बनवू शकतील.

पण या सर्व गोष्टींकरितां जें पाहिजे आहे तें निसर्गाचें प्रेम होय. मोकळ्यांत फार जाऊं नये, रात्रीं हिंडूं नये, मोठ्यानें गाऊं नये, विशेषतः पुरुषांना ऐकूं जाईल अशा प्रकारें,–अशा प्रकारचे शिष्ट विचार कृत्रिम होत. त्यांची कृत्रिमता हानिकारक आहे. आपणाला नैसर्गिक आनंदांत लाज कसली ?

आपण सर्वांनीं चांदण्यांत भटकावें असें मी इच्छितों आपल्या समाजांत चांदण्यांतील आनंदाचे व खेळाचे प्रसंग वाढोत असे मी इच्छितों. शरदपौर्णिमेचा आनंद फक्त खाण्यापिण्यांत परिपूर्ण न होतां विविध प्रकारचे संस्कारी आनंद त्या रात्रीं व तशा इतर रात्रीं मिळावेत असें मी ईच्छितों. चंद्रिकेची सौंदर्य, शीतलता, मनोहरता या विषयीची स्पर्धा–सर्वांना आकर्षक होवो आणि चंद्रिका सर्वांना प्रिय होवो असें मी इच्छितों !

---

## ६

# नि द्रा

झोंप किती घ्यावी, या प्रश्नाचें उत्तर बेंजामिन फ्रँकलीन यानें असें दिले होतें कीं, “ पुरुषांनीं सहा तास, स्त्रियांनीं सात तास आणि मुर्खांनीं आठ तास ”. मनुष्य म्हणजे कांहीं घड्याळा-

मारखे यंत्र नाही की त्याला किल्ली दिल्यावर अमुक तास चालेलच. सर्वच घड्याळें सारख्याच वेळेपर्यंत चालत नाहींत. अतएव जिवंत प्राणी यंत्राप्रमाणें वागणें असंभवनीय आहे. आणि म्हणूनच असें त्रोटक व सत्यपूर्ण उत्तर देतां येणें शक्य नाहीं. इतकेंच नाहीं तर सर्वसामान्यपणें मनुष्याला सात आठ तासांच्या झोंपेची जरूरी असते. ज्याला ज्यास्त झोंपेची आवश्यकता असेल तो ज्यास्त झोंपल्यानें कांहीं मूर्खपद प्राप्त करून घेत नाहीं किंवा जो कमी झोंपतो तो तेवढ्यानें मूर्खपणापासून मुक्त होतो असेंहि नाहीं.

सामान्यपणें सर्वांची प्रवृत्ति पाहिजे त्याच्यापेक्षां ज्यास्त झोंप घेण्याकडे असते. हें इष्ट नाहीं. मनाच्या आरोग्यकारक प्रवृतींकरितां तें सुदृढ असायला हवे. त्यानें पुरेशी विश्रांति घेतलेली असायला पाहिजे. विश्रांति थोडी घेण्यांत आली किंवा झोंप फारच कमी घेण्यांत आली तर विचारांत गोंधळ होईल, काम करायला उत्साह राहणार नाहीं, आणि जे काम करण्यांत येत असेल तें बोज्याप्रमाणें भासेल. अशी स्थिति फार वेळ टिकल्यास मनाची स्थिरता जाऊन मनुष्य वेडा होण्याचा देखील संभव आहे परीक्षेचे दिवस जवळ आले कीं पुष्कळ विद्यार्थी रात्रीं उशीरां झोंपीं जाऊन सकाळीं लवकर उठतात. त्याचें परिणामहि त्यांना अर्थात्च भोगावे लागतात. साधारण आणि नित्याच्या परिचयाच्या प्रश्नांचीं उत्तरेंहि त्यांना बरोबर देतां येत नाहींत, आणि कित्येक वेळां झोंपेच्या बाबतींत झालेल्या अशा अनियमित वर्तनामुळेंच ते आपलें भावी आयुष्य बिघडवून घेतात. कमी झोंपेप्रमाणेंच

ज्यास्त झोंपहि हानिकारक आहे. त्यांत शरीरप्रकृति बिघडण्याचा किंवा मानसिक गुंतागुंत होण्याचा संभव नाहीं. तरीपण मनाला शिथील बनविण्याची भीति त्यांत असतेच. पाहिजे त्यापेक्षां फारच ज्यास्त झोंप घेतल्यानें असें भय उत्पन्न होतें.

तर मग पाहिजे तितकी झोंप कशाला म्हणतां येईल ? या प्रश्नाचें बरोबर उत्तर देतां येणार नाहीं. ही गोष्ट प्रत्येक मनुष्याच्या शरीर प्रकृतीवर, त्याला आपल्या उद्योगधंद्यांत कराव्या लागणाऱ्या श्रमावर, आणि त्याच्या संवयीवर अवलंबून आहे. तरीपण सामान्यपणें जास्तींत ज्यास्त सात आठ तासांची झोंप बरोबर म्हणतां येईल.

होतील तितके झोंपेचे तास कमी करणें चांगलें. विशेषतः सध्यांच्या बिकट परिस्थितीमय जीवनांत तरी फारच चांगले. कारण जितके तास आपण कमी झोंप घेऊं तितके तास आपणाला आपल्या आयुष्यांत आणि आयुष्यविषयक प्रयत्नांत घालवितां येतील. अशाप्रकारें एक दीड तास रोज आपण वांचविला तर पुष्कळ फायदा होण्याचा संभव आहे.

ज्याप्रमाणें झोंपेच्या तासांच्या बाबतींत, त्याचप्रमाणें झोंप केव्हां घ्यावी याचीहि निरनिराळीं उत्तरें येणें शक्य आहे. कित्येक कित्येक लवकर निजून लवकर उठणारे आहेत, तर कित्येक उशीरां निजून लवकर उठणारे आहेत. उशीरां झोंपणें किंवा जागत राहणें कित्येकांना अशक्य असते, तर लवकर उठणेंहि कित्येकांना तसेंच अशक्य वाटतें

लवकर उठणारे अधिक सुदृढ असण्याचा संभव आहे. पण याविषयीं निश्चित कांहीं सांगतां येणार नाहीं. रात्रीं फार उशीरांपर्यंत जागणारे लोक आपल्या थकलेल्या शरीराकडून काम करून घेतात, आणि म्हणून त्यांचें आरोग्य बिघडण्याचा संभव असतो. लवकर उठणाऱ्याचा एक मोठा फायदा असतो, आणि तो उशीरां झोंपणाऱ्यांना मिळत नाहीं. ज्यावेळीं बाकीचे लोक आपल्या बिछान्यांत आळसानें लोळत असतात त्यावेळीं लवकर उठणाऱ्यांचें अर्ध्या दिवसाचें काम पुरें झालेलें असतें. सकाळच्या चार ते सहा या दोन तासांत जितक्या शांततेनें, स्फूर्तीनें, उत्साहानें काम होतें तितकें दिवसाच्या कोणत्याहि भागांत होणें तितकें सोपें नाहीं. झोंप घेतल्यानंतर त्यासमयीं मन कामाकरितां ताजेंच असतें, आणि हें तर स्पष्टच आहे कीं, थकलेलें मन जें काम पुष्कळ वेळांत करतें किंवा अजिबात करूं शकत नाहीं, तें काम ताजेंतवानें मन फारच थोड्या वेळांत करूं शकतें.

पण ही गोष्ट सर्वांना सारख्याच तऱ्हेनें लागू होईल असें म्हणणें चुकीचें होईल. कित्येक रोजगार धंद्यावाले, विचारवंत कवी वगैरे लोक रात्रीं उशीरांपर्यंत जागण्याचें पसंत करतात. त्यांची स्फूर्ति त्यांना रात्रीं उशीरांच कामीं पडते. याला अपवादरूप विचित्रताच म्हणायला हवी.

इतकें नक्की आहे कीं, रात्रीं जागून काम करणाऱ्या मनुष्याला लवकर उठून काम करणाऱ्या मनुष्याप्रमाणें, सुखानें झोंप घेतां येत नाहीं. मन जेव्हां विश्रांतीच्या स्थितींत असतें तेव्हां झोंप चटकन् येते. म्हणून रात्रीं कमी मानसिक श्रम करणाऱ्याला झोंप

लवकर येते. त्याला झोंपेकरितां प्रयत्न करावे लागत नाहींत.

झोंप मिळवून मिळत नाहीं. तसें करायला कृत्रिम उपाय नाहींत असें नाहीं. झोंपेकरितां खास औषधें असतात आणि त्यांचा वैद्य-डॉक्टर उपयोगहि करतात. कित्येक लोक या औषधांचा खाजगी रीतीनेंहि उपयोग करतात. पण असें करणें हानिकारक होय. औषधावांचून दुसरें कित्येक कृत्रिम उपाय आहेत. डोळे मिटून "एक दोन तीन" अशी संख्या मोजीत राहिल्यानें किंवा, "एक मेंढरांचा कळप एका दरवाज्यांतून जात असल्याचें" कल्पून किंवा, कित्येक शब्द मनांत पुनः पुनः घोळीत राहिल्यानें झोंप येऊ शकते असें कांहीं लोक मानतात, आणि कित्येकांचा तसा अनुभवहि आहे. पण नेहमींच अशी युक्ति नाहीं चालणार. तसें केल्यानें मनाची एकाग्रता होते आणि त्यामुळें झोंप येते; पण त्या त्या विचारांवर पाहिजे त्याच्यापेक्षां ज्यास्त भर दिला गेल्यास आपला प्रयत्न फुकट जाऊन मन जागृतच राहील. सोप्यांत सोपा उपाय हा कीं, मनांतून सर्व प्रकारच्या विचारांची हकालपट्टी करणें. तरच लवकर झोंप येऊं शकते. कित्येकांना हें शक्य असतें व कित्येकांना नसतें. एक नाहीं तर दुसरा विचार त्यांच्या मनांत नेहमीं चालूच असतो. कारण कीं अगदीं विचारशून्य अवस्था त्यांच्या बाबतींत असंभवनीय असते. त्यांच्या बाबतींत एखादी सामान्य गोष्ट मनांत आणून तिला चिटकून बसण्याची कल्पना यशस्वी ठरते. तरी पण अशा प्रकारच्या कृत्रिमतेपेक्षां नैसर्गिक रीत्या, संवयीनें जें काम साधतां येतें तें अधिक चांगलें असतें. अशा प्रकारची झोंप केव्हांहि पसंत करावयाला हवी.

गोड आणि नियमित झोंप मिळवावयाची असेल तर त्याकरितां उत्तम मार्ग एकच आहे कीं नेमलेल्या वेळीं पूर्वरात्रीं माणसानें झोंपीं जावें. असा प्रयत्न सुरू झाला कीं तो यशस्वी होईल आणि हवी ती संवयहि जडेल. इतकी कीं नेमलेल्या वेळीं झोंप घेणाराचें डोळे नेमलेल्या वेळीं आपोआप उघडतील आणि घड्याळाच्या अलार्मची किंवा घंटेची जरूरी पडणार नाहीं. निसर्गच त्याच्या घड्याळाची घंटा बनेल, निसर्गच त्याला उठवील, निसर्गच त्याला सहाय्यक होईल. विशेषतः असा मनुष्य जितका वेळ झोंप घेईल तितका वेळ अगदीं गाढ झोंप घेईल; स्वप्नें त्याला कधींहि त्रास देणार नाहींत; किंवा दिला तरी क्वचित्च देतील. झोंपेवांचून तासन् तास त्याला बिछान्यांत लोळावें लागणार नाहीं. त्याची झोंप खंडशः न होतां संपूर्ण होईल.

फार वेळ बिछान्यांत लोळणाऱ्याला विश्रान्ति मिळत नाहीं; आणि उठल्यानंतर पुनः झोंपावेंसें वाटतें. याचें कारण हेंच कीं तो खंडशः झोंप घेतो. किती तरी वेळ त्याला झोंप येत नाहीं, किंवा झोंप आल्यास स्वप्नें त्याला त्रास देतात किंवा, अर्धवट झोंपेंत त्याला सर्व वेळ रहावें लागतें.

दिवसा झोंपणाऱ्यांना रात्रीं चांगली झोंप येत नाहीं याचें कारणहि यावरून समजेल. एक वेळ मनाला चांगली विश्रांति मिळाली असेल तर दुसरे वेळीं मन लवकर विश्रान्ति कसें घेईल? तरी पण दिवसा थोडा वेळ झोंप घेतल्यानें पुष्कळांना फार चांगली विश्रान्ति मिळू शकते. विशेषतः जेवण झाल्यानंतर झोंप घेणाऱ्यांना तर ही विश्रान्ति मिळतेच मिळते.

झोंपेला कित्येक लोक मनुष्याची दुर्बलता म्हणून संबोधतात. जणूं काय झोंपेंत मनुष्याचें मर्त्यत्व त्यांना दिसतें ! पण जर देह-धर्माला अनुलक्षून झोंप आवश्यक आहे तर तिच्याकडे इतक्या हलक्या दृष्टीनें कोणीं कां बघावें ?

झोंप आणि विश्रान्ति भोगवा, विश्रान्ति भोगवा आणि काम करा. दिवसानंतर रात्र त्याप्रमाणें एकामागून दुसरी स्थिति यावयाचीच; आणि तें इष्ट आहे.

झोपेंचे बळ जबर आहे. ती कोणाला सोडत नाहीं, इतकेंच नाहीं तर उच्च नीच राव रंक यांना समान लेखणारी आहे. शूरांत शूर मनुष्यहि झोंपेच्यां तावडींत आला कीं, अत्यंत कंगाली मनुष्यापेक्षां क्वचित्च निराळा पडूं शकेल.

झोंप जातजातीची असते. जशी शारीरिक तशी मानसिकहि ती असते. झोंप जशी एका मनुष्याला आपल्या तावडींत घेते त्याचप्रमाणें समाजाला किंवा प्रजेलाहि घेते. इतिहासांत याचा भक्कम पुरावा आढळतो. जपाननें दीर्घ काळ झोंप घेतली, पण आतां त्यानें तिचा त्याग केला आहे. एके काळीं ग्रीस व रोम हे जगांत पुढें आलेले देश होते, हल्लीं ते साधारण स्थितींत आहेत, अर्धवट झोंपेतच आहेत. हिंदुस्तान हल्लीं झोंपच घेत आहे असें आपण म्हणूं शकूं. त्यांत सामाजिक, आर्थिक, धार्मिक, नैतिक चैतन्यें नसल्याप्रमाणें आहेत, किंवा नाहींतच. ज्याप्रमाणें शारीरिक झोंपेपेक्षां मानसिक झोंप कमी प्रतीची होय त्याप्रमाणें व्यक्तीच्या झोंपेपेक्षा समाजाची झोंप कमी प्रतीची होय. तुम्ही झोंप घ्या; ती तुम्हांला जितकी आवश्यक असेल तितकी घ्या. पण ती विश्रा-

न्तीकरितांच आहे हें लक्षांत ठेवा. तरी पण तुम्ही मानसिक शैथिल्य कधींहि होऊं देऊं नका. मानसिक निद्रा, निवृत्ति, शैथिल्य, नेहमींच त्याज्य होत. जर तसें असेल तर सामाजिक निद्रा ही त्याहिं पेक्षां अधिक त्याज्य होय. एका सबंध समाजाच्या झोंपेपेक्षां अधिक हानिकारक दुसरें काय असूं शकेल ?

---

## ७

# पुस्तकें

मुद्रणकलेच्या योगानें पुस्तकांचीं संख्या आकाशांतील तारकांप्रमाणें अगणित झाली आहे. पण संख्या आणि गौरव हीं दोन निराळ्याच दिशेंत वाढत असलेलीं दिसतात. हें कांहींसें स्वाभाविक आहे. लेखक होणारे अनेक हेतूंनीं लेखक होतात. कीर्तिपूजक, द्रव्यपूजक, मतप्रसारक, आनंदप्रिय सेवक, सत्यनिष्ठ साहित्यभक्त असे अनेक प्रकारचे साहित्यसेवक असल्यानें साहित्यनिर्मितीचे त्यांचे हेतु देखील विविध आणि लहान मोठे असतात लेखकाच्या नांवाची पवित्रता फारच थोडी सांभाळली जाते. लेखनाचा मुख्य हेतु फार थोड्या प्रमाणांत तडीस जातो.

ज्या महान् कर्त्यानें ही सुंदर सृष्टि निर्माण केली आहे त्याच्या कीर्तीचा प्रसार करणें आणि समाजाची सेवा करणें हेंच ज्ञान संपादन करण्याचें, ज्ञान प्रतिपादन करण्याचें खरें ध्येय असायला पाहिजे. किती ग्रंथांतून हा उद्देश सांभाळण्यात आलेल दिसतो ? फारच थोड्या. अशीं पुस्तकें अमोल होत.

चांगल्या ग्रंथांचे सतत परिशीलन करणारा मनुष्य नीतिमान् बनतो. परिशीलन करणारा याचा अर्थ वरवर वाचणारा असा नव्हें, तर निर्मल मनानें वाचलेल्याचा निदिध्यास करणारा. स्वच्छ सरोवरांत ज्याप्रमाणें भोंवतालच्या निसर्गाचें प्रतिबिंब पडलेलें दिसतें त्याप्रमाणें स्वच्छ निष्कपटी मनांवर सद्विचारांचा परिणाम होतो. हा परिणाम इतका जोरदार असतो कीं, ग्रंथांच्या परिशीलनानें विचारांबरोबर कित्येक लोकांचे आचारहि सुधरतात यांत आश्चर्यकारक कांहींच नाहीं. कारण विचार ही आचाराची सुरवात होय.

पुस्तकें चांगल्या मित्रांची गरज सारतात. ज्यांचा पुस्तकांशीं स्नेह असतो त्यांचें जंगलांतहि मंगल होतें. ग्रंथ हे खरे मित्र होत. आपलें मित्र आपणाला खुष ठेवण्याकडे नेहमीं लक्ष देतात; खरे बोलणारे व अप्रिय सांगणारे मित्र फार क्वचित् मिळतात. पण पुस्तकांत तर नेहमीं 'जें लिहिलें तें वाचलें' असा प्रकार होतो. आपणाला आनंद होईल कीं दुःख होईल, आपण धनाढ्य आहोंत कीं धनहीन आहोंत, आपण सत्ताधीश आहोत कीं सत्ताहीन आहोंत, आपण लहान आहोंत, कीं मोठे आहोंत—याविषयीं लेशहि चिंता न करितां हे आपले मित्र आपणाला नेहमीं एकच गोष्ट सांगतात.

पुस्तकें असंख्य असल्यामुळें पुस्तकांची निवड प्रत्येक मनुष्याला करावीच लागते. नीच भावनांचें पोषण करून व अनिष्ट आनंदांत निमग्न करून वाचकांची अधोगति करणारीं पुस्तकें तर नेहमींच वर्ज्य होत. तीं कितीहि रसाळ असलीं तरी त्याज्यच होत. त्यांतील रसास्वाद घेऊन त्यांतील रहस्यावर आपण बहिष्कार घालू

शकूं असें समजूं नये. संगतिदोष नेहमी लागणारच. स्पेन देशाची एक म्हण आहे:–" लांडग्याच्या संगतींत राहा आणि तुम्हींहि गुरगुरायला शिकाल." वाईट पुस्तकांचें सेवन करा आणि तुम्हींहि वाईट व्हाल

चांगलीं पुस्तकें दोन प्रकारचीं सांगतां येतील. उपयुक्त पुस्तकें आणि आदर्श पुस्तकें. उपयुक्त पुस्तकांचें वाचन इष्ट आहे, पण तें उपयोगापुरतेंच असतें. जितक्या अंशीं उपयोग तितक्या अंशीं वाचन. आदर्श ग्रंथांचें वाचन, पुनर्वाचन, पुनः पुनः वाचन, पुनः पुनः मनन. मनुष्याला स्वतःच्या संस्कृतीकरितां फार आवश्यक आहे. अमृत कितीहि पिण्यांत आले तरी त्यापासून संतोष होत नाहीं, आणि जसजसें तें अधिक पिण्यांत येईल तसतसा अधिक लाभ होतो. त्याच प्रमाणे आदर्शपूर्ण पुस्तकांच्या सेवनाचें आहे. संतोषांत खरें सुख आहे, असें सांगण्यांत येतें. मी म्हणतों ठीक आहे. पण एका गोष्टींत मनुष्यानें कधींहि संतुष्ट राहूं नये. एक असंतोष नेहमी इष्ट असतो. तो म्हणजे ज्ञानाचा, पुस्तक परिशीलनाचा, उत्तम लेखकांबद्दल आपणाला वाटत असलेल्या भक्तीचा होय. हा असंतोष वाढविण्यासारखा आहे. अशा असंतोषाचे सेवन करा आणि तुम्हांला संतोष प्राप्त होईल. असा असंतोष चालू ठेवण्याकरितां ज्या भाग्यशाली पुरुषांनें स्वतःला पाहिजे तितकीं पुस्तकें शोधून काढलीं आहेत, त्यानें नेहमीं स्वतःकरितां सुखाची सामुग्री तयारच ठेवली आहे. तसा मनुष्य आनंदी राहतो. दुःख त्याला भीत असतें. तसा मनुष्य स्वतःला श्रीमंत मानतो. दारिद्य त्याला दबवूं शकत नाहीं. सद्विचारांचें धन त्याला अधिक प्रिय असते. कारण त्यामुळेंच

तो स्वतःचा मान, स्वतःची स्वतंत्रता, स्वतःचें स्वत्व राखू शकतो– जें करायला धनिकांना कठिण जातें.

---

## ८

# इतिहास

मनुष्यजीवनाचें रहस्य प्रवृत्ति, क्रिया, पुरुषार्थ होय. त्याची आवश्यकता क्रियेंतच आहे. त्याचा उद्देश क्रिया आहे इतिहासाचें बीज, इतिहासाचें रहस्यहि क्रियाच आहे; त्याची आवश्यकता क्रियेंतच आहे, त्याचा उद्देशहि क्रियाच आहे. असें असल्यानें इतिहासाचा विषय मनुष्याला फार उपयोगी आहे. त्याला त्यांत रस उत्पन्न होतो त्याचें कारणहि या गोष्टींतच आहे.

इतिहास म्हणजे घडलेल्या गोष्टींचा अहवाल. तो अहवाल म्हणजे राजांच्या वंशावली नव्हेत, राजकुटुंबांच्या जीवनाचा अहवाल नव्हे, राजकारणांतील लटपटींचे एकीकरणहि नव्हे, वीरांच्या युद्धांचें वर्णनहि नव्हे. तो हें सर्व आहे व नाहींहि. प्रजेच्या नैतिक, धार्मिक, राजकीय, आर्थिक, सामाजिक, इत्यादि अनेक दृष्टींनीं दिसणारें समग्र चित्रविचित्र प्रजाजीवन बुद्धिपूर्वक समजविण्याकरितां तें वर्णन आहे. एवढ्याकरितांच इतिहास उपदेशाचा महामंत्र आहे; उपदेशांचा उपदेश; उपदेशकांचा उपदेशक; प्राचीनांकडून अर्वाचीन काळाला मिळणारा अमूर्त वारसा आहे. प्रत्येक होऊन गेलेली पिढी होणाऱ्या पिढीला कर्मरूप अबोल बोलांत—शांत शब्दांत खराखुर जीवन संदेश देत असते. हा संदेश, इतिहास.

इतिहासाचा उपयोग इतका मोठा आणि इतका सर्वमान्य आहे कीं पुष्कळ वेळां असें सांगण्यांत येतें कीं इतिहास अनुभवानें शिकण्याचें तत्वज्ञान आहे. सत्यवस्तु काय आहे ती इतिहासाच्या पटावर दिसून येते. या विश्वाच्या रंगभूमिवर अनेक प्रकारचीं नाटकें केलीं जातात. त्यांत स्वार्थी आणि शक्तिमान पुरुष अनेक प्रकारचे आभास उत्पन्न करूं शकतात. धर्म, नीति, राजनीति या सर्वांत स्वार्थ आणि पक्षाच्या बळावर कित्येक धर्मगुरु, नीतिप्रवर्तक, राजनीतिज्ञ स्वतःचे विचार खरे करू शकतात. राज्याराज्यांतील लढाईंत बलवान राजे आणि त्यांचे सेनापति बहुधा धारलेलें करूं शकतात. नीतिपेक्षां बलाची, न्यायापेक्षां अन्यायाची महत्ता स्थापूं शकतात. राजे राजसत्तेच्या जोरावर खोटे धर्महि सुरू करू शकतात. या सर्व गोष्टींचे दाखले देशोदेशींच्या इतिहासांत नमूद केलेले आहेत. पण विचार किंवा वर्तनाच्या खोट्या पद्धतीची उत्तम टीका म्हणजे त्या विचाराचा किंवा वर्तनाचा इतिहास ही होय. इतिहास टीकाकार आहे. इतिहास विवेचन आहे. इतिहास सुधारक आहे. समकालीन लोक स्वार्थ किंवा पक्षाच्या जोरावर ज्या चुका पाहूं शकत नाहींत त्या मागाहून सहज पहाण्यांत येतात. काळ जातांच प्रत्येक कोता विचार, प्रत्येक खोटा धर्मविचार, नीतिविचार, किंवा राजतंत्रविचार उच्छेदित होतो आणि सत्य प्रकाशांत येतें. सत्यच टिकतें सत्यच विजयी होतें. शेवटीं इतिहासाच्या पडद्यावर सत्यवस्तूच दर्शन देतें. इतिहास म्हणजे तत्वदर्शन होय.

पण कित्येकांना ही कदाचित शंकास्पद गोष्ट वाटेल. पुष्कळ खोट्या इतिहासांत काय काय पहाण्यांत येत नाहीं ? इतिहासाच्या

पुस्तकांत जें जे लिहिलें जातें तें काय सत्य असतें ? ही शंका स्वाभाविक आहे. आणि दुनियेंत तर जें लिहिलें जातें तें वाचलें जातें. खऱ्या हकीकती जर लिहिल्या नाहींत तर वाचल्या तरी कशा जाणार ? दीर्घ कालानंतर त्या कळणार तरी कशा ? इतिहासाचीं पुस्तकें खास खोटीं तयार केलीं जात नाहींत का ? आणि जीं पुस्तकें खरीं लिहिलीं जातात तीं दाबून ठेवण्यांत येत नाहींत का ? या शंका स्वाभाविक आहेत. नेपोलियन बोनापार्टच्या शब्दांत "इतिहास म्हणजे काय ? सर्वांना मान्य झालेली कल्पित कथा." या कथेचा आशय असा कीं खोट्या गोष्टी जर सर्व स्वीकारतील तर त्या इतिहासाच्या नांवानें ओळखल्या जातील. असेंच जर असेल तर इतिहासांत तत्त्वदर्शनाची आशा व्यर्थ आहे. पण हें संभवनीय नाहीं. या विश्वांत असत्याची उभारणी करतां येते हें खरें. पण मौजेची गोष्ट ही कीं अशा खोट्या नाटकाचा सूत्रधार एकच आहे, आणि तो सर्वशक्तीमान आहे. घडलेल्या गोष्टी खोट्या करतां येतील. खोट्या स्वरूपांत दाखवितां येतील. स्वार्थाच्या गोष्टी दाबून ठेवतां येतील. पक्षाचा विजय मिळवितां येईल. आणि तें सारें सर्वसामान्यहि करतां येईल. हें सर्व घडेल पण तें समकालीन युगांतच घडेल. दीर्घकालानंतर त्याचें बल कमीच होईल. क्रियेप्रमाणेंच प्रतिक्रियेचें बलहि सारखेंच असतें. जितक्या उत्साहानें सत्य लपविण्यांत आलें असेल तितक्याच उत्साहानें एखाद्या अकल्पित वेळीं एखादा इतिहासकार तें प्रकाशांत आणूं शकतो. विशेष हें कीं बलात्कारानें कबूल करविलेला धर्म, नीति आणि राजतंत्रविचारांचा नाश त्या बलात्कारांतच असतो. बलात्कार

आत्मघातक आहे. स्थापित झालेला कोणता धर्म, कोणती राजनीति, कोणता विचार चिरस्थायी राहिला आहे ? बदल होण्याचा नियम मनुष्यजीवनाप्रमाणें प्रजाजीवनांत न्यायस्थापना करण्यांत बिनचूक मदत करतो. खड्डा खणाल आणि तुम्ही पडाल, जो करील तो भरील, जसें पेराल तसें मिळवाल—हा नियम सर्वव्यापक आहे. त्यांत आपली अचल श्रद्धा आहे. इतिहास त्याचा पुरावा आहे. इतिहास तें स्वरूप आहे. म्हणून इतिहास म्हणजे तत्त्वदर्शन होय.

कित्येक वेळां असें सांगण्यांत येतें कीं, इतिहास जीवनचरित्र आहे. इतिहास जीवनचरित्र आहे. कां ? प्रसंग किंवा घटना मनुष्याच्या हातीं आहे म्हणून. फ्रान्सची राज्यक्रांति आपणाला समजून घ्यावयाची असल्यास आपण बादशहा नेपोलियनचें चरित्र पाहूं. त्या काळचा इतिहास त्या चरित्रामुळें उकलला गेला आहे. अमेरिकेच्या स्वातंत्र्याचा इतिहास पाहणें आणि वॉशिंग्टनचें चरित्र पाहणें हें एकच आहे. कोणत्याहि काळाचा संपूर्ण इतिहास पाहावयाचा असल्यास त्या काळांतील थोर पुरुषांचीं चरित्रें पाहावींत. त्या चरित्रांपासून तत्कालीन घटना निर्णीत होतात. अशा रीतीनें इतिहासाला चरित्र किंवा जीवनचरित्र समजतां येईल. पण येथें असा प्रश्न उत्पन्न होतो कीं, चरित्राखेरीज इतर तत्त्वांनीं इतिहास निर्णीत केला जातो किंवा नाहीं ? जर तसें असेल तर इतिहासाला चरित्र कसें म्हणतां येईल ? इतिहास पाहातां असें दिसून येईल कीं युद्धांत विजय किंवा पराजय, देशाची उन्नति किंवा अवनति, असले मोठाले प्रसंग नेहमींच कांहीं मनुष्य—प्रयत्नांनीं

नक्की होत नाहींत. दैव, नियति, अनपेक्षित वस्तुसंयोग—कोणताहि शब्द वापरा पण मनुष्यप्रयत्नांनीं असाध्य असें कांहींक असतें खरें कीं तें ऐतिहासिक घटनाहि आलटूंपालटूं शकतें. अजिंक्य स्पॅनिश नौकाबळाचा प्रसिद्ध पराजय, वॉटरलूच्या रणांगणावरील नेपोलियनचा पराजय—हे दोनच प्रसंग हा अपवाद प्रस्थापित करायला पुरेसे आहेत. तसेंच प्रत्येक देशांतील मनुष्यप्रयत्नांची सीमा तेथील हवा व पाणी, भौगोलिक परिस्थिति, त्याचा गत इतिहास —इत्यादि गोष्टींवर अवलंबून असते.

तरी पण इतिहास चरित्र आहे. मात्र चरित्र शब्दाचा अर्थ जरा निराळ्या दृष्टीनें बघायला हवा. जोंपर्यंत आपण आपल्या आयुष्यांतील गोष्टींशीं ऐतिहासिक प्रसंगांची तुलना केली नाहीं तोंपर्यंत आपण इतिहास समजलों नाहीं. इतिहास कल्पनेनें अनुभवला पाहिजे. जे प्रसंग, जे विचार, आपल्या आयुष्यांतील तसल्या लहान प्रसंगांकडे किंवा विचारांकडे आपलें लक्ष वेधून घेऊ शकत नाहींत, ते ते प्रसंग व ते ते विचार नसल्यासारखेच होत. त्यांचा इतिहास काय कामाचा ?

अशा तऱ्हेनें आत्मलक्षी दृष्टीनें बघितलेला इतिहासच उपयोगी आहे. बाकी दुनियेच्या हजारो गोष्टी जाणल्या काय आणि न जाणल्या काय ! कशाला स्मरणशक्तीला उगीच शिणवावयाची ?

इतिहास इतिहास बनवितो. प्रत्येक वीर किंवा वीरांगनेचें चरित्र वीरत्वाची प्रेरणा करतें. वीरत्वांत लोहचुंबकासारखी शक्ति आहे. त्यांत सद्वर्तनाचें बळ आहे. ज्या ज्या भावना आणि जे जे शूर पुरूष आपल्या जीवनांत प्रतिबिंबित झाले त्या सर्वांमुळें

इतिहासाचा अभ्यास सार्थक झाला आणि इतिहासाचें अस्तित्व पण सार्थक झालें असें म्हणतां येईल. ईश्वरी अंश इतिहासांत गुप्त असतात. इतिहासाच्या आत्मलक्षी अभ्यासानें, इतिहासाला आपल्या जीवनाबरोबर ग्रथित केल्यानें, आपल्या आणि आपल्या प्रजेच्या आयुष्याचीं नियामक तत्वें सचेतन होतात. असें झालें म्हणजे दुनियेची गति गति न राहतां प्रगति बनते. बाकी पुष्कळ वेळां इतिहासाची पुनरावृत्ति होते, आणि पुनः पुनरावृत्ति होते. असें झालें कीं प्रगति असंभवनीय बनते.

जो उत्तमांत उत्तम इतिहास होऊं शकेल तो सर्वदेशीय इतिहास असला पाहिजे. सर्वग्राही दृष्टीनें तपासतां, सर्व देशाचे इतिहास तुलनेच्या दृष्टीनें पहातां, जो अगत्याचा प्रश्न उत्पन्न व्हावयाला पाहिजे तो हा कीं, जगांत एखाद्या तरी दिशेनें खरी प्रगति झाली आहे किंवा नाहीं? विश्वजागृति कशी होते हा उद्बोधक प्रश्न आहे. पण त्या दृष्टीनें अजून एकहि यशस्वी इतिहास लिहिला गेला नाहीं. तसा इतिहास लिहिणारा लेखक विरळाच असणार. दुनियेंतील घटनांच्या मागें कोणत्या प्रकारची बुद्धि, कोणत्या प्रकारचा न्याय, कोणत्या प्रकारची शक्ति गुप्तपणें राहिली आहे, त्याचा शोध आणि स्पष्टीकरण हा प्रश्न कांहीं असा तसा प्रश्न नाहीं. खरें पाहिलें असतां तो तत्त्वज्ञानाच्या इतिहासाचा प्रश्न होय. ज्या इतिहासांत तो येईल तो इतिहास धर्म, नीति, तत्त्वज्ञान इत्यादि सर्व विषयांचा मध्यबिंदु होऊं शकेल. त्यानें सर्व विषयांवर प्रकाश पडूं शकेल. पण हल्लीं तशा प्रकारच्या इतिहासाचा विचार म्हणजे नुसती कल्पनाच होय.

# १

# उपदेश

" उपदेश ! उपदेशावांचून सर्व ! पण उपदेश नको. " अशा प्रकारचे उद्गार प्रकट किंवा अप्रकट रीतीनें किती तरी माणसे काढतात आणि तें काढणारच. काढणे स्वाभाविक आहे. उपदेश करणें सर्वांनाच आवडतें, पण त्याप्रमाणें वागणें फारच थोड्यांना. पण अगदींच कांहीं असें नाहीं. उपदेश अप्रिय होतो याचें खरें कारण उपदेश घ्यावयाला लोकांना आवडत नाहीं, असें नाही. पण उपदेश देणारांना तो देतां येत नाहीं. उपदेश देतां आला पाहिजे. तो देण्याची विशिष्ट पद्धत आहे. जणूं काय एक कलाच आहे.

जगाचें पोट उपदेशाने भरून गेले आहे. तरी पण जगांत उपदेशाला पाहिजे तेवढी जागा आहे. होय, जग उपदेशाने भरून गेलें आहे हें खरें. " मी म्हणतो कीं तुम्ही सुधारणा करा. त्यांत तुमचे श्रेय आहे. त्यानें ईश्वर प्रसन्न होईल " अशा वचनांसमोर असाच प्रतिध्वनि निघेल की, " आम्ही म्हणतों की आम्हांला सुधारणा नाही करावयाच्या. आम्हांला जसें श्रेय असेल तसे चालेल. ईश्वराला काय तुम्हींच ओळखिलांत ? प्रथम तुम्हीच तुमची सुधारणा करा. मग उपदेश. " इतकेंच नाहीं तर कित्येक वेळां उपदेश अद्वातद्वा, वाटेल तसा, पाहिजे त्यापेक्षां जास्त, दिला जातो आणि त्यामुळें तो देणाराला लोक दीडशहाणा म्हणून संबो-धतात. अशा दीडशहाण्या लोकांपासून जग दूर रहाते. तरी पण

जगाला उपदेश नको असें कोण म्हणेल ? उपदेश म्हणून, तत्वज्ञान म्हणून, जगाला त्याची जरुरी नसली तरी जग शहाण्या आणि सुशील पुरुषांचे दास बनून रहातें; त्यांना अनेक प्रकारचा मान देतें; आणि त्यांना वंदनीयहि समजतें. कोणत्या लोकांत ज्ञानवीर पुरुष पूजिले जात नाहींत? ज्ञान नको असतें असें नाहीं, पण तें ज्ञान म्हणून नको असतें.

"तुम्ही असें करा" असें सांगितलें की उत्तर असेंच मिळणार "आम्हीं असें करणार नाहीं," या जागीं घाण करुं नये. असें लिहिलें कीं तिथें मुद्दाम घाण केली जाते. अमुक जागा स्वच्छ ठेवावयाची असेल तर एक निराळा प्रयोग करावा. "या जागीं घाण करूं नये, या भिंतीवर कागद डकवूं नयेत" असें न लिहितां असें लिहावें" या जागीं घाण करीत जावी, या भिंतीवर कागद डकविल्याखेरीज पुढें जावूं नये." "तुम्हीं सांगितलेंत म्हणून नाहीं"—अशी घोषणा जगांत सर्वत्र ऐकूं येते. आणि ती लहान मोठे, राव रंक, स्त्रीपुरुष सर्वांना ऐकूं येते. म्हणून उपदेशाच्या रूपानें उपदेश यशस्वी होत नाहीं.

नीतीचे प्रत्यक्ष शिक्षण चांगलें कीं परोक्ष या प्रश्नाची पुष्कळ वेळां चर्चा होते. यांत उलटसुलट पुष्कळ प्रकारचा युक्तिवाद केला जातो. शिक्षण प्रत्यक्ष झालें कीं तें उपदेशाच्या रूपानेंच झालें, आणि म्हणून तें प्रत्यक्ष नसावेंच, असें या विषयावरून समजेल.

जग मायास्वरूप आहे. मायेचा उच्छेद मायेनेंच उत्तम होतो. क्षणभंगुराकडूनच क्षणभंगुराचा नाश होतो. उपदेशाच्या रूपानें उपदेश न करतां स्वार्थाच्या रूपानें उपदेश केल्यास तो सर्वांना पसंत पडतो. "दारू पिऊं नका, कारण त्यामुळें तुमच्या द्रव्याची

नासाडी होते. तुम्ही अनीतींत पाऊल टाकतां. तुम्ही अधर्म करीत आहांत. " इत्यादि वचनांनीं किती माणसांनीं या व्यसनाचा त्याग केला आहे ? त्याच्या ऐवजीं असें सांगण्यांत आलें कीं, " दारू पिऊं नका सांगणारे मूर्ख आहेत. कां पिऊं नये ? त्यांत कांहीं अनीति नाहीं. अधर्म नाहीं. पण एवढें पहावें कीं तुम्ही जें शोधीत आहात तें तुम्हांला मिळतें का ? तुम्ही लज्जतीकरितां तसें करितां. पण ती मिळविण्याची शक्ति त्या पदार्थानें हळूहळू कमी होते. लज्जत मिळतच नाहीं." अशा कांहीं स्वरूपांत गोष्ट करण्यांत आल्यास आपले मेहेरबान दारूबाज तुमचें ऐकण्याची तसदी घेतील. नाहीं तर त्यांचें कर्णविवर मजबूत रीतीनें बंद असतातच. त्यांचे होऊन जेव्हां त्यांना जिकावें तेव्हांच. एरव्हीं जिकण्याचें काम फार कठीण आहे.

व्यक्तींच्या सुधारणेसारखेंच सामाजिक सुधारणेच्या बाबतींत असतें. " तुमचा समाज बिघडला आहे. त्यांत अमुक अमुक सुधारणा हव्यात, म्हणून माझें ऐका "—अशा वचनांनीं किती सुधारक यशस्वी झाले आहेत ? " तुम्हीं फारच चांगले आहांत. तुमचा प्राचीन काळ किती सुंदर होता ? तुमचे पूर्वज कसे उन्नत विचारांचे होते ? म्हणूनच तुम्हीं तसें व्हावयाला हवें" —अशा तऱ्हेनें स्वाभिमानाची भावना जागृत केली कीं पाहून घ्यावें. मग उपदेशांतील कडुपणा जातो. म्हणजे उपदेश हा उपदेश रहातच नाहीं. आणि तो साध्या विचारांच्या रूपानें येत असल्यामुळें ग्राह्य होण्याचा संभव आहे.

पण आहेत कुठें असे खऱ्या रीतीनें उपदेश देणारे ? आज-

काल सर्वांना पुढारीपणा हवा. सर्वांना गुरू व्हावेसें वाटतें. अधिकार! अधिकाराचें नांव नाहीं. ज्याला कांहीं होतां येत नाहीं त्याला शिक्षक होतां येतें, असें सांगितलेलें पुष्कळ वेळां ऐकण्यांत येतें. शिक्षकाचें काम पूर्वीपेक्षां हल्लीं फार कठिण झालें आहे. कारण शिक्षक मारूं शकत नाहीं, शिक्षक घोकंपट्टी करवूं शकत नाहीं, आणि शिक्षक पद्धतींवांचून शिकवूं शकत नाहीं. अर्थात् तशा रीतीनें काम करण्याची पात्रता त्याच्या अंगीं पाहिजेच. म्हणून 'सर्वांना शिक्षक होतां येतें,' असें सांगून शिक्षकाचा धंदा हलका दर्शविण्यांत येतो तें ठीक नाहीं. पण शिक्षकाचा धंदा न करणारे परंतु गुरुपद मिळविण्याला राजी असणारे असे कितीतरी लोक या जगतांत वसत आहेत! त्यांच्या बाबतींत वरील म्हणणें सत्याला धरून आहे—ज्याला कांहीं होतां येत नाहीं त्याला शिक्षक होतां येतें. सर्वांना असें वाटतें कीं उपदेश द्यावयाला आपण लायक आहोंत—जगद्गुरू व्हावयाला आपण योग्य आहोंत. अशा गुरूंना एवढेंच म्हणावयाचें कीं, प्रथम आपण आपले गुरू व्हा; म्हणजे जग आनंदानें आपला गुरूपणा मान्य करील.

## १०

# संस्कृति

जो समाज जंगलीपणापासून मुक्त होतो त्याला संस्कृत समाज म्हणतात. जंगली, अनार्य, अशिष्ट, असभ्य, अनाचारी, आचरण-रहित, अशिक्षित—हे सर्व शब्द "संस्कृता"च्या विरुद्ध आहेत. सुधारलेला समाज, आर्य समाज, सभ्य समाज, सदाचारी समाज, शिक्षित समाज, वगैरे समाज "संस्कृत समाज" या शब्दानें निर्दिष्ट होतील. सुधारणा—हा शब्द ज्ञाति, समाज किंवा धर्म यांच्या सुधारणेची कल्पना डोळ्यांसमोर उभी करतो. भाषेंत त्याचा अर्थ संकुचित नाहीं, तरी संकुचित अर्थ सूचित केला जातो. "आर्य" शब्द अमुकच समाजाला विशेषें करून सहज लागू पडतो, आणि म्हणून "आर्यत्वचा" अर्थ संकुचित राहातो. "सभ्य" आणि "सदाचारी" हे शब्द नैतिक भावनायुक्त आहेत. इंग्रजींत जसा Civilisation हा शब्द आहे तसा एकहि शब्द मराठी भाषेंत नाहीं. 'सस्कृत-समाज' हा शब्द विस्तीर्ण अर्थाचा आहे. जो जंगली नाहीं पण सुधरलेला, जो अनार्य नाहीं पण आर्य, जो अशिष्ट नाहीं पण शिष्ट, जो असभ्य नाहीं पण सभ्य, जो अनाचारी किंवा आचार-रहित नाहीं पण सदाचारी, जो अशिक्षित नाहीं पण शिक्षित समाज असेल त्याला संस्कृत—समाज म्हणतां येईल; आणि त्यानें दर्शविली जाणारी स्थिति म्हणजे संस्कृतता किंवा संस्कृति.

संस्कृति कशांत समाविष्ट झालेली असते? नेसण्या पांघरण्यांत? होय, जंगली समाज नग्न किंवा अर्धनग्न शरीरानें फिरतात. ती स्थिति ओळखणें आणि शारीरिक मर्यादा समजणें हें रानटी

स्थितींतून सुधारण्याचें पहिलें पाऊल होय. मर्यादेवांचून लज्जा नाहीं. लज्जेवांचून सभ्यता किंवा शिष्टता नाहीं. मग नीति असणें तर दुर्घटच होय. पण ही मर्यादा, या सभ्यतेनें कांहीं पुरी होत नाहीं. तर मग आणखी काय हवें ? खाण्यापिण्याच्या बाबतींत शिक्षण ? होय. तें पण खरें. जो समाज वनचरांप्रमाणें फलाहारावर राहतो, किंवा जो शिजविल्यावांचून अन्न खातो, त्यालाहि क्वचित्च सुधारलेला किंवा संस्कृत म्हणतां येईल. हें सर्व अगदीं स्पष्ट आहे.

पण हे सर्व असूनहि मानसिक संस्कृति नसणें शक्य आहे. त्यांतच कांहीं सारी संस्कृति परिपूर्ण होत नाहीं. इतकेंच नाहीं तर हे प्रकार जिथें विशेष असतील तिथें संस्कृतींत कमीपणा येतो. जो समाज नेसण्यापांघरण्यांत किंवा खाण्यापिण्यांत पाहिजे त्यापेक्षां ज्यस्त लक्ष देतो तो शारिरिक संस्कृति किंवा स्थूल स्वरुपाच्या संस्कृतिचें पोषण करतो. पुष्कळ वेळां ही संस्कृति संस्कृतिच नसते. उत्तम वस्त्रें आणि सुंदर आत्मा हीं नेहमींच बरोबर असलेलीं दिसत नाहींत. उलट वस्त्रांकडे विशेष लक्ष देणारे लोक रंगेल बनण्याचा किंवा असण्याचा फार संभव असतो.

मानसिक उन्नति, मानसिक विकास, मानसिक सौंदर्याच्या प्रादुर्भावाकरितां शारीरिक स्वास्थ्य आणि शारीरिक सुख सोयी बरोबर असावयाला हव्यात. तेवढ्या पुरती नेसण्यापांघरण्यांत व खाण्यापिण्यांत सुधारणा अगत्याची आहे. पण त्याचप्रमाणें हिंडण्याफिरण्याचीं, उठण्याबसण्याचीं, आणि राहण्याचीं साधनेंहि चांगलीं असलीं पाहिजे. हल्लीं पश्चिमेंत सर्वत्र आणि पूर्वेत पण पुष्कळ

ठिकाणीं तीं आहेत. हल्लीं आपण सायकल, मोटर, आगगाडी इत्यादि साधनांनीं फिरण्याचें काम जलद आणि सुखानें करतों. पुष्कळ माणसांच्या भेटी यामुळें सुलभ होतात. पुष्कळ स्थळें यामुळें पाहतां येतात. ह्या भेटी आणि हे प्रवास शिक्षणाचीं अवश्यक साधनें आहेत. त्यांच्या योगानें आपलें जीवन संस्कृत बनविण्याच्या सोयी पुष्कळ झाल्या आहेत. त्याच प्रमाणें उठण्याबसण्याचीं आणि कामकाजाचीं साधनें पण आपल्याजवळ चांगलीं आहेत. भर उन्हाळ्यांत विजेच्या पंख्यामुळें आपणाला थंडावा मिळवितां येतो मोठमोठ्या शहरांतून विजेच्या पाळण्यांनीं पायांची मेहनत वांचवितां येते. प्रवासाचीं संकटेंहि याच साधनांनीं दूर करतां येतात. आगगाडी किंवा आगबोट यांत घरापेक्षांहि चांगल्या सुखसोयींचा उपभोग घेतां येतो. राहण्याच्या घरांत आणि शहरांत पण तसेंच असावयाला हवें. शिल्पकलाशास्त्र आणि विज्ञानाच्या साहाय्यानें हल्लींच्या घरांत, रस्त्यावर, शहरात जी हवा आणि जो प्रकाश मिळतो त्यामुळें देखील शारीरिक सोयी मिळूं शकतात.

हें सर्व अवश्यक आहे इतकेंच नाहीं तर खरी संस्कृति आणि या सर्व सुधारणा यांचा गाढ संबंध आहे. हा संबंध अवयव आणि अवयवीच्या संबंधासारखा आहे. एक दुसऱ्यावांचून अपूर्ण आहे.

हें सर्व अवश्यक आहे, पण इतकेंच अवश्यक नाहीं. प्राचीन काळापेक्षां आपला काळ सर्वतोपरी सरस आहे, हें उघड आहे. थोडक्यांत आपल्या ठिकाणीं जड वस्तुची संस्कृति फार मोठी आहे.

पण त्यांत काय ? आपलीं हृदयें मोठ्या प्रमाणावर शुद्ध

आहेत का ? आपलीं मनें अधिक पवित्र आहेत का ? आपले विचार अधिक संस्कारी आहेत का ? आपलें गृहजीवन अधिक सुखी आहे का ? आपलें सामाजिक जीवन अधिक सरळ आहे का ? आपल्या धार्मिक भावना अधिक निर्मळ आहेत का ? आपले आंतरराष्ट्रीय संबंध ऐक्यवर्धक आहेत का ? हे प्रश्न अगत्याचे होत. जी अन्तीम वस्तु साधावयाची आहे, ती सूक्ष्म आहे, स्थूल नाहीं. स्थूल वस्तु सूक्ष्माला मात्र साहाय्यकारी आहे.

अर्थातच मंदिरांत प्रवेश करावयाचा असल्यास पायरीपायरीनेंच चढावयाला हवें. संस्कृतीच्या मंदिरांत प्रवेश करावयाचा असल्यास प्राथमिक स्थूल सुधारणा ह्या पायऱ्या होत. पण त्या केव्हां ? जशजशा पायऱ्या आपण चढत जाऊं तसतसें मंदिर आणि त्याच्या दिव्यतेकडे आपण आकर्षिले गेलों तरच. एक पायरी चढलों, आणि विचार मंदिरांचा न करितां; मलीन भावना साधण्याचा केला तर आपण मंदिराची पायरी चढलों असें कसें म्हणतां येईल ? कोणत्या तरी **पायऱ्यांवर** आहोंत, पण **मंदिराच्या** पायऱ्यांवर यदृच्छेनेंच आहोंत.

कोठें आहे आपल्यांत परस्पर भोळेपणा ? कोंठे आहे आपल्या कुटुंबांतील भावाभावांत, भाऊ बहिणींत, पितापुत्रांत किंवा मातापुत्रींत शुद्ध संबंध? आपल्यांत प्रेमलग्नें कुठं आहेत ? पाश्चात्य प्रजेंतहि प्रेमाचे पवित्र आदर्श सर्वत्र कुठें आहेत? आपल्या समाजांत ऐक्यभाव कुठे आहे ? पूर्व किंवा पश्चिम दोन्हीं ठिकाणीं प्राचीन काळाप्रमाणें धार्मिक श्रद्धा कुठें आहे ! देशा देशांत किंवा राज्याराज्यांत भ्रातृभाव कुठें आहे? तर मग सर्व देशीय भ्रातृभावाची उच्च

भावना फक्त शब्दांत राहिली आहे ना? जर हें सर्व नाहीं, तर जें आहे तें नाहीं सारखेंच; इतकेंच नाहीं तर तें खोटें आहे, ते हानिकारकच आहे. सुखाच्या साधनांकरितां पुढें झालेले विज्ञान दुःखाचे प्रसंग अधिक लवकर आणिक अधिक सोप्या रीतीनें निर्माण करीत आहे. मोटर, आगगाडी, टॉरपेडो, विमान हीं सर्व साधनें सुखापेक्षां दुःख अधिक निर्माण करीत आहेत. मनुष्याच्या मलीन भावना अंमलांत आणायला जलदीनें आणि मोठ्या पायावर तीं सहाय्यक बनतात. बनूं नये, पण बनतात; बनतात हें आपण पाहात आहोंत; पाहतों आहोंत आणि शोक करीत आहोंत—"हाय! ज्ञानाच्या वृद्धीचा किती वाईट परिणाम?" खिस्ती धर्मांत ईश्वरानें ज्ञानाला निषिद्ध वृक्ष बनविलें आहे, आणि त्याचें फळ चाखल्यानें दुःख होतें असा उपदेश आहे. तो अशा प्रसंगीं बरोबर लागू पडतो. पण असें का? ईश्वरानें मनुष्याला बुद्धि दिली आहे ती मनुष्याच्या कल्याणाकरितांच असली पाहिजे. ईश्वर कांहीं मनुष्याच्या भल्यांत नाहीं, असे मानणें क्वचितच् ठीक होईल. तर मग विज्ञान हें मनुष्याच्या हिताकरितांच आहे; उणीव आहे ती फक्त हृदयाच्या शिक्षणाची, आपल्या भावनांच्या शिक्षणाची, आपल्या नीतिशिक्षणाची.

नीति हाच संस्कृतीचा आत्मा होय. नीतिच्या संस्कृतीवांचून झालेली संस्कृति संपूर्ण होऊ शकत नाही. पुष्कळ वेळां तर ती अवडंबर असलेली दृष्टीस पडते.

तरी पण नैतिक उन्नति झाल्यानें कांहीं संस्कृति परिपूर्ण होत नाहीं. मन कांहीं चैतन्यस्वरुप नाहीं. जसें आपलें मन

केवळ बुद्धिरूप, किंवा भावनारूप, किंवा मनोरथरूप नाहीं—हीं तिन्हीं रूपें मात्र आपलें भिन्न भिन्न दृष्टिबिन्दु आहेत, तसेंच शारीरिक जीवन आणि आत्मिक जीवन हे देखील दोन भिन्न भिन्न दृष्टिबिन्दु आहेत. त्या कांहीं अलग अलग वस्तु नाहींत कोणत्याहि वस्तु विषयीं बरी किंवा वाईट भावना झाल्यावांचून विचार येणार नाहींत, आणि भावनेवांचून मनोरथहि तयार होणार नाहींत; तसेंच मन प्रवृत्त झाल्यावांचून भावना किंवा विचार उत्पन्न नाहीं होणार. शारीरिक आणि आत्मिक जीवनाविषयीं कांहींसें असेंच आहे. या दोघांचें संबंधहि फार गाढ आहेत. शारीरिक बलावांचून आत्मिक बल शक्य नाहीं. आत्मिक बलावांचून शारीरिक नाहीं. शारीरिक शुद्धतेशिवाय मानसिक शुद्धता नाहीं. मानसिक शुद्धतेवांचून शारीरिक नाहीं. दोन्ही वस्तूंचें एकत्रित स्वरूप म्हणजे जीवन होय. म्हणूनच शारीरिक आणि स्थूल संपत्ति इष्ट आहेत व मानसिक आणि सूक्ष्महि तशाच इष्ट आहेत. मनोनिग्रह फार कठिण आहे हें तर अनुभवसिद्ध आहे. शरीराचा निग्रह असूनहि मनोनिग्रह नसणें संभवनीय आहे, पण मनाचा निग्रह असून शरीराचा नाहीं हें असंभवनीय आहे. आणि म्हणूनच मानसिक शुद्धता, मानसिक पवित्रता, नैतिक उन्नति, नैतिक सुधारणांना मनुष्याच्या संस्कृतींत मोठें अगत्याचें स्थान देण्यांत येतें.

११

# कर्मयोग

सध्यांचें युग प्रवृत्तीचें आहे. चोहींकडे प्रवृत्ति आणि प्रगति पाहण्यांत येते. विज्ञान वाढलें आहे. प्रजेंतील नवें चैतन्य जुन्या भावनांना आणि जुन्या आचारांना मागें रेटीत जात आहे. अशा स्थितींत शान्तीची आशा धरणें म्हणजे आशा कीं निराशा ? निवृत्ति हें शहाणपण कीं चूक ? ऋषीमुनींचा काळ गेला. गंगा-तटाकीं ईश्वरी साक्षात्कार होण्याचा आणि त्यानें संतुष्ट बनण्याचा काळ गेला. आतां ईश्वरी साक्षात्कार जनहिताच्या प्राप्तीनें करावयाचा आहे. मनुष्यानें कर्मवीर होणें इष्ट आहे.

परलोकाविषयीं विचार करणें आणि या जगाला कंटाळणें लोकोन्नतीला बाधक आहे. परलोकांत सुख मिळेल, ऐहिक वस्तु खोट्या आहेत—अशामान्यतेमुळेंच आपण मागें आहोंत. असें कां मानावें ?मायावी म्हणजे नाशवंत, पण त्याला खोटें किंवा असत्य, असें क्वचित्च म्हणतांयेईल.

कर्में भिन्न भिन्न जातींचीं असूं शकतील. पण जें कर्म हवें आहे तें देशोन्नतिकरितां समाजाच्या हिताकरितां. स्वतःच्या सुधा-रणेकरितां देखील जीं कर्में अवश्यक असतील तीं हवीं आहेत. त्या बाबतींत आबालवृद्ध सर्वांनीं शक्य तेवढे प्रयत्न करून दाखविण्याचा काळ आहे. हात जोडून बसून राहणें किंवा कपाळावर हात ठेवून बिचाऱ्या राहूला आणि शनीला शिव्या देणें म्हणजे अवनतीला आव्हान देण्यासारखें आहे. आपल्या जीवनाच्या वेदीवर शक्य तितक्या

उद्योगाचा यज्ञ करून सर्वत्र प्रकाश टाकायला हवा. माझी अजून वेळ आली नाहीं किंवा माझी वेळ संपली, किंवा माझी प्रवृत्ति शांततेकडे आहे—असें सांगणें हास्यास्पद आहे. वेळ सर्वांचीच झालेली आहे, ती कधीं पूर्ण होत नाहीं. आणि निवृत्तिपासून तर आपण सर्वांनीं दूरच राहायला हवें. प्रत्येकानें आपली स्थिति आणि लायकी ओळखून अनुकूल कार्य करायला हवें, आणि सदोदित हें लक्षांत ठेवावें कीं जोंपर्यंत अधिकांत अधिक यश मिळत नाहीं तोंपर्यंत प्रयत्नांत शिथिलता होऊ द्यावयाची नाहीं.

कोणतीं कर्मे आपल्या उपयोगीं आहेत ? उत्तर खरें आणि थोडक्यांत देतां येईल. मागासलेल्या पण हातपाय हालविणाऱ्या प्रजेच्या जीवनाला अनुकूल असतील अशीं सर्वच कर्मे. आपल्या सामाजिक कल्पना किंवा आपल्या प्रजाकीय कल्पना अढळ उद्योगाशीं संलग्न झाल्या तर आपली केवढी मोठी उन्नति होईल !

कर्माचा तिरस्कार करणारा मनुष्य व्यक्तिबळ प्राप्त करूं शकेल किंवा ज्ञान आणि भक्तीच्या जोरावर आत्मोन्नति करू शकेल, पण अशा माणसांची प्रजा किंवा राष्ट्र बनूं शकणार नाहीं. साधु संन्यासी किंवा योगी यांचें कुठें राष्ट्र बनलें आहे ? निवृत्तिपरायण लोकांचेंहि कुठें राष्ट्र झालें आहे ? अशा लोकांचा ऐहिक वस्तु-विषयीं अनादर असतो, स्वतंत्रता किंवा परतंत्रता त्यांच्या मतें सारखीच असते; कारण या द्वंद्वापासून ते स्वतःला अतीत समजतात. ते संसारांत राहतात हें खरें, पण वस्तुतः त्यांची जागा स्वर्गांत असते. आपण अमुक देशाचें आहोंत किंवा तमुक देशाचें आहोंत असें ते मानीत नाहींत. स्वदेशासारखी कल्पना त्यांच्या

ठिकाणीं असणेंच अशक्य आहे. आणि म्हणूनच राष्ट्र या नात्यानें कधींहि त्यांची उन्नति होणें शक्य नाहीं.

आपणाला कर्मयोगी व्हावयाचें आहे, हिंदुस्थानांत हजारों साधुसंत धार्मिक भावनेनें किंवा धर्माच्या मिषानें आळसांत आयुष्य घालवीत असतात. याचा परिणाम असा होतो कीं, हिंदु प्रजा किंवा हिंदु राष्ट्र यापासून ते विलग होतात. राष्ट्राला प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्षपणें ते भाररूप होतात. राष्ट्रीय उन्नतींत ते आपला हिस्सा देत नाहींत. या शिवाय, रूढि किंवा आचारामुळें, किंवा शिक्षणाच्या अभावामुळें, हजारो उत्साही स्त्रिया देखील कोणत्याहि प्रकारचें राष्ट्रहिताचें कार्य करूं शकत नाहींत. पण सृष्टींत कर्मविरहित असे काय आहे कीं मनुष्याला तसें राहण्याचा हक्क मिळावा ? निसर्ग या बाबतींत आपल्या विचारांना पुष्टि देतें. निसर्गाच्या ठिकाणीं कांहीं देखील निरूपयोगी नाहीं. तिथें जरा कांहीं निरूपयोगी झालें कीं त्याचा हळूहळू नाश व्हावयाचा. दरेक वृक्ष, दरेक प्राणी, दरेक पदार्थ सृष्टिरचनेंत कांहीं कांहीं काम करीत आहे. त्यांचीं फळें, त्यांची गति—हीं त्यांचीं कर्में म्हणतां येतील.

१२

# असें कां ?

असें सांगण्यांत येतें कीं, तत्त्वज्ञानाची सुरवात विस्मयापासून होते; त्याचें बीज विस्मय होय. ज्यानें नवीन, अपरिचित, विस्मय उत्पन्न करणाऱ्या वस्तु आणि प्रसंग बघितले नसतील त्याचें मन आळशी बनतें; आणि म्हणूनच "असें कां ?" असा प्रश्न करण्याची वृत्ति ही ज्ञानाची अवश्यक पायरी मोजली जाते. परिचित वस्तूंना देखील अपरिचित रीतीनें बघितल्यानें आणि "त्या तशा कां" असा प्रश्न केल्यानें मन जागृत राहून शोधक बनतें. वृक्ष, पर्ण, शीत, ताप, सृष्टि-इत्यादि अशा कां—असा प्रश्न केल्यावांचून तत्त्वज्ञान संभवतच नाहीं. कित्येक तत्त्वज्ञान्यांच्या लहानपणच्या गोष्टी वाचल्या असतां ते लहानपणीं जें जें पाहात त्याच्याविषयीं 'असें कां' असा प्रश्न विचारीत असत असें कळतें. जो कारण विचारील तो विचारी बनेल हें तर स्पष्टच आहे. पाऊस पडत असलेला पाहून बालकानें तो कां पडतो, कसा पडतो, असे प्रश्न विचारले आणि त्यांचीं उत्तरें दिलीं असतां पुनः प्रश्न विचारले तर त्याच्या ठिकाणीं प्रश्नपरंपरा विचारण्याची वृत्तीच तयार होऊन त्याच्या ज्ञानात झपाट्यानें भर पडेल. मोठेपणीं देखील जो आपल्या ठिकाणीं ही वृत्ति निर्माण करील, तो विचारवंत होईल, हें समजण्या जोगें आहे.

पण जशी तत्त्वज्ञानाची सुरवात "असें कां ?" नें होते, तशीच मनुष्याच्या दुःखाची उत्पत्ति देखील "असें कां" पासूनच होते. ज्ञान मिळविण्याच्या वृत्ति बरोबरच मनुष्य दुःखी

प्राणी बनतो. प्रश्नाची स्थिति ही अपूर्णतेची स्थिति होय. जो प्रश्न करतो तो अपूर्ण असतो. प्रश्न विचारणें याचा अर्थ असंतोष जाहीर करणें; आणि असंतोष हें दुःख होय. प्रश्नाची उत्पत्ति भेदामुळें होते. तो भेद ज्ञाता आणि ज्ञेय यांमधील होय. ज्ञात्याला असें वाटतें कीं ज्ञेय हें आपल्या बाहेरचें आहे. त्याचें ज्ञान होऊन विचारांत एकरूपता निर्माण झाली कीं भेद नाहींसा होतो.

म्हणून काय अज्ञानदशा चांगली म्हणतां येईल ? ज्ञानाचें निषिद्ध फळ खाल्ल्यानें आदम दुःखी झाला असें ख्रिस्ती धर्म सांगतो. हें एका दृष्टीनें ठीक आहे. तरी पण आतां एकीकडे मनुष्याला अज्ञानासह अपरिचित सुख देण्यांत आलें आणि दुसरी-कडे ज्ञानासह दुःख देण्यांत आलें तर तो काय पसंत करील हें सांगणें कठिण आहे. कित्येक दुसऱ्या स्थितीला पसंत करतील. अज्ञानदशा मनुष्याला आतां आवडेल असें वाटत नाही.

ज्ञान तर हवेच पण मला वाटतें पृथक्करण पद्धतीनें मिळणारें ज्ञान, " असें कां ?" चीं " असें म्हणून " मिळणाऱ्या उत्तरानें प्राप्त होणारें ज्ञान, विज्ञानानें मिळणाऱ्या ज्ञानापेक्षां समग्र स्वरू-पांत मिळणारें ज्ञान, " असें कां " हा प्रश्न विचारल्यावांचून मिळणारें ज्ञान, काव्यांत कवि ज्या प्रकारचें ज्ञान देतो त्या प्रकारचें ज्ञान हजार पटीनें चांगलें होय. अशा ज्ञानांत अन्तर्ज्ञान आणि भावना प्रामुख्यानें भाग घेतात. त्या ज्ञानांत पृथक्करण नसतें तर वस्तुचें चिंतन समग्र स्वरूपांत असतें. त्या ज्ञानांत असंतोष नाहीं पण संतोष आहे. त्या ज्ञानांत ज्ञाता–कवि हा ज्ञेय–वस्तुशीं एक-रूप झालेला असतो. तिथें भेद नसतो. वस्तूच्या स्वरूपीं लीन

झाल्यावांचून काव्य निर्मिति अशक्य आहे.

पृथक्करण आहे तिथें अंतर आहे. जिथें पृथक्करण नसतें, पण वस्तुचें साकल्यानें ग्रहण असतें तिथें अंतर राहूं शकतच नाहीं. येथें ज्ञान फार उच्च प्रकारचें असतें. कवि सृष्टीला समजू शकतो तो समभावानें समजू शकतो. भेदावांचून, अंतरावांचून; इतका कीं निसर्गाविषयीं काव्य रचणारा कवि निसर्गमय बनतो. विज्ञान शास्त्री सृष्टीला समजू शकतो तो समभावावांचून, भेदबुद्धीनें अंतरासहित; इतका कीं, निसर्गाविषयीं पुष्कळ ज्ञान मिळविलें असूनहि निसर्ग प्रेमी तो नसेलहि.

पुनः कारणांची चौकशी करणें, " असे कां, तसें कां "—असले प्रश्न विचारणें--याला कांहीं मनाची उत्तम स्थिति म्हणतां येणार नाहीं. मनुष्याला बुद्धि दिली आहे ती मानण्याकरितां, शंका काढण्याकरितां नाहीं. मनाची नैसर्गिक वृत्ति श्रध्येची आहे, संशयाची नाहीं.

ज्ञान हें नेहमींच इष्ट होय. पण तें विज्ञान पद्धतीचें नाहीं तर आतां दर्शविलेल्या पद्धतीचें. जर आपण ईश्वराला ज्ञानस्वरूप कल्पिलें तर त्याच्यांत भेद मुळींच नाहीं; ज्ञाता आणि ज्ञेय एकस्वरूप आहेत. पृथक्करणानें मिळणारें ज्ञान ज्ञात्याच्या मनाची उतरती स्थिति दर्शवितें. त्याच बरोबर त्याची पद्धति कंटाळा उत्पन्न करील अशी आहे.

" असें कां ? "--वर बहिष्कार कां घालूं नये ? जितकें असें कां ? " कमी तितका आनंद अधिक. त्या वांचून मिळणारें सर्व ज्ञान अधिक उच्चतर. काव्य स्वरूप तत्त्वज्ञान आणि विज्ञानस्वरूप तत्त्वज्ञान--या दोघांत पहिल्यालाच मी अगत्याचें समजेन.

## १३

# एक सद्भाग्य

प्रिय वाचक, तुला बहिण आहे का ? जर असेल तर तूं खरोखर भाग्यशाली आहेस, आणि नसेल तर खरोखर भाग्यहीन आहेस. आणि तसा तूं असलास तर तुझ्याविषयी मला वाईट वाटतें; पण तूं भाग्यशाली असावेस असे मी इच्छितों.

भावाबहिणीचा संबंध नैसर्गिक असतो, आणि नैसर्गिक संबंधाना मी नेहमीच चाहतों. असे संबंध आणू म्हणून येत नाहींत, आणि टाळूं म्हटल्यानें टळत नाहींत. ह्या सबंधांची उत्पत्ति निसर्गाच्या स्वाधीन आहे, आणि नाशहि त्याच्याच हातीं आहे. नैसर्गिक रीतीने वागा आणि पाहा कीं नैसर्गिक संबंध नेहमीं टिकतात. इतकेंच नाहीं तर दृढ होतात. हे संबंध जन्माबरोबर उत्पन्न होतात आणि मृत्युबरोबर नाश पावतात. म्हणून त्यांची उत्पत्ति किंवा नाश मनुष्याच्या हातीं नाहीं. अशा संबंधांत आईबापांच्या संबंधाचाहि समावेश होतो. पण त्या संबंधापेक्षांहि भावाबहिणीचा संबंध चांगला असतो. दोन्ही संबंध नैसर्गिक आहेत खरे, पण त्यांच्या प्रकारांत बदल आहे. मातापित्याच्या बरोबरीचा संबंध कांहीं सारखेपणाचा नसतो. भावाबहिणीचा संबंध तसा असतो. मनुष्यमात्राला आईबापांच्या संबंधीं एकप्रकारचा स्वाभाविक संकोच वाटतो. त्या नात्यांत अदब आहे, प्रेम आहे. पण सादर प्रेम आहे; निखालसपणा आहे तो अमुक पद्धतीचा. याच्या उलट भावाबहिणीच्या नात्यांत मनुष्यमात्र संकोचापासून सुटलेला असतो. या नात्यांत मैत्री आहे, निरंकुश, नैसर्गिक स्नेह आहे, सर्व प्रकारचा निखालसपणा

आहे. भाऊ बहिणीचे किंवा बहिण भावाचें हृदय जसें पारखूं शकेल तसें आईबापांना पारखतां येणार नाहीं. या नात्यांत जी मौज आहे ती यांत असलेल्या सारखेपणामुळें, मैत्रीमुळें, स्वातंत्र्यामुळें. सारखेपणा याच संबंधांत असूं शकेल. मैत्री याच संबंधांत असूं शकेल. स्वातंत्र्य याच संबंधांत असूं शकेल. म्हणूनच हा नैसर्गिक संबंध इतर नैसर्गिक संबंधांपेक्षां आनंदप्रद आहे.

या नात्यांत मनुष्याला कोमलतेचें शिक्षण मिळतें. हें नातें स्त्रीस्वभावाचें तादृश चित्र मनुष्याला दाखवितें, आणि तें प्रत्यक्ष अनुभवाच्या भक्कम पायावर. सार्वत्रिक भ्रातृभावाचें बीजारोपण करण्यांत हा संबंध महत्त्वाचा भाग घेऊं शकेल. हा संबंध खोल आहे, पवित्र आहे, स्वार्थरहित आहे, आणि सद्गुणांना पोषक आहे. सभ्यता, रसिकता, कोमलता इत्यादि गुणांचें आनुभविक शिक्षण या नात्यामुळें, गुप्तपणें पण बळकट रीतीनें मिळतें.

ज्याला प्रेमळ भगिनी असेल, जिला प्रेमळ भाऊ असेल, त्यांच्या सद्भाग्याला पार नाहीं. त्यांचें सबंध आयुष्य जरी कदाचित् दुःखानें व्याप्त असलें तरी त्या दुःखाच्या मेघाभोंवती या नात्याची रुपेरी कडा जरूर चमकेल आणि जर सुखी असेल तर तें अधिक सुखी बनेल. मित्रामित्रांतील किंवा पतिपत्नींतील संबंधहि दुःखनिवारक व सुखवर्धक असतात; पण ते कितीहि गाढ असले तरी कृत्रिम होत. क्वचित् ते नैसर्गिक संबंधा सारखे बनतात, पण ते कृत्रिम होत. नैसर्गिक तें नैसर्गिकच.

# १४

# बुद्धिवाद

मनुष्य हा बुद्धिमान प्राणी आहे. बुद्धिमत्तेचा गुण त्याला इतर प्राण्यांहून वेगळा करतो. जन्मतःच प्रत्येक मनुष्याला बुद्धि असते, आणि शिक्षणानें तिला वाढविण्यांत येते. पण बुद्धि धारण करणें आणि वाढविणें म्हणजेच कांही सर्व नाहीं. खरी महत्वाची गोष्ट म्हणजे बुद्धीचा उपयोग करणें ही होय. बुद्धीचा उपयोग न केल्यास बुद्धि असली काय आणि नसली काय सारखीच.

पुष्कळ माणसें जणूं काय बुद्धीला दाबून टाकतात. बुद्धि असूनहि तिचा उपयोग करीत नाहींत. जीवनांत श्रध्धेला स्थान आहे, नाहीं असें नाहीं. पण ती श्रद्धा अंधश्रद्धा तर नसावीच. आणि बुद्धीच्या खास प्रांतांत तिनें शिरतां कामा नये. इतिहास, पुराण, काव्य इत्यादिकांत जे जें कांहीं लिहिलें असेल त्याचें प्रथम बुद्धीनें शोधन करावें आणि मग श्रद्धा ठेवावी. बुद्धीच्या विषयांत तर श्रद्धेवर बहिष्कारच घालायला हवा. विज्ञान शास्त्रांतील निरनिराळीं अंगे केवळ बुद्धीचींच क्षेत्रें होत. त्यांतहि जर श्रद्धेला स्थान देण्यांत आलें तर परिणाम म्हणून अज्ञानाची वृद्धि होईल. युरोपमध्यें प्रथम असें मानण्यांत येई कीं, सूर्य पृथ्वी भोंवती फिरत आहे. हा सिद्धांत खोटा आहे असें आतां सर्वच मानतात, पण एक असा काळ तेथें होऊन गेला कीं ज्या-वेळीं पृथ्वी फिरते आणि सूर्य स्थिर आहे असें म्हणणें नास्तिक-पणाचें समजलें जाई. आणि असें म्हणणाऱ्यांना जबर त्रास सोसावा

लागला. हा परिणाम केवळ श्रद्धेला खोटें महत्व दिल्याचा.

श्रद्धेला अमर्याद मान दिल्यानें त्याचा अनिष्ट परिणाम कसा होतो याचा कटु अनुभव मध्ययुगांत युरोपला येऊन गेला. युरोपीय तत्त्वज्ञान ग्रीस देशांत प्रथम जन्मास आलें आणि वाढलें. सॉक्रेटीस, प्लेटो, ॲरिस्टॉटल, यांनीं जे विचार प्रकट केले ते वर्षानुवर्षे, एक नाहीं दुसऱ्या स्वरूपांत, युरोपमध्यें टिकले. मध्यकालीन युगांत बुद्धीची एकच कसोटी समजली जाई. ती ही कीं **स्थितस्य-स्थापनम्**--जें असेल त्याचें समर्थन करणें, जें कांहीं धर्मपुस्तकांत असेल तें मानणें, इतकेंच नाहीं तर तें योग्य आहे असें बुद्धीनें स्थापन करणें. जुन्या तत्त्वज्ञानाच्या बाबतींतहि तसेंच करणें, आणि तेंहि अमुक हद्दीच्या बाहेर.

अशा प्रकारची मानसिक वृत्ति सबंध युरोपभर सुमारे चार पांचशे वर्षेपर्यंत मध्यकालीन युगांत टिकली. ज्ञानमात्र शाब्दिक ज्ञान बनलें. बुद्धि गोठून गेली, आणि शब्दाच्या अर्थाविषयीं मोठमोठ्या चर्चा सुरू झाल्या. या स्थितींत लोकांची मुक्तता दोन तत्त्वज्ञान्यांनीं केली, एक इंग्रज तत्त्वज्ञ बेकन आणि दुसरा फ्रेंच तत्त्वज्ञ डेकार्ट. दोघांनीं असा सिद्धांत मांडला कीं, श्रद्धेचा बहिष्कार करून बुद्धीला स्वीकारा—बेकनच्या म्हणण्याप्रमाणें अनुभव-बुद्धीला स्वीकारा; डेकार्टच्या म्हणण्याप्रमाणें आंतरबुद्धीला स्वीकारा. अर्थात् तुम्हांला जें सत्य वाटेल त्याचा स्वीकार करा. ॲरिस्टॉटलनें अमुक सांगितलें आणि प्लेटोनें तमुक सांगितलें, आणि ॲरिस्टॉटल वस्तुवादी होता व प्लेटो नव्हता, म्हणून आपण तसें मत धारण करावें—असें म्हणणें दास्यत्वनिदर्शक आहे. अशा विचारकांच्या

जुलुमी सत्तेंतून जोंपर्यंत तुम्ही सुटत नाहीं तोंपर्यंत ज्ञानाची वृद्धि होणार नाहीं. ज्या वेळीं बेकन आणि डेकार्ट यांनीं बुद्धिवादाची अशाप्रकारें तरफदारी केली त्यावेळीं किंवा त्याच्या कांहीं पूर्वी, होकायंत्राचा शोध लावण्यांत आला होता. मुद्रणकलेचाहि शोध लागला होता. आणि या दोन गोष्टींच्या मदतीनें स्वाश्रय, श्रद्धात्याग, बुद्धीची वृद्धि स्वाभाविक रीतीनें होईल असें होतें. होकायंत्राच्या शोधामुळें समुद्रांतील सफरी सोप्या झाल्या. मुद्रणकलेमुळें जुने ग्रंथ पुष्कळांच्या पाहण्यांत आले. आणि ज्ञान हें जें अमुक लोकांचेंच होऊन बसलें होतें, धर्मगुरूंतच विशेषतः पसरलें होतें, तें विस्तृत क्षेत्रांत पसरलें, आणि त्यामुळें तें सहजच टीकेला पात्र बनलें. याच संधिकलांत बेकन आणि डेकार्ट यांनीं आपला बुद्धिवाद रूजू केला. हे दोन तत्त्वज्ञ आधुनिक युरोपीय तत्त्वज्ञानांत पितातुल्य मोजले जातात. त्यांच्या वेळेपासून अंधश्रद्धेचा मृत्यु झाला, आणि तत्त्वज्ञान नवीन आणि लाभदायक क्षेत्रांत वाढूं लागलें.

हिंदुस्तान अद्यापि मध्यकालीन युरोपसारख्या स्थितींत आहे असें म्हटलें तरी चालेल. प्राचीनकाळीं हिंदुस्थानांत जसे महान् विचारवंत होऊन गेले, तसे सबंध जगांत कदाचित् झाले असतील त्या काळीं युरोपांतील मोठा भाग अंधःकारांत होता. इंग्लंडमध्यें तत्त्वज्ञान आणि विज्ञान हीं दोन्हीं बेकनच्या काळानंतर म्हणजे सोळाव्या शतकानंतरच अस्तित्वांत आलीं. त्यापूर्वी किती तरी शतकें हिंदुस्तानांतील मोठमोठ्या विचारवंतांचें गहन विचार होऊनहि गेले होते. या बाबतींत हिंदपुत्र योग्य अभिमान जरूर धारण करूं शकतात. पण त्याचें आतां काय? आतां त्या जुन्या पद्धतीला

सर्वस्वी चिकटून राहणें आणि तिचें समर्थन करणें हें बुद्धिमत्तेच्या उत्तमतेचें निदर्शक खास नाहीं. विज्ञानामुळें पाश्चात्य देश इतके पुढें गेले आहेत. विज्ञान हें त्यांच्या उत्कर्षाचें, सत्तेचें, सुधारणेचें मूळ आहे. हें जाणूनहि आपण जर त्याचा अनादर केला तर तो बुद्धीचा गौरव म्हणतां येणार नाहीं. पुराणांत हें सांगितलें आहे आणि तें सांगितलें आहे, असें म्हणून आतां काय साधणार ? वैद्यक, ज्योतिष, कायदा, सामाजिक रीतिरिवाज–या बाबतींत अगाऊच सर्व नक्की ठरलें आहे, बदल करण्याची जरूरी नाहीं, असें म्हणणें म्हणजे बुद्धीचा अक्षम्य अनादर होय. आधुनिक ज्ञानाची मदत न घेतां प्राचीन ज्ञानावर अवलंबून राहणें हास्यास्पद होय. प्राचीन वस्तुंचें निरीक्षण करावें, पण तें आधुनिक दृष्टीनें. तसें करतांना बुद्धीचा उपयोग करावा आणि स्वतःला असें विचारावें–आपल्या ऋषीमुनींनीं प्राचीन परिस्थितीला अनुकूल असेच विचार स्वीकारले असतील. त्यांतच त्यांच्या बुद्धीचा मोठेपणा होता. आपणहि परिस्थितीला अनुकूल अशा विचारांचा स्वीकार नाहीं का करणार ? जर अशी वृत्ति आपण धारण केली तर देशाची उर्जितावस्था यायला फार वेळ लागणार नाहीं.

शिक्षणाचें प्रयोजन काय ? शिक्षणाचें प्रयोजन मोठ्या व्यापक शब्दांत सांगावयाचें झाल्यास असें सांगतां येईल कीं, मनुष्याला बुद्धीचा उपयोग करायला शिकविणें. झोंपीं गेलेली बुद्धि किंवा झोपवून दिलेली बुद्धि ही बुद्धिच नाहीं म्हटलें तरी चालेल. ती आपल्या जवळ असली काय आणि नसली काय ? रणांगणावरील सैनिकाच्या हातांतील बंदूक त्यानें लपवून ठेवल्यास तो सैनिक

कसला आणि त्याची ती बंदुक कसली ? धनिक मनुष्य गरीबांचीं दु:खें निवारण करण्याच्या स्थितींत असेल, आणि असें असूनहि तो आपलें द्रव्य केवळ बँकेंत ठेवीत असला तर त्याचा पैसा हा त्याचा कसला, आणि गरीबांच्या दृष्टीनें तो धनिकहि कसला ? मेघ पाण्यानें भरलेले असावेत आणि खालीं जमीन सुकत वाळत असावीं, पिकें सुकून जावींत, लोकांनीं त्रस्त व्हावें—म्हणजे मग त्या मेघांत पाणी असले तरी सारखें आणि नसलें तरी सारखेंच. त्याच प्रमाणें परमकृपाळु ईश्वरानें मनुष्याला बुद्धिरूपी रत्न बक्षिस दिलें असूनहि जर मनुष्मानें त्याचा उपयोग केला नाहीं तर तें रत्न काय कामाचे ? कै. अमृतलाल पढीआर यांनीं एके ठिकाणी एक गोष्ट सांगितली आहे, ती येथेहि आपल्या उपयोगीं पडेल. एके प्रसंगी एक पतिपत्नीचें जोडपें रात्रींच्या वेळीं आपल्या खोलींत झोंपलें होतें. आणि त्या वेळीं त्रयस्थ कोणीं बाहेरून घरांत शिरत आहे असें पत्नीला वाटलें. तिनें आपल्या पतीला सांगितलें, "कोणी घरांत शिरत असावेंसें वाटतें." "ठीक." "तो मनुष्य पुढें येत आहे." "मला माहीत आहे." "आतां पेटी जवळ जात आहे, पाहिलेंत ?" "तें मला माहीत आहे." "पेटी उघडली." "मला माहीत आहे." आतां परत फिरत आहे." "तें मला माहीत आहे." "घरांतून निघत आहे." "मला माहीत आहे" "निघाला." "तेंहि मला माहीत आहे." बिचारी पत्नी स्वाभाविकपणेंच चिडून म्हणाली, "आग लागो तुमच्या माहीत असण्याला. तें माहीत असलें काय आणि नसले काय सारखेंच." अर्थात् माहितीचा जर लेश मात्रहि उपयोग केला नाहीं तर ती माहिती काय कामाची ? चोर तर नाहींसा झाला; मग पहिल्या-

पासून जाणल्याचा काय उपयोग ? कांहींच नाहीं. त्याच प्रमाणें आपल्याजवळ असलेल्या बुद्धीचा उपयोग आपण न केला तर ती बुद्धि असली काय आणि नसली काय सारखीच.

पुष्कळ वेळां असें सांगण्यांत येतें कीं, बुद्धिवाद मनुष्याला नास्तिक बनवितो. असें कांहीं नाहीं. बुद्धि देखील मनुष्याला ईश्वरानेंच दिली आहे. तर तिचा उपयोग करण्यांत अधर्म कुठला ? शिवाय वरवर दिसायला जर बुद्धीनें मतभेद उत्पन्न केला तरी गहन दृष्टीनें बुद्धि समाधानहि करूं शकेल.

जुन्याच्या ठिकाणीं श्रद्धा ठेवा. श्रद्धा ठेवणें यांत आर्यत्व आहे. श्रद्धा हा धर्म आहे. श्रद्धेवांचून संशयात्मा नाश पावतो असें गीतेंत म्हटलें आहे. अशा प्रकारच्या वचनांनीं भोळयाभाबड्या लोकांना पुष्कळ वेळां सतविण्यांत येतें. आणि अजूनहि पुष्कळच बाबतींत हिंदुस्तान अंधश्रद्धेच्या स्थितींत आहे. पण जोंपर्यंत बुद्धि–अधिष्ठित श्रद्धा अस्तित्वांत येत नाहीं, तोंपर्यंत इतर श्रद्धा ही श्रद्धाच नव्हे, असेंहि म्हणतां येईल. तें तर दास्यत्व होय. मनुष्याचें, प्राचीन काळाचें, विचारांचें, धर्माचें दास्यत्व स्वीकारणें यांत जर श्रध्दा समाविष्ट होत असेल तर अशा श्रध्देला साष्टांग नमस्कार असो.

जो बुद्धीचा उपयोग करतो तोच धर्माचें रहस्य जाणतो. जो बुद्धीचा उपयोग करतो, तोच प्राचीन विचारांचा मोठेपणा समजू शकतो. जो बुद्धीचा उपयोग करतो, तोच कुठलेंहि रहस्य जाणू शकतो. बाकी सर्व गतानुगतिक न्यायानें चालत आल्याप्रमाणें चालतें. तशा पंथांत चाललें काय आणि न चाललें काय ? त्यांत आपलें स्वत्व कोठें असतें ?

१५

# कांहीं जीवनसूत्रें

हा काळ सत्रांचा नाहीं. आपण सुशिक्षित आहोंत, पुढारलेले आहोंत; विचारपूर्वक आयुष्य घालविण्याचा आपला हेतु आहे. तरी पण म्हणींवर, शास्त्रोक्तींवर, सूत्रांवर पुष्कळ वेळां आपलें वर्तन अवलंबून असतें, ही गोष्ट निःसंशय आहे. जेव्हां कांहीं करण्याचा प्रसंग येतो तेव्हां सारासार विचार किंवा पृथक्करण करणें कठिण किंवा अशक्य असतें. पुष्कळ वेळां तसे करायला वेळहि नसतो. विचार करणें, पृथक्करण करणें, सारासार पाहून वागणें—म्हणजे आयुष्य अरसिक बनविण्या जोगें आहे, शक्य असले तरी अगत्याचें नाहीं. मनुष्यानें विचारांपेक्षां भावनांवर ज्यास्त आधार ठेवावा. आयुष्यांत विज्ञानशास्त्राप्रमाणें न वागतां कवी प्रमाणें वागावयाला हवें. जसा ज्यास्त विचार, तशी ज्यास्त गुंतागुंत, ज्यास्त गोंधळ.

या दृष्टीनें पाहतां म्हणी, शास्त्रोक्ति, जीवनसूत्रें, हीं सर्व फार उपयोगी मानतां येतील.

खालीं दिलेलीं जीवनसूत्रें, आयुष्य उन्नतर बनविण्यांत, सहाय्यक होतील असे खात्रीनें म्हणतां येईल. हीं सूत्रे मनुष्याला सुखी देखील बनावतील. पण ती वैयक्तिक अनुभवाची गोष्ट आहे.

जें कांहीं करावयाचें असेल तें पूर्ण उत्साहानें करा.

× × × ×

ज्या दिशेनें तुम्हांला उत्साह वाटेल त्या दिशेनें खुशाल जा. तुमचें श्रेय त्यांतच आहे.

× × × ×

विसरून जायला शिका. विसरून जाण्यांत उदारपणा आहे. आठवण्यांत नीचपणा आहे.

× × × ×

स्वतःला ओळखा. दुसऱ्याची परीक्षा करण्यापूर्वी आत्मपरीक्षण करा.

× × × ×

मारण्यांत शौर्य नाहीं, सहन करण्यांत आहे. कठोर वाक्यें बोलणें ही दुर्बलता आहे, पण तीं सहन करणें खऱ्या शौर्याचें आहे.

× × × ×

बोलणें हें कांहीं आपलें कर्तव्य नाहीं, पण बोलल्यास प्रिय बोलणें हें आपलें कर्तव्य होय.

× × × ×

जेवढें माहीत असेल तेवढे जिथें तिथें आणि जेव्हां तेव्हां सांगणें ही मानसिक अधमता होय.

× × × ×

मित्रांजवळ आनंदाच्या गोष्टी कराव्यात. कधींहि स्वार्थाच्या गोष्टी करूं नयेत.

× × × ×

आयुष्य इतकें दुःखमय आहे कीं, दुसऱ्यांच्या दुःखाचीं रडगाणीं ऐकण्यांत मनुष्याला स्वाभाविकपणे फार मोठा भार सहन करावा लागतो.

× × × ×

जग वाईट आहे असा अनुभव आल्यास, जगाची निंदा न करितां 'माझ्यांत काय वाईट आहे' असा स्वतःला प्रश्न करावा.

× × × ×

स्वतःवर श्रद्धा ठेवा, म्हणजे यश तुम्हांला मिळेलच.

× × × ×

नाउमेद होण्याचा विचार, हीच नाउमेदी होय. बाकी नाउमेदी नाहीं. श्रमानें सर्व कांहीं साध्य होतें.

× × × ×

संधि कधींहि चुकवूं नये; तरी पण चुकल्यास संधि नेहमीं मिळेल असें मानावें.

× × × ×

गप्पा मारणें हें माणसांना पसंत असतें. पण गप्प राहणें हें ईश्वराला पसंत आहे. गप्पा मारण्यापेक्षां गप्प राहण्यांत विशेष गौरवास्पद आहे.

× × × ×

प्रतिभेचा वारा फार हानिकारक आहे. प्रतिभाहि श्रमानेंच साध्य होते.

× × × ×

मोठें होण्याची इच्छा असल्यास प्रथम मनुष्यानें लहान व्हावें. लहान झाल्यावांचून मोठें कधींहि होतां येत नाहीं.

× × × ×

दास्यत्व हें स्वातंत्र्याचें पहिलें पाऊल होय. जो दास नाहीं तो स्वतंत्रहि नाहीं. स्वछंदी असू शकेल, पण स्वतंत्र नाहींच. दास्यत्व, म्हणजे साधुंच्या साधुपणाचें दास्यत्व, ईश्वरी पुरुषांच्या ऐश्वर्याचें दास्यत्व.

× × × ×

मातापिता, गुरु, आणि राजा—हीं तीन नेहमीं पूज्य आहेत. पश्चिमेकडील सुधारणा कांहींहि म्हणो.

× × ×

दुःखी मनुष्य, गरीब, आजारी, इत्यादिकांचें दुःख गोड शब्दांनीं जितकें कमी होतें तितकें कशानेंहि होंत नाहीं. बोलण्यांत माधुर्य हा ईश्वरी गुण आहे.

× × × ×

शब्दांतहि चमत्कार असतो. कित्येक शब्दांचें नेहमीं चिंतन करा. स्वातंत्र्य, सुधारणा प्रगति, आर्यत्व, पूर्वजांबद्दल मान, प्राचीनाविषयीं सद्भाव—इत्यादि.

+ + + +

आयुष्य नेहमीं रसिक बनवा; म्हणजे ग्लानि--म्लानि कांहींहि राहणार नाहीं. वाङ्मयप्रेम ही सर्व प्रकारें संगोपन करण्याजोगी गोष्ट आहे.

+ + + +

हंसावेंसें वाटल्यास हंसा, बस खूप हंसा. रडावेसें वाटल्यास रडा, वाटेल तितकें रडा दोन्हीं कामें निर्भयतेनें करा, आणि तुम्हांला सुख मिळेल. जो लाजेल तो सुकेल.

+ + + +

मनुष्य जें कांहीं करतो तें शुद्ध अन्तःकरणानें करतो असें माना. मानतां नाहीं आलें तरी माना. हेतु शोधण्याच्या वृत्तीला दाबून टाका.

× × × ×

उद्योगी बना, उद्योग हा धर्म आहे. उद्योगाच्या अभावीं पुष्कळ अनर्थ उत्पन्न होतात.

× × × ×

स्वातंत्र्याचें वारें मनांतून काढून टाकावें. जगांत कोणींच स्वतंत्र नाहीं.

× × × ×

मनुष्याला एका रीतीनें मारावें. उपकारानें.

× × × ×

अपराध्यांना क्षमा करा. तिरस्कारापेक्षां क्षमा अधिक नवळ सुधारक तत्त्व आहे.

× × × ×

गैर समजुतींत जितका आनंद आहे तितका समजुतींत नाहीं. जोंपर्यंत आनंद मिळत असेल तोंपर्यंत गैरसमजुतीचा गाडा ढकलीत असावें

× × × ×

सुख दुःख मात्र मानसिक आहे. पैसा ? पैसा तर पायताणा प्रमाणें होय. कीर्ति ? कीर्ति कांहीं गुणांच्या प्रमाणांत नसते. कुटुंब ? बरें वाईट ही केवळ भाग्याची गोष्ट आहे. मित्र ? आहेत कोठें ? आणि असले तरी ते दुःखी मनुष्याला सुखी बनविण्याला समर्थ नाहींत. ज्याच्या आयुष्यांत अलोट धैर्य आणि शांतिरस ओथंबलेला असेल त्याला दुःखाचा दावानल कधींहि भाजू शकणार नाहीं.

+ + + +

जगांत मला कांहींहि नको. जें येईल तें मी भोगीन—अशी वृत्ति धारण करणारा मनुष्य जगाला दास बनवू शकतो.

१६

# सद्वर्तनाचें बळ

प्रत्येक मनुष्यांतील मानसिक आणि नैतिक गुणांचा समुदाय त्याला इतर मनुष्यांपासून वेगळा पाडीत असतो. या गुणांच्या समुदायानें त्याचें व्यक्तित्व बनलेलें असतें. सर्व मनुष्यांत सारखी बुद्धि नसते. जन्मतःच कित्येक कुशाग्रमति असतात, आणि कित्येक मंदधी असतात. बुद्धीचा विकास प्रयत्नानें करतां येतो, पण त्यालाहि मर्यादा आहे. नैसर्गिक रीतीनेंच एखाद्यांत बुद्धीचें भांडवल कमी असलें, तर त्याच्यावर उभारलेली इमारत साधारणच होणार, भव्य होण्याची इच्छा मृगजलाप्रमाणें होय: पण प्रत्येक मनुष्याची नीति मात्र त्याच्या स्वतःच्या स्वाधीन असते. नीतिमान् होण्याकरितां अक्कल किंवा नैसर्गिक शक्तींची जरूरी नाहीं; फक्त शुद्ध हृदय अवश्यक आहे. असें असल्यानें नीतिगुणांच्या समुदायानें तयार होणारें व्यक्तित्व हें फार अगत्याचें होय.

बुद्धिमान् स्त्रीपुरुषांना पाहून आपणाला असें वाटेल, "ओहो! किती सुंदर बुद्धि! किती उच्च शक्ति! त्यांच्यांत आणि माझ्यांत केवढें अंतर!" नीतिमान् स्त्रीपुरुषांना पाहून फक्त अशा उद्गारांनींच आपण नाहीं थांबणार. त्यांच्या विषयीं आपणाला पूज्यभाव वाटेल, त्यांच्याकडे आपण आकर्षिलें जाऊं. याचें मुख्य कारण असें कीं, बुद्धिमान व्यक्तींच्यामुळें आपण दिपले जातों पण त्यांच्यावर आपला विश्वास बसत नाहीं. श्रद्धा, विश्वास, पूज्यभाव—या सर्वांकरितां समोरचा मनुष्य आपली शक्ति अमुक

चांगल्या रीतीनेंच वापरील अशी आपल्या मनांत खात्री असाव-याला हवी. नीतिविरहित बुद्धि सुकाणूवांचूनच्या जहाजाप्रमाणे होय. नीतिविरहित बुद्धि नियंत्रकविरहित दुचाकीप्रमाणे होय. नीतिविरहित बुद्धि लगामावांचूनच्या घोड्याप्रमाणें होय. वारा वाटेल त्या दिशेनें त्या जहाजाला खेंचून नेऊं शकेल. रस्त्यांतील उतार वाटेल त्या दिशेनें दुचाकी घेऊन जाईल. मनांतील तरंग घोड्याला वाटेल तिकडे नेतील. सुकाणू, लगाम, नियंत्रक—हे निरनिराळया जातीचे अंकुश होत. बळ वाटेल तितकें असूनहि त्यावर अंकुश नसेल तर तें निरुपयोगी होय; निरुपयोगीच नाहीं तर हानिकारक होय. जितकें अधिक बळ असेल आणि जितका त्यावर अंकुश नसेल तितकें तें अधिक हानिकारक. हत्तीसारखा प्राणी अंकुश नसेल तर किती भयंकर ठरेल ! मनुष्याची बुद्धि ही मोठी शक्ति आहे, आणि म्हणूनच फार हानिकारक होण्याचा संभव आहे. नीतिवांचून ती अंकुशरहित असल्याप्रमाणें आहे. नीतिवांचूनच्या बुद्धीवर विश्वास ठेवणें अशक्य आहे

नीतीला अशा रीतीनें अंकुश म्हटलें, तर त्याचा अर्थ असा होतो काय की, नीति हानिकारक गोष्टींना अंकुशांत ठेवण्या-च्याच फक्त कामाची आहे ? नाहीं, नाहीं, तसें नाहीं. नीति ही कांहीं उच्छेदक किंवा विरोधक शक्ति नाहीं; ती साधक शक्ति पण आहे, पोषक शक्ति पण आहे; आणि तसे असल्यामुळेंच ती एक अगत्याची शक्ति आहे.

नीतिबळ अजब कार्य करूं शकतें. सुप्रसिद्ध इंग्रज राजनीतिज्ञ पिट असें म्हणे कीं, “ मला माहीत आहे, माझ्यावांचून कोणींहि

माझ्या देशाचें रक्षण करूं शकणार नाहीं." जशी त्याची स्वतःच्या ठिकाणीं श्रद्धा होती, तशीच देशाची त्याच्या ठिकाणीं होती. किती अलोट शक्ति ! जॉर्ज वॉशिंगटनचें नांव आपणां सर्वांना माहीत आहे अमेरिकेच्या स्वातंत्र्ययुद्धाच्या वेळीं त्यानेंच आपल्या देशाचें रक्षण केलें. त्याचें बुद्धिबळ कांहीं अनुपम नव्हतें; पण त्याचें आयुष्य सरळ होतें, त्याचें देशप्रेम जबर होतें, आणि त्याची नीति इतकी चांगली होती कीं, साऱ्या देशाला त्याच्या नीतिबळानें स्वतःच्या आंकित केलें होतें. त्याच्यावर त्याच्या प्रजेची केवढी श्रद्धा होती ती जाणावयाची असल्यास एक लहान गोष्ट पुरेशी आहे. इ. स. १७९८ सालीं फ्रान्सदेश अमेरिकेशीं युद्ध करील अशी अमेरिकन लोकांना भीति वाटत होती. त्यावेळीं वॉशिंगटन यानें वानप्रस्थाश्रम स्वीकारला होता; आयुष्यांतील प्रवृत्तींपासून मुक्त होऊन तो विश्रांति घेत होता त्या वेळचे अमेरिकेचे अध्यक्ष प्रेसिडेंट ॲडम्स यांनीं त्याला पत्र लिहिलें, " आपली परवानगी असल्यास आपल्या नांवाची आम्हांला जरूरी आहे. मोठ्या सैन्यापेक्षांहि आपल्या नांवांत ज्यास्त शक्ति आहे. " केवढें जबर बळ ! पुष्कळ सैन्यांच्या बळापेक्षां एका मनुष्याच्या नांवाचें बळ अधिक ठरावे ना ! ठरलेंच. त्यावांचून अध्यक्ष ॲडम्स असें कशाला लिहितां ? नवा व्यापार, नवी कंपनी, यांच्या सुरवातीस लोक काय पाहतात ? त्यांचे सूत्रधार कोण आहेत, त्यांची नीति कशी आहे, त्यांचें वळण कशा प्रकारचें आहे—हें पाहण्यांत येतें. केवळ योग्यता कोणीं पाहात नाहीं. नीति देखील लोक पाहतात आणि तिच्यावर विशेष भर देतात. जिथें असें होत नाहीं तिथें थोड्याच कालावधिनंतर कटु अनुभव येऊं लागतात.

या बळाचें कारण काय ? हा प्रश्न विशेष अगत्याचा आहे. खरे पाहिलें असतां या बळाचें प्रयोजन सांगणें अशक्य आहे. प्रख्यात अमेरिकन लेखक इमर्सननें म्हटल्याप्रमाणें कारण सांगतां येणारच नाहीं. तुम्ही पाहतां कीं शक्ति आहे तेंच कारण. ज्याच्या ठिकाणीं हें बळ असेल तोच याचें कारण, मनुष्यच कारण. गुरुत्वाकर्षणाच्या शक्तींचें कारण विचारल्यास काय उत्तर मिळेल ? कांहींच नाहीं. त्याचें गुरुत्व. त्याच प्रमाणें येथेंहि केवळ महत्ता किंवा गुरुत्व आहे असें म्हणणें भाग आहे. इमर्सन म्हणतो कीं, बलवान् व्यक्तींच्या समोर बलहीन व्यक्ती जणूं काय निद्रावश होतात; मोठी व्यक्ति लहान व्यक्तीला दिपवून टाकते. समोरच्या माणसांत कांहीं शक्ति नाहींच असें वाटतें. तरी पण या उत्तरानें आपलें संपूर्ण समाधान होणार नाहीं. कांहीं तरी कारणें सांपडलींच पाहिजे. या कारणांत दोन मुख्य आहेत. एक हें कीं, नीतिबळ धारण करणारा प्रत्येक मनुष्य निर्भयपणें जें बोलतो तें करतो, वाणींत न ठेवतां आचरणांत आणतो. त्याच्या विचार, उच्चार आणि आचारांत ऐक्य असतें. दुसरें कारण हें कीं, त्याच्या ठिकाणीं विशिष्ट प्रकारची स्वतंत्रता असते, कोणावरहि तो अवलंबून नसतो, त्याचें आयुष्य स्वयंनिर्णीत असतें.

स्वातंत्र्याचा गुण सद्वर्तनाच्या बळाला खरोखर पोषक आहे. आयुष्यांत जी जी व्यक्ति पराधीन असेल तिच्यावर कोणाचा विश्वास बसेल ? ती व्यक्ति काय पराक्रम गाजवू शकणार ? अधीनता मनुष्याला नसावाचि असें मी म्हणत नाहीं. अधीन रहा. पराधीन रहा. परतंत्र बना. पण ती अधीनता, पराधीनता, परतं-

व्रता सत्यावरच अधिष्ठित असावयाला पाहिजे. परक्या व्यक्तीवर, परक्याच्या मतांवर, परक्याच्या इच्छेवर जो अवलंबून असेल तो कोणत्याहि प्रकारचें बळ धारण करूं शकणार नाहीं. साधुच्या आयुष्यांतील बलाचा मोठा भाग त्याच्या स्वातंत्र्यांत असतो. हें स्वातंत्र्य म्हणजे कांहीं स्वेच्छाचार नाहीं. परनिंदाहि त्यांत येत नाहीं. दुसऱ्याबद्दल अनादरहि त्यांत नसतो. तरी पण स्वतःचे विचार, स्वतःची शक्ति यांवर उचित श्रद्धा, आणि दुसऱ्यांची खोटी खुशामत किंवा त्यांचें दास्यत्व यांशीं विरोध या स्वातंत्र्यांत असतो. प्रख्यात तत्त्वज्ञानी एपिक्टिटस आणि एक वकील यांमधील संवाद या बाबतींत मनन करण्याजोगा आहे. एक मोठा वकील स्वतःचा दावा चालविण्याकरितां रोम येथें जात होता. वाटेंत एपिक्टिटसाला भेटून तो कसा आहे हें पाहण्याची त्याला इच्छा झाली. म्हणून तो एपिक्टिटसजवळ गेला. एपिक्टिटसानें त्याचें साधारण प्रतीचें स्वागत केलें आणि त्याचें कारण त्यानें त्या वकीलाला असें सांगितलें कीं, “ माझे सिद्धांत काय आहेत ते जाणण्याची तुम्हांला अपेक्षा नसल्यानें तुम्ही माझ्या शैलीवरच टीका कराल ” तो वकीलहि मोठा वक्ता होता. तो म्हणाला, “ ठीक. जर मीं अशा गोष्टींकडे लक्ष दिलें तर मी तुमच्यासारखा गरीब राहीन; आणि मग माझ्याजवळ सोनें—रूपें, सहचर, जमीन कांहींच राहणार नाहीं. ” त्यावर एपिक्टिटसनें उत्तर दिलें, “मला अशा वस्तु नकोत. आणि विशेष हें कीं माझ्या पेक्षांहि तुम्हीं गरीब आहांत. आश्रयदाता असो कीं नसो-त्याची मला काय पर्वा ? तुम्हांला ती आहे. आणि म्हणून तुमच्यापेक्षां मीच श्रीमंत

आहे. सीझरचें माझ्याविषयीं काय मत आहे याची मी पर्वा करीत नाहीं. मी कोणाची खुशामत करीत नाहीं. तुमच्या सोन्यारुप्याच्या बद्दल माझ्याजवळ हें आहे. भांडीं तुमच्या जवळ रुप्याचीं आहेत, पण विचार, सिद्धांत, इच्छा, मातीच्या आहेत. माझें मन हें माझें राज्य आहे. " साधु पुरुष स्वतंत्र असतात, आणि त्यांतच त्यांच्या बळाची किल्ली असते, हें या लहानशा संवादाचे सार होय.

तात्पर्य, साधु पुरुष आपल्या मनाचा मालक असतो. आणि जो मनाचा मालक असतो तो दुनियेचाहि मालक असतो. इच्छा त्याच्या असतात, तो इच्छांचा नसतो.

१७

# सद्वर्तनाची वाढ—बाह्य वस्तूंच्या मदतीनें

सद्वर्तनाची वाढ दोन प्रकारच्या वस्तूंनी साध्य होते; बाह्य आणि आंतर.

ज्या बाह्य गोष्टी सद्वर्तनाला पोषक होतात त्यांत मुख्यत्वें-करून घर, पुस्तकें, संस्था, समाज, आणि संगतीचा समावेश होतो विशिष्ट कुलांतील जन्म आणि वंशपरंपरेनें मिळणारी चारित्र्य-तत्त्वें देखील सद्वर्तनाच्या वाढीला उपयोगीं पडतात.

**गृह**:- आई, बाप, भाऊ, बहिण, नातेवाईक, ओळखीचीं माणसें, घरांतील नोकरचाकर, इत्यादि सर्व मंडळी चारित्र्य बनवि-ण्याच्या कामीं थोडी फार मदत करतात.

मूल जन्माला येतें तेव्हापासून त्याला सर्वांत जास्त सहवास त्याच्या आईचा असतो. आणि तेव्हांपासूनच त्याच्या आईच्या बऱ्या वाईट वर्तनाचा परिणाम त्याच्यावर होतो असें म्हटल्यास अति-शयोक्ति होणार नाही. त्याच्या शिक्षणाला केव्हांपासून सुरवात करावी असा पुष्कळ वेळां अज्ञानी लोक प्रश्न कारितात, पण त्या प्रश्नांत कांहीं अर्थ नाही. मूल हंसायला—रडायला जेव्हांपासून लागतें तेव्हांपासून त्याला एक प्रकारचें शिक्षण मिळतच असतें

जर देशाची सुधारणा करावयाची असेल तर स्त्रियांना शिक्षण द्या, या नेपोलियनच्या सूत्राची येथें आठवण होते. नेपोलियन

मोठा योद्धा होता. एके वेळीं त्यानें सबंध यूरोपला एकट्यानें हलवून सोडलें होतें. त्याचा स्वभाव उग्र होता. नियमन हें काय असतें ह्याचें त्याला भान नव्हतें. तरी पण स्वतःवर तो जो ताबा ठेवूं शकत असें तो त्याच्या आईकडून मिळालेल्या संस्कारामुळें होता. ह्याच्या उलट इंग्रज कवि बायरनसारख्याचें जीवन पाहिल्यास त्यांत काय दिसतें ? बायरनची आई त्याच्यावर रागवत, रुसत असे. त्याच्यांत असलेल्या एखाद्या नैसर्गिक खोडीबद्दल ती त्याला शिक्षा देत असे. पुष्कळ रागावल्यावर बायरनची आई बायरनच्या मागें धांवत असे. आणि अशा वेळीं हातांत जें येईल तें ती त्याला फेंकून मारीत असे. अशा चिडक्या आईचा परिणाम मुलावर कसा होणार ? मूल देखील चिडकेंच होणार. तें मोठें झालें तरी लहानपणीं मनाला लागलेलें वळण तसेंच राहणार; आणि बिचाऱ्या बायरनच्या बाबतींत असेंच झालें. बायरन स्वतःच्या विषयीं एका काव्यांत कबूल करतो कीं, " लहानपणीं क्रोध कसा नियमांत ठेवावा हें मला शिकवण्यांत आलें नव्हतें. आणि म्हणून माझी जीवन—सरिता लहानपणापासून विषारी बनली आहे. "

घरांतील दुसऱ्या व्यक्तींचा सहवासहि असाच परिणामकारक असतो, फरक इतकाच कीं त्या व्यक्तींना बालकाबरोबर राहण्याचा प्रसंग मातेपेक्षां कमी येतो. ज्या घरांत आई चिडकी, बाप भांडखोर, भाऊबहिण कंकाशी, आणि इतर व्यक्ती अनियमितपणें वागणाऱ्या असतील तिथें बालकाचें कोवळें मन किती दूषित बनत असेल याची कल्पना करतांना अंगावर शहारे येतात. पतिपत्नींमध्ये जिथे शिवीगाळ किंवा मारामारी होत असेल तिथें आई किंवा

बाप आपल्या मुलांवर कोणत्याहि प्रकारचा ताबा ठेवू शकत असेल, याची आशा व्यर्थ होय. सद्वर्तनरूपी वृक्षाच्या मुळाशीं अशा जागी, विषाचें पाणी ओतून त्याला मोठा करण्यांत येतो. फळें मधुर कशीं येणार !

श्रीमंत लोकांच्या घरांत मुलांचें बरेचसें काम नोकराचाकरां-कडून करविण्यांत येते. यांत अस्वाभाविक कांहींच नाहीं. पण हलक्या वर्गांत साधारणपणें माणसें असभ्य असतात. त्यांचे बोलणें—चालणें उच्च संस्कार निर्माण करीत नसेल तर न करो. पण निदान वाईट संवयी त्यांच्या कडून मुलांना जडतात, इकडे तरी आईबापांनीं लक्ष द्यावें.

**पुस्तकें**—पुस्तकांचें वाचन चारित्र्य बनविण्याच्या कामी फार उपयोगी पडतें. जसजसें शिक्षण वाढत जातें तसतसे त्याचें बळ वाढत जातें. चांगलीं पुस्तकें चांगला परिणाम करतात, आणि वाईट पुस्तकें वाईट. जें कार्य आपल्या मित्राकडूनहि होणार नाहीं तें कार्य पुस्तकें करतात. लेखक वाचकाला जें कांहीं सांगतो तें निर्भयपणें सांगतो. वाचक राव असो कीं रंक असो, मित्र असो कीं शत्रु असो, पुरुष असो कीं स्त्री असो, कोणा-चीहि पर्वा न करतां स्वतःला जें कांहीं सांगावयाचें असेल तें तो सांगतो.

इरॅस्मस पुस्तकांना जीवनाकरिता अवश्यक वस्तु समजतो. आणि कपडयालत्याला चैनीच्या वस्तु समजतो. पश्चिमेकडील जडवादाच्या प्रबळ परिणामामुळे हल्लीं काय दिसतें, तें सांगण्याची कांहीं जरूरी आहे ? पुस्तकांचें वाचन मनुष्याला वेदपाठी अव्य-

वहारिक बनवील. त्यांत सुखाची आशा नाहीं. व्यापार रोजगार, हिंडणें, फिरणें, नेसणें, पांघरणें, यांकडे जर विशेष लक्ष असेल तर आधुनिक प्रगतींत मौज आहे. अशी मान्यता सर्वसाधारण आहे. पुष्कळशीं शिष्ट मंडळींहि चांगल्या चांगल्या पुस्तकांच्या बाबतींत दुर्लक्ष करीत असलेलीं दिसतात. ही शोचनीय गोष्ट होय. जो मनुष्य आयुष्यांतील सर्वांना अमूल्य मोजतो, आणि ज्याला चांगलीं कृत्यें व चांगलें अनुभव मिळविण्याकरितां आयुष्य ही एक ठेव वाटते, तो तर निराळ्या रीतीनें वर्तेल. प्रख्यात प्युरिटनपंथी बॅक्स्टर यानें मृत्युमुळें कोणत्या वस्तु तो गमावील या विषयीं सांगतांना पुस्तकांचें नांव सांगितलें. मृत्युमुळें पुष्कळ गोष्टी नाहींशा होतील त्या बरोबर पुस्तकांचें वाचनहि नाहींसें होईल, हें पाहून त्याला खेद होत असें.

पुस्तकें जातजातीचीं असतात. पसंतीवांचूनचें वाचन चांगलें वर्तन निर्माण करील ही आशा व्यर्थ आहे. प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें नीतिशिक्षण देणारीं पुस्तकें नेहमीं लाभदायक असतात. प्रत्येक देशाच्या साहित्यांत तत्त्वज्ञान, काव्य आणि इतिहासाचीं पुस्तकें उत्तमांत उत्तम होत. पण साधारपणें तरुणांना कादंबऱ्या किंवा गोष्टी वाचण्याची गोडी असते. कल्पित कथा वाचणें हें अनेक दृष्टीनें हानिकारक आहे. फारच थोड्या कादंबऱ्या उच्च प्रकारच्या नीतीला पोषक असतात. वाचकांना गोडी लावणें आणि समाजाचें खरेंखुरें चित्र रंगविणें—याच गोष्टी कादंबरीकार लक्षांत ठेवतो. पण कादंबऱ्यांत पुष्कळ वेळां भडक चित्रें असतात. कादंबरीचा विषयच जणूं कांहीं एकच म्हणजे प्रेम हा असावा

असें वाटतें. ' ती सुंदर होती आणि तो तिच्या प्रेमपाशांत अडकला ' अशा सुरावर साऱ्या कादंबऱ्या लिहिल्या जातात. वाचकांसमोर जें पात्र वाढण्यांत येतें त्यांतील अन्न जरूरीचें व पोषक नसतें, तर सर्वच मिष्टान्न असतें. अपवादरूपानें चांगल्या कादंबऱ्या आढळतील—गुजरातींत सरस्वतीचंद्र आणि इंग्रजींत मेरी कॉरलीच्या कादंबऱ्या वगैरे. पण हे अपवादच. आणि वाचकहि याचे फार थोडे आसतात.

**संस्था**—ज्या ज्या संस्थांतून मनुष्यानें शिक्षण घेतलें असेल त्या त्या संस्थांवर देखील त्याचें चारित्र्य अवलंबून असतें. संस्था जातजातीच्या असू शकतात. त्यांत शाळा, कॉलेज, आश्रम वगैरे मुख्य होत.

प्राचीन काळीं शिष्य गुरुच्या घरीं जाई आणि तिथें राही. स्वाभाविकपणें गुरुच्या नीतीचा परिणाम त्याच्यावर होई. हल्लींच्या शिक्षणसंस्थांतून अशा प्रकारचा परिणाम होणें अशक्य आहे. तासातासानें शिक्षक बदलणाऱ्या शाळांतून गाढ संबंध कसा येणार ? अशा परिस्थितींत शिक्षक नीतिपोषक कसा होणार ?

तरी पण ज्या शाळांतून वसतिगृहें असतात तिथें विशेष लाभ होण्याचा संभव आहे खरा. वसतिगृहांतील मुलांचा आणि त्यांच्यावर देखरेख ठेवणाऱ्या शिक्षकाचा पुष्कळ संबंध येतो. आणि जर तो शिक्षक आपलें काम काळजीपूर्वक करणारा असेल तर वसतिगृहांचा हेतुहि साधला जातो. बाकी वसतिगृहांत राहून वर्तन बिघडण्याचाहि संभव कांहीं जसा तसा नसतो. विद्यार्थी वसतिगृहांत राहण्याचे पसंत करतात याचे कारण त्यांना स्वतंत्र

जीवन तिथें मिळतें हें होय. वसतिगृहांत आईबाप किंवा नातेवाईक मंडळींचा दाब असणें शक्य नाहीं. एक प्रकारच्या कौटुंबिक आणि सामाजिक बंधनांच्या पिंजऱ्यांतून सुटल्यासारखें विद्यार्थ्यांना वाटतें. खाणें, पिणें, नेसणें पांघरणें, अनेक संवयीं जडवून घेणें या बाबतींत तीं अंकुशरहित बनतात; आणि शेवटीं बेछूट व रंगेल होतात. त्यांच्यावर कांहीं अंकुश असेल तर तो देखरेख ठेवणाऱ्याचा. त्या शिक्षकानें जर काळजी घेतली तर यांपैकीं कसलेंहि भय राहणार नाहीं. पण हल्लींच्या काळांत मातापितरांच्या इतकी काळजी शिक्षकाला असणें शक्य नाहीं. व ती नसतेहि. जर ती तशी असेल तर तो आदर्श आणि पूजनीय शिक्षक ठरेल.

आश्रम आणि गृहांकडे नजर टाका. प्रत्येक समाजांत ज्या प्रमाणे दोष आहेत त्या प्रमाणें हिंदु समाजांतहि आहेत. वैधव्य आणि त्या स्थितींतील दुःखाविषयीं विचार केला असतां आपल्या शास्त्रकारांनीं आणि समाजानें स्त्रियांना पुरेसा न्याय दिला आहे, असे पुष्कळांना वाटणार नाहीं. हें दुःख आणि पराधीनता दूर करण्याच्या हेतुनें हल्लीं विधवांकरितां आश्रम स्थापन करण्यांत येत आहेत. आश्रमांचा उद्देश ज्याप्रमाणें विधवांना उदरनिर्वाहाचीं साधनें मिळवून देण्याचा असतो त्याप्रमाणें त्यांचें शीलही शुद्ध ठेवण्याचा असतो. उत्तम उपदेशकांच्या उपदेशानें आणि सहवासानें ही संस्था उत्तमांत उत्तम बनवितां येईल. संस्थेचा मुख्य अधिकारी, त्या अधिकाऱ्याचा जीवनक्रम, आश्रमांत येणाऱ्या विधवांचा कार्यक्रम या गोष्टीं आश्रमनिवासी विधवांच्या वर्तनावर परिणाम करतात.

**समाज आणि संगत**:—सद्वर्तनाच्या बाबतींत या दोन बाह्य साधनांत अनेक गोष्टींचा समावेश होतो. मुख्यत्वेंकरून समाजाची साधारण परिस्थिति समाजांतील हिरण्याफिरण्याची साधनें, आनंदाची साधनें, नाटक, सिनेमा वगैरे, पति, पत्नी, मित्र--या सर्वांविषयीं आपलें लक्ष वेधलें जातें.

मानवी समाजावांचून मनुष्य असणें शक्य नाहीं. मनुष्य हा एक सामाजिक प्राणी आहे. ज्या अर्थी हा समाजांत राहतो त्याअर्थी समाजाच्या बऱ्यावाईटपणावर त्याचें जीवन अवलंबून असतें.

समाजांतील लहान लहान गोष्टी पण त्याच्या आयुष्यावर परिणाम करतात. समाजांतील करमणूकीचीं साधनें मनुष्याला विशेषकरून आपल्या अंकित करतात. ह्या बाबतींत आधुनिक नाटक सिनेमांचा विचार आपल्या मनांत सहज येतो. नाटक--सिनेमांत चांगले आदर्श थोडे आणि दोष मात्र फार अशी स्थिति असते. लोक नीति पेक्षां अनीतिच शिकून जाण्याचा जास्त संभव असतो. जी गोष्ट कादंबऱ्याची तीच नाटकांची सांगतां येईल. उत्तम नाटक लिहिण्यांत आणि करण्यांत उच्च कलेची जरूरी असते. पण येथें पहावें तो जी कला " वन्समोर " अनेक वेळां मिळवितें ती उत्तम कला असें समजलें जाते. अशी स्थिति जो पर्यंत राहील तो पर्यंत सुधारणा लवकर होणें शक्य नाहीं. आपल्या समाजाला आवश्यक असणारे आदर्श ज्यांत रंगविले आहेत अशीं नाटकें गुजरातींत कितीं आढळतील ? मोठ्या दुःखानें कबूल करणें भाग आहे कीं एकही नाहीं.

सिनेमाच्या साहाय्यानें ज्ञान मनोरंजक करतां येईल, पण सिनेमा--चालक लोकांना ज्ञान देऊं इच्छित नाहींत. त्यांचा उद्देश

पैसे कमविण्याचा असतो, पण तसें करतांना लोकांची नीति बिघडविणारीं दृश्यें त्याज्य समजावयाला हवींत. मारामारी, धांवपळ, स्त्री पुरुषांतील गुप्त प्रेम-प्रसंग, कट, अनीतिमय आचरण-इत्यादिकांच्या दृश्यनीं चलच्चित्रपट आकर्षक केले जातात. ही वस्तुस्थिति आहे. ऐतिहासिक आणि उत्तम प्रकारचीं कथानकें क्वचित्‌च कांहीं कंपन्या दाखवितात.

समाजांतील अत्यंत गाढ संबंध म्हणजे पतिपत्नींतील आणि मित्रामित्रांतील होय. स्वभाव आणि शिक्षणाच्या बाबतींतील साम्यावांचून एकमेकांच्या वर्तनावर उत्तम परिणाम होणें शक्य नाहीं. ज्या देशांत शारीरिक व मानसिक दृष्टया एकमेकांना प्रतिकूल असणारीं जोडपीं असतील, त्या देशांत पतिपत्नींचें संबंध आदर्शभूत कोठून असणार ? विलाप करीत असतां अज स्वतःच्या पत्नीविषयीं—गृहिणी सचिवःसखी मिथःप्रिय शिष्या ललिते कलाविधौ—अशा प्रकारचें उत्तम विचार प्रदर्शित करतो जी स्त्री आपल्या पतिची मैत्रीण आणि सल्लागार असेल, तिच्या छत्राखालीं असलेलें घर दुःख किंवा अनीतीनें पीडलें जाणें अशक्य आहे. पण आपल्या देशांत किती स्त्रिया मन्त्री आणि सखीपद उपभोगीत असतील ? उलट किती पुरुष मन्त्री आणि मित्राचें पद धारण करीत असतील ?

मित्राचें स्थान अगदींच निराळें आहे. एखादा नातेवाईक किंवा एखादा अधिकारी जें काम करूं शकत नाहीं तें काम मित्र करतो. मित्राजवळ मनुष्य निःसंकोचपणें आणि आनंदानें स्वतःचें हृदय खुलें करतो. मित्र मित्राचें दोष सर्वांत आधीं पाहूं शकतो. त्या प्रसंगीं चांगले मित्र जर स्वतःच्या मोठ्या अधिकाराचे पवित्र

कर्तव्य बजावूं शकले तर ते दुसऱ्याचें आयुष्य नेहमीं करितां सुधारु शकतात. प्रख्यात इंग्रज लेखक डॉ पेली हा कॉलेजांत होता तेव्हां पासून फार चंचळ होता. आणि एके प्रसंगी तो आळशी, उधळया आणि अनीतिमान बनण्याच्या बेतांत होता त्या प्रसंगी त्याच्या सच्च्या मित्रानें उपदेशादाखल त्याला एवढेंच सांगितले, " पेली, तुझ्या विचारानें मला रात्रीं झोपहि आली नाही. तूं किती मूर्ख आहेस त्याचा मी विचार करीत आहें. दुराचरणाचीं माझ्याजवळ साधनें आहेत, आणि मी आळशी राहिलों तरी तें मला चालण्याजोगें आहे. तूं गरीब आहेस आणि तुला तुझें सध्याचें वर्तन पत्करणार नाहीं. प्रयत्न केला तरी मला तुझ्या सारखें वागतां येणार नाही. कारण कीं माझें वर्तन चांगलें निश्चित ठरुन गेलें आहे. तुला वाटेल तें करता येईल. सबंध रात्र तुझ्या मूर्खपणाविषयीं विचार करण्यांत मी निद्रेवांचून काढली आहे. आणि आतां तुला गंभीरपणें सुचना द्यायला मी आलों आहें. खरोखर जर तूं तुझ्या आळशी आयुष्यांत मग्न राहशील आणि असेंच चालू ठेवशील तर मला तुझ्या सोबतीचा अगदी त्याग करावा लागेल " त्याच क्षणापासून पेलींत बदल झाला. ज्याला असा मित्र मिळेल त्यानें स्वतःला ईश्वर मिळाला, असें स्वतःचें मोठें भाग्य समजावें. एरवीं वाहवा करणाऱ्या, खुशामत करणाऱ्या आणि उपऱ्या मित्रांचा तुटवडा कोठें आहे ? असें मित्र नसले तर खुशाल नसोत. त्यांच्यापासून हानिच होतें.

**आनुवंशिक तत्वें**:—आधुनिक शास्त्रीय शोधांप्रमाणें चरित्र्याच्या वाढींत आनुवांशिक गुणांचाहि मोठा परिणाम होतो. जन्म-

तःच कांहीं मुलें मंद व वाईट वळणाचीं असतात. हीं वळणें नाहींशीं करतां येतात किंवा वाढवितां येतात. पण हें शिक्षणाचें काम आहे. कै. गोवर्धनराम यांनीं आपल्या सरस्वतीचंद्रांत असें मत प्रदर्शित केलें आहे कीं, मूल गर्भावस्थेंत असतें तेव्हां पासून त्याच्या भावी वर्तनाचें संस्कार त्याच्यावर पडू लागतात. माते प्रमाणेंच पित्याचें गुणाहि प्रत्येक मुलाला वारसारुपानें जन्मतःच मिळतात. या गुणांपासून चारित्र्यावर होणारा परिणाम आणि वर दर्शविलेल्या इतर बाबतींपासून होणाऱ्या परिणामांत एक भेद आहे तो असा कीं पहिला परिणाम मनुष्याच्या स्वाधीन असतो आणि हा नसतो. तरी पण आनुवंशिक गुणांचें तत्त्व महत्वाचेंच मानावयाला हवें.

१८

# सद्वर्तनाची वाढ—आंतर तत्त्वांच्या मदतीनें

सद्वर्तनाच्या वाढीला पोषक होणाऱ्यां आंतर वस्तूंत दोन तीन वस्तूंकडे विशेष लक्ष देणें जरूर आहे. संवय, काम, आत्म-निरीक्षण.

**संवयी**:—सारी दुनिया संवयीची गुलाम आहे. संवय सर्व-व्यापक आहे. संवय सर्वव्यापक आहे असें जेव्हां आपण म्हणतों तेव्हां संवयीचा अर्थ आपण फार व्यापक करतों. ज्ञानावांचून तयार झालेल्या नियमांना आपण संवयी म्हणत नसलों तरी निसर्गाचें नियम हे देखील एक प्रकारच्या निसर्गाच्या संवयीच होत. निर्जीव तसेच सजीव वस्तूंच्या ठिकाणीं संवयीचें महत्त्व फार आहे. तुम्ही घालत असलेल्या कोट आणि सदऱ्यांतहि संवय आहे. त्यांत असलेली वीण ही संवय होय प्रथम ती वीण घ्यायला त्रास होईल, पण नंतर ती सोपी जाईल. तुमच्या टांकांतहि संवय आहे, आणि म्हणूनच नव्या टांकापेक्षां जुना टांकानें फार चांगलें व जलद लिहितां येते. ही संवय पडण्याचें कारण उघड आहे. ज्या वस्तूंत संवय तयार होते त्या वस्तूचा पदार्थ अगदीं कठिण नाहीं, अगदीं नरम नाहीं, इतर पदार्थाचा त्याच्यावर दाब पडणार नाहीं इतका कठिण नाहीं, आणि इतर पदार्थाचा दाब पडेलच इतका नरम नाहीं—असा असतो. मानसिक संवयी देखील याच नियमानें समजवितां येतात. मेंदूतील पदार्थावर जे शारीरिक छाप पडतात, रक्त

आणि ज्ञानतंतू यांवर जे परिणाम होतात—ते नाहींसे होत नाहींत तर मेंदूंत राहातात. आणि यालाच संवय म्हणतात.

निसर्गाच्या नियमांचा भंग केल्यास संवयीं भंगून जातात. शिक्षणांत चांगल्या संवयीं जडविण्याचे महत्त्व फार आहे. प्लेटोची अशी एक गोष्ट सांगतात कीं, एकदां वाईट खेळ खेळत असलेल्या मुलाला त्यानें ठपका दिला, त्यावेळीं तो मुलगा म्हणाला, " तुम्हीं क्षुल्लक गोष्टींविषयीं मला ठपका देत आहांत." त्यावर प्लेटोनें उत्तर दिलें. " पण संवय ही कांहीं क्षुल्लक गोष्ट नाहीं." संवयीच्या बळाविषयीं एक मनोरंजक गोष्ट नेहमीं सांगण्यांत येते. एक कसलेला शिपाई स्वतःचे जेवण हातांत घेऊन एकदां चालला होता इतक्यांत एका थट्टेखोर मित्राने " अटेन्शन् " ( सावधान ) म्हणून थट्टा केली. कवायतीचा हा शब्द ऐकून शिपायाने एकदम आपले हात खालीं केलें आणि पाय जुळविले ! कवाईत त्याच्या नसानसांतून इतकी भिनून गेली होती कीं, कवायतीचा शब्द ऐकल्याबरोबर हातांत असलेल्या खाद्याचें त्याला भान न राहून त्यानें तें टाकून दिलें ! थट्टा पुरी झाली, खाणें जमिनीवर पडलें, कवायत पूर्ण झाली. संवयींची केवढी ही सत्ता !

या प्रमाणें संवयीचें बळ फारच जबर असतें. म्हणून ज्यानें चांगल्या संवयी जडवून घेतल्या असतील त्याला आयुष्यांतील चांगल्या वस्तु सहज प्राप्त होतील, आणि ज्यानें खराब संवयीं लावून घेतल्या असतील त्याला चांगल्या वस्तु मिळविण्यांत त्रास होईल. प्रत्येक चांगली संवय ही मित्राप्रमाणें होय आणि प्रत्येक वाईट संवय ही शत्रुप्रमाणें होय. बाहेरच्या शत्रूंना जिंकता येतें. पण आंतील शत्रूचा

पराजय कठीण असतो. तुमची इच्छा असो वा नसो, तुमच्या प्रत्येक कृत्याचा ठसा तुमच्या मेंदूतील तंतूवर पडतो, आणि तो इतका जबर असतो कीं, तो पुसून टाकणें कठीण असतें. तरुणपणाचा काळ हा नव्या संवयी जडवून घेण्याचा असतो जितक्या चांगल्या संवयी ह्या काळांत जडवून घेण्यांत आल्या असतील तितकें आयुष्य सोपें बनतें. चांगल्या संवयीच्या मनुष्याची शक्ति क्षुल्लक गोष्टींकडे लक्ष देण्यांत खर्चली न गेल्यानें चांगल्या गोष्टींकडे लक्ष देण्याचें त्याचें काम सोपें बनतें. ज्या मनुष्याला लवकर उठण्याची संवय असते, ज्या मनुष्याला खरे बोलण्याची संवय असते, ज्या मनुष्याला गुणग्रहण करण्याची संवय असते त्याला क्षुल्लक गोष्टींचा विचारच करावा लागत नाहीं लवकर उठूं कीं उशीरां ? खरें बोलूं कीं खोटें ? करुं तरी काय ? इत्यादि विकल्प, इत्यादि प्रश्न त्याच्या मनांत उत्पन्न होतच नाहीत. तिकडे त्याचें लक्षच जात नाहीं. त्याचें मन चांगल्या गोष्टींकडे वेधलें जातें आणि म्हणून त्याच्या शक्तीचा अपव्यय न होता सद्व्यय होतो.

चांगल्या संवयी कशा जडवून घ्याव्यात—ह्या व्यावहारिक प्रश्नाचें निराकरण मानसशास्त्र सरळपणें करितें. ह्या बाबतींत तीन नियम अगत्याचे म्हणतां येतील. पहिला नियम हा कीं, नवी संवय जडवून घ्यावयाची असो कीं जुनी टाकून द्यावयाची असो, त्याकरितां आपला सुरवातीचाच प्रयत्न शक्य तितका मोठा करावा. ‘ प्रथम मारी तो कधीं न हारी,’ हें सूत्र येथेंही खरे आहे. उदाहरणार्थ ज्याला लवकर उठण्याची संवय करावयाची असेल त्यानें त्या बाबतींत निश्चय केल्यावर तो निश्चय मूर्त स्वरुपांत येण्या

करितां पहिलाच प्रयत्न मोठा करावयाला हवा. रात्रीं लवकर झोंपीं जा, घड्याळाला गजर लावा, भाऊ बहीण किंवा इतर नातेवाईकांपैकीं जी मंडळी लवकर उठत असतील त्यांना तुम्हांला मदत करण्याविषयीं सांगा आणि तुमचा जो स्नेही असेल त्याला तुमचा निश्चय कळवा कीं ज्यामुळें निश्चय अंमलांत न आल्यास तुम्हांला लाजावें लागेल. अशा तऱ्हेनें अनेक सहाय्यक बळांनीं तुमचा निश्चय बांधून टाका आणि मग पाहा कीं, तुम्हीं लवकर उठतां कीं नाही. संवयीचें बीज पहिल्याच दिवशीं रुजतें कीं नाहीं तें पाहा.

दुसरा नियम हा कीं जोंपर्यंत तुमची संवय दृढमूल झाली नसेल तोंपर्यंत तिच्यांत अपवाद कधींहि शिरूं देऊं नका. एक अपवाद झाला कीं केलेले काम बहुतेक फुकट जातें. पुष्कळ माणसें चहा न घेण्याचा निश्चय करून त्याप्रमाणें जुनी संवय सोडूनें नवी जडवून घेण्याचा प्रयत्न करतात. पण त्यापैकीं पुष्कळ तसें करूं शकत नाहींत, याचें कारण हेंच होय आज चहा नाहीं घेतला, उद्यां नाहीं, परवां नाहीं—तशा तऱ्हेनें चार पांच दिवस चालविलें. सहाव्या दिवशीं मित्र आला म्हणून किंवा डोकें दुखलें म्हणून “ एक दिवस अपवाद म्हणून चहा घेतल्यानें कांहीं बिघडत नाहीं ” असें मनुष्य मनाशीं ठरवितो ! बिचारा मनुष्य ! त्याच्या या अपवादाचा परिणाम ज्ञानतंतूंवर जरूर होतो. गुप्तपणें त्याचा चहा मेंदूंत नोंदविला जातो. आणि सातव्या दिवशीं त्याचा निश्चय कमजोर होतो. चार दोन वेळां असें झालें कीं त्याचा निश्चय पार वितळून गेला म्हणून समजावें.

तिसरा नियम हा कीं, निश्चय केला कीं ताबडतोब तो अंमलांत आणावा. तसें करणें शक्य नसेल तर उशीरां निश्चय करा.

**काम**:–कामाबद्दल प्रेम, कोणत्याहि उद्योगाबद्दल प्रेम असणें ही गोष्ट मेंत्रयीच्याच सदरांत येते. तरीहि त्या विषयावर भर देणें मी अगत्याचें समजतों. जो मनुष्य नेहमीं उद्योगांत मग्न असेल त्याला दुसऱ्याची निंदा किंवा चेष्टा करायला वेळच मिळणार नाहीं. आणि इतके स्पष्ट आहे कीं मनुष्याचें मन चांगल्या विचारांत गुंतलेलें नसेल तर ते वाईट विचार करूं लागतें. आणि म्हणूनच **आलस्यंहि मनुष्याणां शरीरस्थो महारिपुः** हें जें म्हटलें आहे ते खरें आहे. अलेक्झांडर नेहमीं म्हण " मला माझें मर्त्यत्व विशेषतः दोन गोष्टींत दिसतें–निद्रा आणि विषयवासना. " शब्दन् शब्द या वचनांतील खरा आहे. उद्योगी पुरुषाचें वर्तन बिघडण्याचा संभव कमी असतो, कारण त्याकरितां त्याला वेळच मिळत नाहीं.

**आत्मपरीक्षण**:-आत्मपरीक्षणानें मिळणारा फायदाहि अमोल आहे. मनुष्य हा कांहीं साधारण प्राणी नाहीं. परमेश्वरानें त्याला बुद्धि दिली आहे. बुद्धीचा उपयोग केल्यास त्याचें वर्तन अवश्य सुधरावयाला हवें. पायथागोरियन तत्त्वज्ञानी स्वतःच्या जीवननियमांत एक नियम असा करीत कीं, रोज रात्रीं मनुष्यानें दिवसा केलेल्या कृत्यांचें परीक्षण करावें. असें परीक्षण केल्यानें त्याला स्वतःच्या चुका समजतात आणि त्या दुरुस्त करण्याचा तो प्रयत्न करतो. त्याला परिस्थितीचे खरें ज्ञान मात्र व्हावयाला हवें. बिल्वमंगल सूरदास कशानें सुधरला ? स्वतःच्या अनीतीच्या साक्षात्कारानें. हा साक्षात्कार, हें ज्ञान अनीतिमान मनुष्याला देखील वासनांचा भर कमी झाल्यावर होतें. आणि आत्मपरीक्षणानें त्या मनुष्यांत लवकर नाहीं तरी उशीरां सुधारणा होईल या विषयीं संदेह नाहीं.

# १९

# धैर्य

पुष्कळ वेळां धैर्यावांचून धैर्याचीं कामें होतात. कांहीं वर्षांपूर्वीं मी जेव्हां प्रे. रा. ट्रेनिंग कॉलेजच्या इमारतींत राहात होतों तेव्हां प्रार्थना समाजाच्या मंदिरा मागें एका मध्यरात्रीं एका तेल्याचा खून करण्यांत आला. तो खून द्रव्याच्या लोभानें करण्यांत आला होता. खूनी इसम भयानें पळून जात होते, आणि त्यांपैकीं एक प्रार्थनासमाजच्या मंदिरासमोरच्या पायऱ्यांवरून धांवत जात होता. ट्रेनिंग कॉलेजच्या पगीच्या पाहण्यांत हें आलें. त्या मनुष्याला धांवत असलेला पाहून पगीनें त्याला हटकलें. त्याला माहीत नव्हतें कीं धांवणारा इसम हा कोणी गुन्हेगार असेल. केवळ शंकेवरून त्यानें त्याला अटकविण्याचा प्रयत्न केला तरीहि खूनी इसम धांवतच होता. म्हणून पगीनें त्याला डांग फेंकून मारली. धांवणारा इसम तिथेंच पडला आणि पकडला गेला. त्याच्यामुळें दुसरेहि दोन गुन्हेगार पकडले गेले. मागाहून कळलें कीं गुन्हेगार इसम काबुली होता आणि त्याच्याबरोबर झुंज खेळण्यांत पगीनें मोठें धैर्य दाखविलें होतें. गुन्हेगार काबुली आहे असें पगीला कळतें तर तो त्याच्यापासून दूर राहिला असता हें निःसंशय. कारण या पराक्रमानंतर त्याला ताप येऊं लागला, तो घाबरूं लागला, रात्रीं भिऊं लागला. आणि शेवटीं पुष्कळ महिन्यानंतर काबुल्यामुळें उत्पन्न झालेल्या धास्तीच्या तापानें तो मेला देखील. या धैर्याला क्वचितच् कोणी धैर्य म्हणेल. अजाणतपणें हें धैर्य त्या पगीला आलें होतें. धैर्याचें तें सोंग होतें.

खऱ्या धैर्याच्या कृत्यांत प्रसंगाची पुरी जाणीव असते, आणि असावयालाच पाहिजे. भयप्रसंग जाणणें आणि आपण त्याच्याकरितां पुरेसे सामर्थ्यवान आहोंत असें ज्ञान असणें, याचें नांव धैर्य. जो बलहीन असून भयप्रसंगीं घाबरून संकटाला सामोरा होतो त्याला साहसी म्हणतां येईल. पण साहस म्हणजे कांहीं धैर्य नाहीं. जो बलवान् असून प्रसंगीं भयानें घाबरतो त्याला भीरू म्हणतां येईल. पण भीरुत्व म्हणजे देखील धैर्य नाहीं साहस आणि भीरुता या दोहोंच्या मधलि गुणाला धैर्य म्हणतात. आणि म्हणून ॲरिस्टॉटलनें त्याला सद्गुण म्हटलें आहे. त्याच्या मतें दोन दुर्गुणांच्या मधील मार्ग म्हणजे सद्गुण होय. दोन प्रकारच्या सीमा लहान–मोठेपणाच्या सीमा–मधील तत्त्व म्हणजे सद्गुणाचें तत्त्व होय. माणसें भीरुतेपेक्षां साहसाचा अवलंब कमी वेळां करतात. आणि म्हणून ज्याला धैर्य प्राप्त करून घ्यावयाचें असेल त्यानें भीरुता या दुर्गुणावर विजय मिळविला पाहिजे.

हा विजय कसा मिळवावयाचा ? धैर्य कसें प्राप्त करावयाचें ? ज्ञान, सहवास आणि संवयीनें.

ज्या भयासमोर आपणाला टिकाव धरावयाचा असेल त्याची बरोबरी केल्यानें धैर्य प्राप्त होईल. पण ती बरोबरी कशी करावयाची ? त्याकरितां पहिला मार्ग ज्ञान प्राप्त करण्याचा आहे. भयप्रसंग कसा आहे याचें ज्ञान करून घेतल्यानें पुष्कळ वेळां भयाचा नाश होतो. मोठ्यांतलें मोठे भय आभासामुळें उत्पन्न होतें शत्रु सैन्याचें बळ किती आहे आणि कशा प्रकारचें आहे, याचें पुरेसें ज्ञान झालें कीं बरीचशी दहशत कमी होते. हातोहाताच्या लढाईचें पण

असेंच आहे. काबुली ! मेलोंच -त्याच्या नांवानेंच पुष्कळांना भीति वाटू लागते. पण ज्याच्या बरोबर लढण्याचा प्रसंग असेल तो किती बलवान् आहे, त्याच्याजवळ हत्यार आहे कीं नाहीं, आपल्या आणि त्याच्या बळांत किती अंतर असण्याचा संभव आहे-या सर्वांविषयीं आपणाला ज्ञान असलें तर काबुलीच्या नांवाचें भय नाहींसें होईल.

सहवास आणि संवय या दोघांचें बळ मनुष्याला धैर्यवान बनविण्यांत फार उपयोगी पडतें

पुष्कळ वेळां मनुष्य केवळ कल्पनेमुळें गलितधैर्य होतो. आतां कसें होईल हा विचारच मनुष्याला नामर्द बनविनो. अरण्यांत वाघासारखें श्वापद भेटल्यावर मनुष्य घाबरून पळू लागला तर तो लवकर मरणार हें नक्की समजावें. हिंमत धरून जर तो त्या श्वापदाला आपल्या नजरेनें ताब्यांत ठेवण्याचा प्रयत्न करील तर तो वांचण्याचा संभव आहे. सामान्य पणें कुत्र्यांच्या बाबतींतहि असेंच दृष्टोत्पत्तीस येतें. जो मनुष्य भुंकणाऱ्या कुत्र्याला पाहून पळू लागतो त्यालाच तो कुत्रा चावायला जातो; पण जो हिंमत धरून कुत्र्याच्या समोर होतो आणि धैर्यानें पावलें टाकीत जातो त्याला कुत्रा कांहींच करीत नाहीं.

आणि म्हणून ज्याला कमी कल्पना येतात तो भीतहि फारसा नाहीं. शस्त्रक्रियेच्या वेळीं रोगी पुष्कळ वेळां फार घाबरतो आणि प्रत्यक्ष शस्त्रक्रिया झाली नाहीं तरी त्याला दुःख होते. त्याचें कारण हेंच कीं तो दुःखाची कल्पना करीत असतो. इतकेंच नाहीं तर जे शस्त्रक्रिया पहावयाला आलेले असतात ते त्या रोग्यापेक्षांहि अधिक घाबरतात. याचें कारण देखील कल्पनाच होय. दुःखाच्या कल्पनेंत

दुःख जास्त असतें. दुःख सहन करणें इतकेंसें कठीण नाहीं. त्यांतल्यात्यांतहि सर्वांत मोठ्या दुःखाच्या बाबतींत विशेषेंकरून असें असतें. ईश्वरानें शरीररचनेच्या बाबतींत अशी खुबी वापरली आहे कीं शारीरिक दुःख फक्त तलस्पर्शी असतें; चामडी आणि शरिराच्या टोंकाच्या भागांतच बहुधा तें बसत असते. अतिदुःखी मनुष्याला दुःख नाहीं, म्हणतात तें खरें आहे. दुःख फार झाल्यानें त्याविषयीं मनुष्याला ज्ञानच रहात नाहीं. दुःख फार झालें कीं नैसर्गिक नियमानुसार मनुष्य बेशुद्ध होतो. मोठ्यांतलें मोठें दुःख सहन करणाऱ्यापेक्षां तें पाहणाऱ्याला फार दुःख होतें गाडीखालीं चिरडून मरणाऱ्याला होणाऱ्या दुःखापेक्षां पाहणाऱ्यांना ज्यास्त दुःख होतें. अलौकिक धैर्य, असंभाव्य धैर्य, शक्य आहे, आणि विरल आहे याचें कारण तरी हेंच होय. पतीच्या शवाबरोबर चितेवर चढणाऱ्या सतीचें दुःख किंवा सत्याकरितां प्राण देणाऱ्या वीराचें दुःख जगाला असह्य होतें; पण त्या सतीला किंवा वीराला तसें वाटत नाहीं. याचें कारण सहज समजेल असें आहे. सती स्त्री किंवा वीर पुरुष स्वतःच्या आदर्शाचाच विचार करितात. तो विचार इतका बलवान् असतो कीं दुसऱ्या विचाराकरितां किंवा कल्पनेकरितां मनांत अवकाशच रहात नाहीं. आणि म्हणून त्यांच्या हातून शूर कृत्यें घडतात. पण ही स्थिती फारच थोड्यांच्या बाबतींत शक्य आहे. कारण लोकसमुदायापैकीं मोठा भाग दुःखाची कल्पना करणारच. दुःखाची मुळींच कल्पना न करणें हें केवळ निग्रही स्त्रीपुरुषांनाच शक्य आहे. आदर्शाचा जोर त्यांच्या ठिकाणीं इतका असतो कीं त्यांच्या आड कांहींहि येऊं शकत नाहीं.

धैर्य अनेक प्रकारचें असूं शकेल. रणांगणावरून रजपूत कधींहि मागें फिरत नसत हें धैर्य होय. शारीरिक धैर्य होय. पण मानसिक धैर्यहि असतें आणि तें फार अवघड असल्यामुळें अशा धैर्यवानाबद्दल आपणाला आदर वाटतो. सारी दुनिया खोटें म्हणत असतांना एखादा शास्त्रज्ञ आपण लावलेल्या शोधाच्या खरेपणाला चिटकून राहिला तर तें मानसिक धैर्याचें उदाहरण होईल. एखाद्या मागासलेल्या समाजांतलि सुधारकानें अमुक प्रकारचे विचार प्रगट केल्यावर समाजान त्याला त्रास दिला, त्याच्यावर बहिष्कार घातला, त्याची निर्भर्त्सना केली, कांहींहि केलें तरी जर तो आपल्या विचारांना चिकटून राहिला तर तेंहि मानसिक धैर्य म्हणतां येईल. धैर्य हें नेहमीं मानसिक असतें; पण कित्येक वेळां तें धैर्य दाखविण्याचे प्रसंग शारीरिक असतात व कित्येक वेळां मानसिक असतात. या दुसऱ्या प्रकारच्या धैर्याला नीतिविषयक धैर्य अधिक उचितपणें म्हणतां येईल. नीतिविषयक धैर्य शारीरिक धैर्यापेक्षां फार अवघड आहे. शूर योद्धे जगाला सहज मिळू शकतात, पण धैर्यवान् विचारकर्ते, शूर उपदेशक, खंबीर सुधारक, हिंमतवान् राजकारणी पुरुष मिळणें कठिण असतें. ज्या देशाला असे शूरवीर पुरुष मिळाले असतील, त्या देशाचा अनेक रीतीनें उदय होतो. हिंदुस्थानांत सामाजिक किंवा नीतिविषयक धैर्य नाहीं-सारखें आहे, ही मोठ्या खेदाची गोष्ट आहे. जर तें असतें तर अशा बुद्धिशाली देशाची प्रगति किती तरी झाली असती.

## २०

# वक्तृत्वकला

प्रत्येक मनुष्याच्या ठिकाणीं थोड्या फार अंशानें वक्तृत्व असतेंच. ज्या बाबतींत त्याच्या भावना प्रबळ असतील त्याविषयीं बोलावयाचें झाल्यास तेवढ्या पुरता तो वक्ता होणारच. अशा प्रकारचें वक्तृत्व गल्लींत होणाऱ्या भांडणांत. किंवा स्त्रीपुरुषांच्या कलहांत अनेक ठिकाणीं कोणीं पाहिलें नसेल ? असलें अचानक वक्तृत्व निराळें आणि वक्तृत्वकला निराळी. ज्याच्या अंगीं वक्तृत्व-कला असेल तो वाटेल त्या प्रसंगीं वाटेल त्या स्थळीं आपल्या विचारांना सुंदर आणि मोहक भाषेंत आणि आकर्षक शैलींत प्रगट करूं शकतो. कोणतीहि गोष्ट करण्याची व्यवस्थित शक्ति म्हणजे कला होय.

फार थोड्यांना बोलतां येतें. वास्तविक पुष्कळांना चांगलें बोलतां येण्याची जरूरी आहे. पुष्कळसे लोक बोलतां येत नसून बोलतां येत असल्याचें सोंग करतात. अशा सोंगापेक्षां अधिक हास्यास्पद काय असेल ? पुष्कळशा सभांतून सामान्यपणें काय दिसतें ? एखादा वक्ता भरभर बोलण्यांत स्वतःला कृतकृत्य समजतो तर एखादा हळुहळु बोलण्यांत कृतकृत्य समजतो. कोणी नाटकांतल्यासारखे हातवारे करतो तर कोणी पुतळ्याप्रमाणें फक्त ओंठच हालवितो. श्रम करूनहि एखाद्याच्या तोंडावाटें शब्द निघत नाहींत तर एखादा शब्दांचा पाऊस पाडतो. एखादा गंभीर मुद्रेनें आणि उपदेशकाच्या थाटानें क्षुल्लक गोष्टीहि मोठ्या स्वरूपांत मांडून

सभेला जिंकूं पाहातो, तर दुसरा मोठया गोष्टींनाहि हास्यविनोदानें मनोरंजक बनवीत असतो. सभेला अर्थात् दोघांचीहि परीक्षा होते. एखादा अलंकारिक भाषेनें आणि मोठमोठ्या ग्रंथकारांचीं नांवें सांगून श्रोत्यांना छळण्याचा प्रयत्न करतो. तर दुसरा श्रोत्यांची खुशामत करून त्यांना खुश ठेवण्याचा प्रयत्न करतो. पण असल्या ह्या मेलगाडया किंवा खटारे, असले नट किंवा निर्जीव पुतळे, असले अडखळणारे किंवा अस्खलित बोलणारे वक्ते, असले पंडितमन्य पुरुष किंवा पांडित्याचे शत्रु, असले आलंकारिक किंवा खुशामतखोर स्वतःच्या मनांतील कामना पूर्ण करू शकत नाहींत. याचें कारण हें कीं त्यांच्यांत वक्तृत्वकलेच्या कित्येक गुणांचा आभास असतो, आभास, केवळ आभास, आणि तो देखील कित्येक गुणांचा.

खरें वक्तृत्व विरळ पाहण्यांत येतें. आणि जिथें तें असतें तिथें तें दाखवावें लागत नाहीं. वक्तृत्व स्वतःची शक्ति स्वत.च सिद्ध करतें. सुप्रसिद्ध वक्ते सुरेंद्रनाथ बानरजी यांची वक्तृत्व-शक्ति कोणाला मान्य नसे ? ऐकणाऱ्यांना ते स्वतःच्या अंकित करीत असत. जितक्या वेळ त्यांना आपण ऐकत असूं तितक्या वेळ आपल्या सर्व शंका दबून जात असत; आपलें मन जागृत असून निजल्या सारखें बनत असे. त्यांचा मधुर आवाज, त्यांची मधुर शब्दरचना, त्यांचे सामर्थ्ययुक्त हावभाव, शब्दांवर ठिक-ठिकाणीं पडणारा आकर्षक भार, वाक्यांतील त्यांचे आरोहावरोह— या सर्वांची एकतानता उत्कृष्ट संगीतापेक्षांहि मनाला आणि कानांना मोहक लागत असे. त्यांना ऐकणारा श्रोता, तितका वेळ तरी स्वतःच्या मनांत " बरोबर आहे " असाच उद्गार काढीत असे

संगीतीनें वन्य आणि विक्राळ श्वापदांना देखील शरण आणतां येतें. वक्तृत्वकला ही देखील संगीतकलेशी सदृश आहे, आणि तिच्या योगानें मनुष्यांत असलेला पशु, मनुष्याचा विरोध शमवितां येतो. प्लुटार्कच्या सांगण्याप्रमाणें स्पार्टाचा राजा आर्किमिडीझ यानें थ्युसिडिडस यांस प्रश्न केला," कुस्तींत कोण श्रेष्ठ, तूं कीं पेरिक्लिस ?" त्यावर थ्युसिडिडस यानें उत्तर दिलें, " मी जेव्हां त्याला चीत करतो तेव्हां तो आपण चीत झालों नाहीं असें म्हणतो, आणि प्रेक्षकांनाहि तसें मानायला लावतो. " घडलेला गोष्टींनाहि खोट्या ठरविण्याची शक्ति अशा प्रकारें वक्तृत्वकलेंत आहे. इतकेंच नाहीं तर अगदीं असंभाव्य गोष्टीहि वक्तृत्वाच्या बळावर संभाव्य ठरतात. मॅसिडोनियाचा राजा फिलीप यानें डिमॉस्थेनिसच्या एका व्याख्यानाविषयीं असे उद्गार काढले कीं, " मी जर तें व्याख्यान ऐकायला हजर असतों तर मीच माझ्याविरूद्ध शस्त्र उचलायला उद्युक्त झालों असतों. "

अशा गोष्टी सुशील पुरुषांना थंड्या प्रहरच्या गप्पाप्रमाणें वाटतील, आणि अशा वाटण्यांत कांहींच विचित्र नाहीं. अशा गोष्टी युक्तिवादानें मानतां येत नाहींत. पण प्रत्यक्ष पाहिल्यावरच पुष्कळ मानतात, आणि मग युक्तिवादाची जरुरीहि नसते. निर्बळ पक्ष सबळ दाखविणें, सरळ असेल तें वांकडे करणें, आणि वांकडे असेल तें सरळ करणें हें पुष्कळ वेळां वक्तृत्वाचें लक्षण समजलें जाते. त्यावरून इतकें तर स्पष्ट होतें कीं, वक्तृत्व ही एक प्रकारची जादू आहे. ही जादु चालू शकते याचें कारण हें कीं जगांत सर्वच व्यक्ति कांहीं सारख्या मानसिक शक्तींच्या नसतात.

हुशार मनुष्य मूर्खांवर राज्य करणारच, आणि शेराच्या डोक्यावर सव्वाशेर हा तर जगाचा नियमच आहे. अर्थात् " मी वक्तृत्वानें कधीं मारला जाणार नाहीं. " असा कोणी आग्रह धरिला तर तो अनुभवाच्या उणीवेमुळें होय असें म्हणतां येईल.

प्रत्येक वक्त्याचा शब्दांवर ताबा असावयास पाहिजे. जें प्रत्येक मनुष्य सांगतो तेंच तोहि सांगतो. मोठ्यांत मोठा फरक हा कीं, बाकी सर्व एखादी गोष्ट कष्टानें सांगतील तर हा सहज सांगेल. वक्त्याच्या मनानें शब्द पत्याच्या डावाप्रमाणें होत, ते त्याचे गुलाम असतात. विचार येण्यापूर्वी त्यांची शब्दांत रचना केव्हांच होऊन जाते.

या गुणांच्या बरोबर प्रत्येक वक्त्यांत कवि किंवा चित्रकाराचे अंशहि असतात. त्याची कल्पनाशक्ति जबर असते. ज्या ज्या प्रसंगाविषयीं बोलावयाचें असेल त्या त्या प्रसंगांचें हुबेहुब चित्र तो रेखाटतो. ऐकणाऱ्यांची कल्पनाशक्तिहि हेंच काम करतें.

वक्ता विशेषेंकरून निर्भय असतो. भय म्हणजे शारीरिक भय असें मला सांगावयाचें नाहीं. जो मनुष्य बोलायला उभा राहून सभेनें भयभीत होतो तो वक्ता होऊं शकत नाहीं. असा सभाक्षोभ नसला आणि वक्ता विनयी असला, श्रोते आपल्यापेक्षां वडिल आहेत, विद्वान आहेत, टीकाकार आहेत, असें त्याला वाटत असले तरी तो वक्ता होऊ शकणार नाहीं. जो वक्ता असतो त्याला तर असें वाटतें कीं आपल्या समोर बसलेले श्रोते कांहींच जाणत नाहींत, आपल्यापेक्षां ते कनिष्ठ आहेत, आणि त्यांना शहाणपणा शिकवायला आपण समर्थ आहोंत. असें मानण्याऐवजीं जर त्यानें

आपल्या श्रोत्यांना बरोबरीचे किंवा वडील मानले तर सभेवर त्याला कधींहि जय मिळवितां येणार नाहीं. ह्यांत आवश्यक असलेली निर्भयता ही नैतिक निर्भयता होय.

वक्त्याच्या ठिकाणीं समभाव असावयास पाहिजे. भावना ओळखण्याची सूक्ष्म दृष्टी पाहिजे. परक्या माणसांना आपलेसे करण्याची शक्ति पाहिजे. सभा शुष्क युक्तिवादानें जिंकल्या जात नाहींत तर सहानुभूतीनें. कद्रूतला क मनुष्य वक्त्याच्या बळावर उदारांतला उदार बनतो. कां? तो वक्ता अशा खुबीनें बोलतो कीं द्रव्यसंचय करण्याचें एकमेव साधन औदार्य होय असें तो पटवून देतो. जुन्या मताच्या मनुष्याला तो नवमतवादी बनवितो. असें कां? तो अशा दृष्टीनें बोलतो कीं, श्रोत्यांना असें वाटतें कीं, हा प्राचीन संस्थांचा संरक्षक तरी आहे किंवा म्हणतो त्यांतच खरें आहे. गालिप्रदान किंवा विवेकात्मक शैली वक्याच्या ठिकाणीं क्वचित्च दिसेल. अशा प्रकारचे वक्ते असतात हें खरें, पण त्यांचा चांगला परिणाम सभेवर होत नाहीं उलट ते सर्व बिघडवितात. कोणतीहि राजकीय, सामाजिक, नैतिक, आर्थिक किंवा धार्मिक सुधारणा कुशल वक्त्यांच्या तोंडून खुबीनें प्रगट होईल. सभेची ते स्तुती करतील, तिच्यांत असलेल्या उच्च भावना जागृत करतील तिच्या देशाभिमानाची वाहवा करतील, आपण सांगत असलेली गोष्ट सभेला मनांतून मान्य असल्याचें सांगून ती करण्यांत कोणत्याहि प्रकारचें नुकसान नाहीं. असें ते शेवटीं सांगतील.

समोरच्या मनुष्यांत स्वतःबद्दल समभाव उत्पन्न करण्याची शक्ति देखील वक्त्याच्या ठिकाणीं आवश्यक आहे. समोरच्याच्या

भावनांवर परिणाम करून पुष्कळसें हें काम वक्ता साधून घेतो. तुमच्या देशाकरितां, तुमच्या पूर्वजांच्या प्रेमाकरितां, तुमच्या आर्यत्वाकरितां तुम्हीं असें करा–असें व्याख्यानांतून कितीतरी वेळां ऐकण्यांत येतें ! कोर्टांतहि असा प्रकार पाहावयाला सांपडतो. विशेषतः ज्युरीसमोर अपराध्याची तपासणी चालू असतां ज्युरीच्या अंतःकरणांत दया उत्पन्न करण्याकरितां कितीतरी वकील आणि बॅरिस्टर प्रयत्न करीत असतात ! एक फ्रेंच उपदेशक स्वतःचें भाषण परिणामकारक करण्याकरितां अशा प्रकारच्या युक्त्या इतक्या वापरी कीं त्याच्या लेखी उपदेशाच्या बाजूला " हा शब्द उच्चारतांना रुमाल बाहेर काढणें, " " येथें शक्य तर रडावें "–अशा प्रकारच्या सूचना लिहिलेल्या असत ! काय हा कृत्रिमपणा ! तरीपण वक्तृत्वांत कृत्रिमता मोठ्या प्रमाणांत असतें यांत शंका नाहीं.

सावधपणा, मानसिक स्थैर्य, तत्परता हे गुण वक्त्याला फार उपयोगी पडतात. जो वक्ता आपलें मानसिक स्थैर्य घालवितो तो श्रोत्यांनाहि मुकतो. वक्त्याचे डोळे, कान मन सर्व एकचित्त असतात. श्रोत्यांच्या चेहेऱ्यांवरून बोलण्याचा परिणाम काय होतो आहे हें जाणण्याची शक्ति वक्त्याच्या ठिकाणीं असते; आणि तिचा तो उपयोगहि करतो. ज्या ज्या वचनांनीं सभेला आनंद होतो आहे असें त्याला वाटेल त्याचा तो विस्तार करीत जातो. आणि ज्या ज्या वचनांनीं सभा कंटाळल्यासारखी वाटेल त्यांचा तो संक्षेप करतो. अर्थात् वक्ता हा मनुष्यस्वभावाचा सूक्ष्म अवलोकनकर्ता, सूक्ष्म अभ्यासी असतोच.

पण " अमुक हवें आणि तमुक हवें "-अशा प्रकारचें टांचण करण्याचें हें स्थळ नाहीं. वक्त्याच्या अंगीं कोणते गुण अवश्यक आहेत तें आपण पाहिलें.

उत्तमांतले उत्तम वक्ते हे नैसर्गिकपणेंच वक्ते असतात. वक्तृत्वशक्तीला वाढवितां येते, पण ती उत्पन्न करतां येत नाहीं. वक्ता नसून वक्ता प्रयत्नानें बनल्याचीं उदाहरणें अगदीं अपवादादाखलच. ग्रीक वक्ता डेमॉस्थेनीसचें उदाहरण अशा प्रकारचें आहे. आपला बोबडेपणा त्यानें तोंडांत खडे ठेऊन समुद्रकिनाऱ्यावर मोठमोठ्यानें ओरडून घालविला आणि स्वतःचा आवाज चांगला केला. अमर्याद श्रमानें त्यानें वक्तृत्व कला प्राप्त केली. एका मनुष्यानें जें केलें तें दुसरा करूं शकतो हें म्हणणें खरें आहे. पण पुष्कळ करू शकतील हें कांहीं खरें नाहीं. म्हणजे या उदाहरणावरून उत्तम प्रकारची वक्तृत्वकला श्रमसाध्य आहे असा नियम कांहीं तयार होत नाहीं.

अगदीं उत्तम नसलें तरी उच्च प्रतीचें वक्तृत्व अभ्यासानें व योग्य प्रयत्न केल्यानें साधतां येतें. उत्तम ग्रंथकारांच्या ग्रंथांचें परिशीलन, उत्तम वक्त्यांशीं समागम, आणि वक्तृत्वमंडळांतून वेळोवेळीं बोलत राहिल्यानें वक्तृत्वकला प्राप्त करून घेतां येते. ज्यांना राजकारणांत किंवा समाजकारणांत अग्रणी व्हावयाचें असेल, ज्यांना वकीलीसारख्या बोलक्या धंद्याची अपेक्षा असेल, त्यांना साधारण प्रतीचें वक्तृत्व हें अवश्यक आहे. प्रयत्न केल्यानें अशा प्रकारचें वक्तृत्व संपादन करतां येतें. असे प्रयत्न न केले तर बोलणाऱ्याची स्थिति हास्यास्पद होते. पुष्कळदां असें होतें कीं,

वक्ता बोलायला उभा राहिला कीं, शब्द, विचार, हाजरजबाबी-पणा–हीं सर्व त्याच्याजवळून नाहींशीं होतात. बोलत असतां विचार करण्याची किंवा उभ्या उभ्या विचार करण्याची शक्ति कमवितां येते. हे ज्याला शक्य झालें नसेल त्याची स्थिति मात्र हास्यास्पद होते.

विचारांचा प्रसार पुस्तकांच्या वाचनापेक्षां वक्त्यांच्या भाषणानें सहज, त्वरित आणि मोठ्या प्रमाणावर होऊ शकतो. प्रत्येक देशाला वक्त्यांची आवश्यकता असते. सामाजिक, राजकीय, धार्मिक अशा निरनिराळया प्रकारच्या सुधारणा वक्तृत्वाच्या बळावरच साध्य होतात. पुस्तकांच्या वाचनानें क्वचित्च असें होतें. वक्ता हा उच्च प्रतीचा देशसेवक किंवा अधम प्रतीचा देशद्रोहक बनू शकतो. सुधारण्याची जादुगारी जशी तो करूं शकतो तशीच बिघडविण्याची देखील. ज्या देशाला हितसाधक वक्ते मिळाले असतील तो भाग्यशाली देश आहे असें मानतां येईल वक्तृत्वकलेचा सदुपयाग हा समाजसेवेचा एक सन्मार्ग होय.

# २१

# कविता

कविता नेहमीं आनंद देते. असा एकहि समय नव्हता जेव्हां कविता आनंदवीत नव्हती, आणि असा एखादा समय येणारहि नाहीं.

कवितेचें पुस्तक कधीं जुनें होत नाहीं. कायदे जुने होतात, वैद्यक जुनें होतें, रसायन जुनें होतें, तत्त्वज्ञानहि जुनें होतें; आणि जुनें झाल्यावर हीं सर्व कांहीं अंशानें निरुपयोगी होतात. तत्त्वज्ञान्याला सर्व युगाचा द्रष्टा मानण्यांत येतें अर्थात् त्याला झालेलें दर्शन त्याच्याच काळांत नाहीं तर सर्व काळांत सत्य ठरतें. सर्वकालीन सत्याचें संशोधन तत्त्ववेत्ता करतो. हें म्हणणें तत्वज्ञान्याचें आहे, आणि म्हणून तें एकपक्षी आहे. तत्त्वज्ञानाचा इतिहास पाहिला असतां असें दृष्टीस पडतें कीं, तत्त्वज्ञानांतहि निरनिराळ्या काळांत निरनिराळा बदल झालेला आहे. एकहि तत्त्वदर्शन सनातन ठरलेलें नाहीं, आणि एकहि तत्त्वदर्शन सर्वकालीन सत्याचें शोधन करूं शकलेलें दिसत नाहीं. पुष्कळशा उपयुक्त विषयांना कालाची उपाधि अशा तऱ्हेनें नडत असते पण ती काव्यविषयाला नडूं शकेल असें नाहीं. कविता सर्वकालीन सत्याचें पान करवितें ज्ञानाची वृद्धि होऊनहि कवितेचें पुस्तक कधींहि निरुपयोगी होत नाहीं.

कवितेचे शत्रु पुष्कळ आहेत, पण तिचे मित्र त्याहिपेक्षां जास्त आहेत. विरोधक वृत्ताविरुद्ध तक्रार करतात, कल्पनांबद्दल

तिरस्कार दर्शवितात, आणि भावना उद्दीपित करणारें साहित्य मनुष्याला भरीव कार्य करायला नालायक बनवितें असें म्हणतात. वृत्तविषयक तक्रार हास्यास्पद आहे, कारण वृत्त हा कांहीं कवितेचा आत्मा नाहीं. कल्पनांच्या भराऱ्या मनुष्याला व्यवहारापासून दूर नेतात हें खरें. तरी पण चांगल्या कल्पना व्यवहारांतील शुद्ध कार्यांना उत्तेजित करितात हेंहि विसरतां कामा नये सत्य वस्तूंवर कल्पना आधारलेल्या असल्या तर त्या फारच उपयोगी ठरतात पण कित्येक वेळां ' रवि जें न पाहि कवि तेंचि पाहि ' या न्यायाचा इतका स्वछंदानें उपयोग केला जातो कीं, कल्पनेच्या भराऱ्यांत कवि असंभाव्य गोष्टी रुजू करतात. काव्यांत कल्पना पाहिजे, पण ती असंभाव्य वस्तूची नाहीं, तर संभाव्य वस्तुची. आणि असें असेल तर विरोधकांची तक्रार खोटी ठरते. भावनांना उद्दीपित करणें हें तर कवींचें कार्यच आहे. कारण रसोत्कर्ष त्यांवरच मुख्यत्वेंकरून अवलंबून असतो. ज्या भावना उद्दीपित करण्यांत येतात त्या अशुद्ध नेभळट आळशी असतील तर कविता हानिकारक ठरेल हें उघड आहे. आणि अशा स्थितींत तिचे विरोधकहि वाढतील. पण उत्तम काव्यांत असें क्वचित्च आढळतें.

सत्कवि हे नेहमीं श्रद्धाशील असतात. कविता ही एक श्रद्धा आहे. कविता ही त्यांचें अपत्य होय. कविता ही एक त्यांच्या प्रेमाची मूर्ति होय. कविता म्हणजे शब्द नव्हेत, कविता म्हणजे वायफळ बडबड नाहीं, कविता म्हणजे वेड्या वांकड्या चार ताना नाहींत, कविता जड नसून चैतन्ययुक्त आहे, कविता ही कविचा आत्मा होय, कविता त्याची नसते तर तो कवितेचा असतो. जो-

पर्यंत काव्यविषयाच्या खरेपणांत त्याची श्रद्धा नसते तोंपर्यंत कविता निर्माल्यच राहते. कवि म्हणवून घेणाऱ्यांच्या ठिकाणीं मोठ्यांतला मोठा दोष हा असतो कीं, ते कविता कृत्रिम बनवीत जातात जर एखादी गोष्ट बनवून न बनण्याजोगी असेल तर ती कविता आहे. असें असून किती तरी कवी (?) कविता **बनवीत** असतात ! कवितेची निर्मिती बुद्धीवर अवलंबून नाहीं कीं, धारूं तेव्हां उत्पन्न करितां येईल. मी कविता **बनवीन** असें क्वचित्च कोणीं म्हणूं शकेल. उत्तमांतल्या उत्तम कवीच्या बाबतींतहि तें अशक्य आहे. धीठपाठ ज्याला म्हणतात तीं **बनवितां** येतील, काव्य हें **तयार होतें**,, बनवून बनत नाहीं.

असें असल्यानें काव्यांत कांहीं दैवी अंश असतो. शेलीच्या म्हणण्याप्रमाणें काव्य म्हणजे सर्वांत सुखी आणि सर्वांत उत्तम अशा मनाच्या सर्वांत उत्तम आणि आनंददायक अशा क्षणांची नोंध होय. म्हणूनच कवि हा द्रष्टा होय, आणि काव्यांत भविष्य दर्शनें असतात, म्हणून त्यांत शाश्वत सत्य असतें. सर्व तत्वज्ञानाचें सार काव्यांत असतें त्याचें कारण तरी हेंच. कवि हा तत्वज्ञानी असतो. कवि हा कायदे निर्माण करणारा असतो.

कवितेंत माधुर्य असतें पण तें अव्यक्त असतें. कवितेंत रस असतो पण तो ध्वनिरूपानें असतो. आणि म्हणूनच कविता अमित आनंदाचा अमोल झरा होय कवितेंत अपरिमितता असते.

काव्य साधारणपणें वृत्तांत असतें, पण वृत्त हें कांहीं काव्याला आवश्यकच आहे असें नाहीं. बाण, दण्डि, कार्लाईल इमर्सन, रस्किन—हे सर्व कवीच होते. कवितेचा विरोध गद्याशीं

नसून, शुष्क प्रकारच्या विज्ञानाशीं आहे. विज्ञानाच्या पृथक्करण पद्धतीशीं कवितेचा विरोध आहे. नेहमीं कवि वस्तूंकडे साकल्यानें बघतो; वैज्ञानिक त्या वस्तूंचे तुकडे करतील, कवि कधींहि करणार नाहीं. याचें कारण उघडच आहे कीं, कवि सौंदर्यदृष्टीनें बघतो, आणि सौंदर्य हें समग्र स्वरूपांत असतें. पृथक्करण झालें कीं सौंदर्याचा नाश झालाच म्हणून समजावें. एखादें सुंदर चित्र समग्र स्वरूपांत सुंदर असतें. एखादा सुंदर चेहेरा समग्र स्वरूपांत सुंदर असतो. एखाद्या निसर्गाच्या सुंदर देखाव्याचें सौंदर्य त्याच्या समग्र स्वरूपांत असतें. त्या त्या वस्तुंचे तुकडे केलेत कीं सौंदर्याचा नाश झालाच म्हणून समजा. पृथक्करण करून त्या वस्तु कसल्या बनल्या आहेत तें पाहू लागतांत कीं, तुम्हांला सौंदर्याऐवजीं कुरुपता दिसेल. हाच न्याय वाङ्मयाच्या बाबतींतहि लागू आहे.

ज्या लेखनांत अव्यक्त माधुर्य आहे, ज्यांत न आटणारा आनंदाचा झरा आहे, तें काव्यच होय; मग तें गद्य असो वा पद्य असो.

आनंद देणें हाच कवितेचा मुख्य उद्देश; हीच तिची उपयुक्तता. प्रत्यक्ष एवढेंच असतें. अप्रत्यक्षपणें ज्यास्त असतें यांत संदेह नाहीं. कवि हा सुधारक नाहीं तर त्यापेक्षां ज्यास्त आहे. उपदेश करणें हें कांहीं कवीचें कर्तव्य नाहीं, आणि उपदेशात्मक काव्येंहि क्वचित्च चांगलीं होतात. कवि सौंदर्याचें चित्र रेखाटतो आणि त्यांतच लोहचुंबकासारखी शक्ति असते. सुंदर वस्तु कष्टावांचून आपणाला सुंदर बनवितात. सुंदर काव्याच्या वाचनानें सौंदर्यनिर्मिती होते; आणि ती सहज व आनंदानें होते.

ज्या देशांत उत्तम कवी असतात तो मोठा सुखी देश असतो. ज्या वाङ्मयांत उत्तम काव्यें असतात तें वाङ्मय उत्कृष्ट असतें. काव्य हें मनुष्याच्या विश्रांतीचें मोठ्यांतलें मोठें स्थान होय. त्याच्या योगानें दुःखिताचें दुःख कमी होतें, आणि सुखी मनुष्याचें सुख वाढतें. सुंदर वस्तुला तें अधिक सुंदर बनवितें, आणि शुष्क वस्तुंतील शुष्कपणा नाहींसा करतें. काव्यामुळें जर इतकाच लाभ मिळत असला तर तो मोठाच होय. पण अशा दृष्टीनें कवितेचें निरीक्षण करणे म्हणजे कवितेचा मोठा अन्याय करण्यासारखें आहे. सुंदर वस्तुची उत्कृष्टता तिच्या सौंदर्याच्या निरीक्षणांत असते. उपयुक्ततेंत किंवा त्या उपयुक्ततेच्या चर्चेत नसते.

गुजरातेत किती कवी आहेत ? याचें उत्तर वाचकच चांगलें देऊं शकतील. न सांगतांहि लवकर समजण्याजोगें तें उत्तर आहे. ह्या शोचनीय परिस्थितीला कोण जबाबदार आहे ? आपलें शिक्षण आणि जीवन. येथें पाहावें तों जो उठला तो विद्वान् आणि टीकाकार व्हावयाला तयार आहे इमर्सननें टीकाकारांच्याबद्दल " फुकट ठरलेले कवी " हें जें म्हटलें तें यांपैकीं पुष्कळांना लागू होण्याजोगें आहे. आयुष्यांत एक किंवा दुसऱ्या प्रसंगीं कवि होण्याचा उत्साह कोणाला वाटला नसेल ! पण या निराशामय स्थितीच्या मागेंच गुजरातकरितां एखादा टागोर लपून राहिला असेल अशी आशा सध्यांच्या जागृतीच्या काळांत करणें ठीक होईल. ईश्वर ही आशा पूर्ण करो !

२२ क

# तेव्हां:—

## तारुण्यांत तयार होणाऱ्या महत्त्वाकांक्षा

जगांत असंभाव्य असें काय आहे ? करारी मनुष्याला—सर्वच शक्य असतें. असें होणार नाहीं, तसें होणार नाहीं-असले विचार नामर्दपणा दर्शवितात. माझ्याकरितां काय अशक्य आहे ?

जेव्हां वेळ येईल तेव्हां मी दाखवीन. तेव्हां मी दाखवीन कीं हल्लीचें शिक्षण कसें कमजोर पायावर उभारलें आहे आणि त्यांत काय काय सुधारणा आणि कशा शक्य आहेत. तेव्हां मी दाखवीन कीं समाजांत काय काय सुधारणा आणि कशा कशा शक्य आहेत तें. तेव्हां मी दाखवीन कीं हिंदुस्तान हा कसा सुधारणा होऊ शकण्याजोगा देश आहे तो. तेव्हां मी ज्ञातिसंस्थेला इतका जोराचा फटका लगावीन कीं, समाजाला वाटेल आजपासून ज्ञाति वगैरे कांहीं नाहीं, त्या संस्थेचा नेहमींकरितां नाश झाला असें लोकांना वाटेल. तेव्हां मी स्त्रीशिक्षण, विवाह, पुनर्विवाह, विधवांची सामान्यस्थिति—इत्यादि प्रश्न अशा तऱ्हेनें सोडवीन कीं पुढें कांहीं करावयाचें क्वचितच उरेल.

जेव्हां वेळ येईल तेव्हां दाखवीन. तेव्हां गरीबांविषयीं मी इतकी कळकळ दाखवीन कीं, जरी गरिबी दुनियेंतून नाहींशी झाली नाहीं तरी गरिबीचीं दुःखें नेस्तनाबूद होतील. तेव्हां पाहून घेईन कीं गरीब आणि मध्यम स्थितीच्या लोकांवर धनिक कसे राज्य करतात तें. तेव्हां गरिबांकरितां अनाथाश्रम आणि उद्योगालय

स्थापण्याकरितां धनिकांकडून पैसा कसा नाहीं मिळत तें पाहीन. तेव्हां राव आणि रंक यांच्यांतील भेद नाहींसा करण्याचें कार्य असाध्य नाहीं असें आपण दाखवूं.

वेळ तर येऊं द्या ! जेव्हां ती येईल तेव्हां दाखवीन. तेव्हां धर्माचीं थोतांडें कमीं होतात कीं नाहीं तें पाहून घ्या. तेव्हां दाखवीन कीं धर्म हा केवळ रिकामटेकड्या लोकांच्या उद्योगाचें आणि लढण्याचें साधन आहे. तेव्हां सद्धर्म कसा पवित्र असतो तें पाहूं. तेव्हां अंधश्रद्धेची एकहि गोष्ट मी मानणार नाहीं, इतकेंच नाहीं तर व्याख्यानद्वारा, पुस्तकद्वारा आणि खासगी रीतीनें उपदेश करून धार्मिक भावना उत्पन्न करेन. इतकेंच नाहीं तर निरनिराळया धर्मांत होणारे झगडे नाहींसे कसे होत नाहींत आणि सर्वसंमत असा एक धर्म सर्वत्र कसा पसरत नाहीं तें पाहीन. तेव्हां नीतिच्या पायावर धर्माची उभारणी करण्याचा प्रयत्न करूं.

तेव्हांच पाहूं कीं खाणें पिणें, हिरणें फिरणें, नेसणें पांघरणें, चैनीच्या वस्तूंतील अवडंबर कसें कमी होत नाहीं तें. तेव्हां सर्व देशीं आणि देशाच्या रीतीप्रमाणें आपण ग्रहण करूं. तेव्हां साधेपणा सर्वस्वीं इष्ट कसा आहे तो पटवून देऊं.

तेव्हां स्वतंत्र जीवन कसें शक्य आहे तें दाखवूं. तेव्हां जगहि बघेल कीं व्यापारधंद्याची निरनिराळया दिशेनें वाढ सहज शक्य आहे. पण बुद्धि आणि साहसाच्या अभावीं अनेक माणसें नोकरी परतंत्रता आणि दैन्याच्या जोखडाखालीं कसें जात आहेत. तेव्हां आयुष्यांत कमविण्याची साधनें किती मोठीं आहेत तें कळेल. तेव्हां

पैसा कमविणें हें किती सोपें काम आहे त्याचा जगाला धडा मिळेल.

तेव्हां स्त्रियांची सामान्यपणें हिंदुसमाजांत उन्नति होईल. तेव्हां स्त्रियांची लिहिण्यावाचण्याची आवड कशी वाढत नाहीं तें पाहूं. तेव्हां पाहूं कीं त्यांना समाज आणि घरांतील पुरुषांच्या कार्यांत रस कसा उत्पन्न नाहीं होत तो. तेव्हां त्या आपली पराधीनता कशा सोडीत नाहींत तें पाहूं.

तेव्हां वाङ्मयाची स्थितीहि कशी उज्वल होत नाहीं तें दिसून येईल. तेव्हां वाङ्मयांत कांहींतरी नवें उत्साहवर्धक आणि भरीव असें बळ निर्माण करूं. तेव्हां आपण चर्वितचर्वण झालेल्या विषयांवर रडगाणीं न लिहितां, समाजाला जागृत करतील, त्यांत नव-चैतन्य ओततील अशीं उत्तम काव्यें रचू तेव्हां वाङ्मय पाचकळ प्रेमकथांनीं न भरतां सामाजिक प्रश्नांच्या चर्चेनें त्यांत मधुर झरे निर्माण करूं. तेव्हां जीवनकलहांच्या संतप्त क्षेत्रांत उच्च भावनांचा मुसळ-धार पाऊस पाडूं. तेव्हां आपण आपलें वाङ्मय आपल्या जीव-नाला अनुरूप बनवूं.

तात्पर्य, तेव्हां कल्पना आणि आदर्शाप्रमाणें गोष्टी कशा घडत नाहींत तें पाहूं.

२२–ख

# आतां

## वृद्धावस्थेंत दिसणाऱ्या निराशा

मनुष्य बिचारा काय करणार ? तो कितीहि हुशार असला तरी त्याचे पराक्रम परिस्थितीवर अवलंबून असतात. मनुष्य श्रम करू शकेल, अमर्याद श्रम करू शकेल, पण परिस्थितीला कांहीं बदलू शकणार नाहीं. इंग्रजींत अशी म्हण आहे कीं, मनुष्य आपल्या सावलीपलीकडे उडी घेऊं शकत नाहीं. अर्थात् कोणीहि मनुष्य आपल्या काळापासून फार दूर जाऊ शकत नाहीं. त्या काळांतील ज्या अडचणी असतील त्या त्याच्या अडचणी, त्या काळांतील जे दोष असतील ते त्याचे दोष, त्या काळांतील कमीपणा तो त्याचाहि कमीपणा राहणारच.

आतां असें वाटतें कीं मीं कांहींच केलें नाहीं. धारल्याप्रमाणें समाज सुधरविणें आतां अशक्य वाटतें. आतां असें वाटतें फार प्राचीन काळापासून चालत आलेली ज्ञातिसंस्था आहे तशी राहणारच. तिच्यांत बदल होत आहे, पण ती नेस्तनाबूत होईल किंवा कसें याविषयीं शंका आहे

आतां असें वाटतें कीं गरिबीचें दुःख क्वचित्च नाहींसें करतां येईल. आतां असें समजतें एका रीतीनें गरिबी नाहींशी करीत असतांना दुसऱ्या रीतीनें ती उत्पन्न होते. संस्था स्थापन केल्यानें गरिबीच्या अडचणी दूर होत नाहींत. सर्व संस्था सदोष असतात, आणि आदर्श संस्था बननिण्याकरितां आदर्श पुढारी

असावयाला हवेंत. ते आपल्या समाजांत नाहींत, इतकेंच नाहीं तर कोणत्याहि समाजांत नाहींत.

आतां धर्माच्या थोतांडाबद्दल तिरस्कार न वाटतां दया वाटते. इतकेंच नाहीं तर कांहीं थोतांडें आवडतात. आतां असें वाटतें कीं सुधारणा भाषणानें किंवा युक्तिवादानें होत नाहीं. त्याकरितां उच्च प्रकारचें धार्मिक जीवन हवें, संस्कारयुक्त धार्मिक भावना हव्यात, अचल श्रद्धा हवी. आतां कळतें कीं, धर्म--मत--पंथांचे झगडे तक्रार केल्यानें नाहींसे होत नाहींत तर त्यांबद्दल अनादर दर्शविल्यानें. चाललें आहे तें चालू देण्याशिवाय आतां दुसरा मार्ग दिसत नाहीं.

आतां खाण्यापिण्याच्या बाबतींतील स्थूल आनंद पूर्वी उपभोगीत असत तसेंच चालू ठेवणें इष्ट वाटतें. नदीचा प्रवाह अटकविणें आतां अशक्य वाटतें. आतां नाटकें, सिनेमा, वगैरे चैनीच्या गोष्टी अनिष्ट वाटतात, इतकेंच नाहीं तर त्यांत दिसणारें सर्व, ‘ प्राकृत ’ आणि अधम रसाला अनुकूल आहेसें वाटतें. तें आपल्या करितां नसलें तरी आपण तें सुधरूं शकूं असें वाटत नाहीं.

आतां स्वातंत्र्याचे आदर्श हवेंतील किल्ल्याप्रमाणें वाटतात. आतां साहसांत मूर्खपणा दिसतो. आतां नोकरी करणें म्हणजे शहाणपणानें आयुष्य व्यतीत करणें असें वाटतें.

आतां असें वाटतें कीं स्त्रियांच्या उन्नतीला पुष्कळ अवकाश आहे. आतां स्पष्ट दिसतें कीं, अनेक प्रकारचे प्रयत्न करूनहि जोंपर्यंत हिंदुस्तानांतील स्त्रियांच्या ठिकाणीं स्वोन्नति करण्याची

जागृति उत्पन्न होत नाहीं तोंपर्यंत बांधलेली शिदोरी किती दिवस टिकणार ? आणि तिच्यामुळें किती फायदा होणार ?

आतां वाङ्मय आहे तसेंच ठेवावेंसें वाटतें. आतां वाटतें कीं आपल्या ठिकाणीं साहित्यरसिकताच नाहीं. एखाद्यानें श्रम घेऊन उत्तम नाटक लिहिलें किंवा कादंबरी लिहिली तर टीकाकार त्याला अर्धमेला करून टाकतील. चांगले बोलणारे लोक पुस्तकाप्रीत्यर्थ पैहि खर्चत नसल्यामुळें लेखकाला पोटा पुरेसें देखील मिळत नाहीं. लोक वाहवा करून सद्विचारांना वाखाणतील खरे, पण अन्तःकरण-पूर्वक त्यांचा स्वीकार करणार नाहींत. सामाजिक प्रश्न सोडवि-ण्याची हिंमत धरणाऱ्या लेखकावर समाजाची करडी नजर राहणार आणि लायकीच्या उलट कदर होणार. म्हणून आतां असें वाटतें, होय—वाटतें खरें, कीं ज्याचें दुर्दैव ओढवलें असेल त्यानें साहि-त्यांत आदर्श निर्माण करावेत.

तात्पर्य, आतां असें वाटतें कीं तारुण्यांतील महत्त्वाकांक्षांना एकत्रित करून पुस्तकरूपानें लिहिल्या तर त्या पुस्तकाला खालील प्रमाणें नांव देतां येईलः—

## माझ्या निराशा

२१ ग

# अद्यापि

## निष्फळ आयुष्याचे सांत्वनपर विचार--अथवा बदललेली बाजू

खरें आहे. कीं, पुष्कळ धारलें होतें, पुष्कळ मानलें होतें; पुष्कळ आदर्शरुपानें विचार केला होता आणि हेंहि खरें कीं पुष्कळ वाया गेलें व पुष्कळ साधलें नाहीं. तरी पण काय झालें? कोणीहि धारलेलें करुं शकते का? असा कोणता देश आहे कीं, जिथें केलेले प्रयत्न सर्व सफळ होतात!

खरें आहे कीं, तारुण्यावस्थेंत सर्वजण एका आवाजानें समाजाची निंदा करायला तयार होतात; पण असें वाटतें कीं, दोष समाजाचा नसून तारुण्यावस्थेचा आहे. वाया कांहीं गेलेंच नाहीं; अथवा गेलें असलें तरी सकारण गेलें आहे. सनातन काळापासून चालत आलेल्या समाजांत दोष काढणें हा केवढा मूर्खपणा? प्राचीन गोष्टींचें सर्वतोपरी संरक्षण करणें, नवीन गोष्टींना हांकलून लावणें, आणि शुद्ध आर्य भावनांचा पुनरुद्धार करणें, अजूनहि शक्य आहे.

गरीबांची गरिबी कमी करणें, किंवा त्यांचीं दुःखें कमी करणें अशक्य वाटतें हें खरें आहे. पण त्यांत दोष कोणाचा? मानवी प्रयत्नाचा नाहीं. गेल्या जन्मीं केलेल्या पापकर्मांचीं अनिष्ट फळें मनुष्यमात्राला भोगावीं लागतात; त्याप्रमाणें गरीबांचीं दुःखें व गरीबी फळरुपानें असल्यावर तीं कमी कशी होणार? ती कमी न झाली

तरी एक गोष्ट स्वाधीन आहे ती ही कीं, तत्वज्ञानाचा प्रसार करून मनुष्यमात्राला चांगलीं कर्में करण्यांबद्दल प्रोत्साहन देणें कीं, ज्यामुळें भावी जन्मांतील फळें कडू येणार नाहींत.

खरें आहे कीं धर्मांत सुधारणा करता आल्या नाहींत; पण कशा करतां येणार ? धर्म समजण्याचा खरा अधिकारच आतां प्राप्त झाला आहे तर त्याचा उपयोग करुन अजूनहि ठिकठिकाणी हिंदुधर्माच्या प्राचीनतम विचार आणि भावनांचा मोठ्या प्रमाणावर प्रसार करतां येईल. अजूनही पुष्कळ करतां येण्याजोगें आहे आणि तें हें कीं, सडून गेलेल्या तरुण मेंदूंना जुन्या धर्माच्या शिक्षणानें आरोग्यमय बनविण्याचा प्रयत्न करणें.

एके काळीं चैनीच्या अनेक वस्तूंत नवे नवे प्रकार दाखल करण्याची इच्छा होती हें खरे. पण आतां तें सर्व मायारूप वाटतें. देहाच्या स्थूलधर्माकरितांच तें जरुरीचें असल्यामुळें आत्मिक उन्नतीला बाधक वाटतें अजून जें करण्यायोग्य आहे तें हें—शारीरिक कष्ट, व्रतें, आणि उपभोगमात्राचा त्याग. दुनिया चुकीच्या रस्त्यानें जात असावीशी वाटते; अजूनहि तिला जर निवृत्तीच्या रस्त्यावर आणतां येईल, त्यागी जीवनाकरितां अनुकूल बनवितां येईल, वैराग्यांत आनंद मानणारी बनवितां येईल. तर पुष्कळ शक्य आहे.

खरें आहे कीं स्वातंत्र्य मनुष्याला आपल्याकडे ओढीत असतें आणि हेंहि खरें कीं, तें प्राप्त करून घेण्यांत अडचणी आहेत. पण अजून " स्वातंत्र्याची इच्छा मोठी मोहक आहे. ऐहिक सुख ती प्राप्त करून देत. पारमार्थिक तिच्यांत कांहींच

नाहीं " असा विचार जगांत पसरविण्याची जरूरी आहे. स्वातंत्र्य काय ! पारतंत्र्य काय ! स्वातंत्र्य--पारतंत्र्य हे ऐहिक संबंधांचे भेद होत. ईश्वरासमोर सर्वजण दासच आहोंत. ही गोष्ट सर्वांना अजून पटवून द्यावयाला हवी आहे.

आतां स्त्रियांची उन्नति, वाङ्मयाची उन्नति व इतर कोण-त्याहि प्रकारची उन्नति निरुपयोगी वाटते ! उन्नति—किती मोहक शब्द ! जिथें अवनतीच आहे, तिथें उन्नति कुठली ? अवनतींतून मुक्ति मिळविणें, ऐहिक जीवनांतून सुटणें, पारमार्थिक वस्तुंशीं तन्मय होणें—या बाबतींत उन्नति हवी आहे. अजून हें करण्याचें व करविण्याचें बाकी आहे.

तात्पर्य, अजून असें वाटतें कीं, खऱ्या जीवनाला सुरवात झालीच नाहीं. आणि स्थूल प्रवृत्तींचा नाश म्हणजेच आत्म्याचा व सूक्ष्म प्रवृत्तींचा जन्म होय. म्हणून अजून मरावयाचें बाकी आहे, आणि जेव्हां मरूं तेव्हांच खरें जीवंत राहूं.

## तेव्हां : आतां : अद्यापि :

गरीब बिचारा मनुष्य ! अशीं कितीं माणसें असतील कीं वयाबरोबर ज्यांचे विचार बदलत असतील ! वाढत्या वयाबरोबर स्वतःलाच मूर्ख समजणारीं कितीं माणसें असतील ! ईश्वर असल्या दौर्बल्यापासून आपलें रक्षण करो !

२३

# वाङ्मयाची आवड

ज्या देशाचें वाङ्मय उच्च प्रकारचें नसेल तो देश उच्च प्रतीचा म्हणतां येणार नाहीं. वाङ्मयांत समाजाचें प्रतिबिंब पडतें. जसें वाङ्मय तसा समाज, आणि जसा समाज तसें वाङ्मय. मनुष्य ज्या प्रकारचें वाङ्मय वाचतो त्या प्रकारच्या आयुष्यांतील त्याच्या आवडी निर्णीत होतात. वाङ्मयाचा जीविताशीं गाढ संबंध आहे.

वाङ्मयाचें सेवन आपणाला आवश्यक आहे. असें असून एकदां धंद्यांत पडून एकमार्गी जीवनांत निमग्न झाल्यावर वाङ्मयाकडे किती तरी लोक दुर्लक्ष करितात! त्यांच्या मतें वाङ्मय म्हणजे निरुद्योगी लोकांचे उन्मत्त उद्गार. वाङ्मय म्हणजे विद्वानांच्या उपयोगी कांहीं वस्तु. वाङ्मय म्हणजे व्यवहारशून्य व जगाला अजाण अशा लोकांचा उद्योग. कशाला त्याकडे लक्ष द्या? वाङ्मयसेवेपेक्षां त्यांना स्वतःच्या धंद्याच्या गोष्टींत, मित्रांबरोबर करावयाच्या गप्पासप्पांत, क्लबांत किंवा दुसरीकडे खेळावयाच्या खेळांत, ज्यास्त आनंद वाटतो. या वृत्तीचें एक कारण आपल्या वाङ्मयाची दुर्दशा आहे, तर दुसरें कारण त्यांच्या स्वतःच्या ठिकाणीं आहे. आणि तें हें कीं त्यांच्याजवळ रसिकता नसते. ज्यांची रसिकता संस्कारी असेल त्यांना वाङ्मयांत रस घेतल्यावांचून कसें राहवेल? विचार करण्याची शक्ति—हें मनुष्याचें वैशिष्ट्य होय. त्याअर्थी जोंपर्यंत ही शक्ति विकासित होत नाहीं आणि त्या शक्तीला आनंद

मिळेल अशा प्रवृत्तींत मनुष्य पडत नाहीं तोंपर्यंत मनुष्यत्वाला आवश्यक गोष्ट तो करीत नाहीं असेंच म्हटलें पाहिजे.

**साहित्यसंगीतकलाविहीनः साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः ॥**

वाङ्मयरसिकता निरुपयोगी आहे. कारण तिच्यामुळें द्रव्य-प्राप्तीची शक्ति कांहीं मिळत नाहीं, असें पुष्कळ वेळां सांगण्यांत येतें. तिच्यापासून कांहीं खायला प्यायला थोडेंच मिळतें ? नाहींच. वाङ्मयापासून द्रव्यप्राप्ति होत नाहीं, येवढापुरता हा युक्तिवाद बरोबर आहे. वाङ्मयापासून कांहीं खाद्यपेय मिळत नाहीं. पण तेवढ्यानें तें निरूपयोगी आहे असें म्हणणें खोटें आहे. इतकेंच नाहीं तर उलट तेवढ्याच करितां तें उपयोगी आहे, तेवढ्याच करितां वाङ्मयरसिकतेचें पोषण होणें आवश्यक आहे. द्रव्यप्राप्ति किंवा खाद्यपेयांपासून मनुष्याला कांहीं संतोष मिळत नाहीं. तें सर्व मिळूनहि त्याला जीविताच्या प्रश्नाचें निराकरण करावयाचें असतें, कांहीं आदर्शांचा स्वीकार किंवा त्याग करावयाचा असतो, व्यक्ति आणि समाजाशीं कांहीं संबंध साधावयाचे असतात—आणि या सर्वांत वाङ्मय त्याला फारच उपयोगी पडतें.

आपलें दैनिक आयुष्य आपणाला एकच प्रकारच्या शुष्क प्रसंगांनीं भरलेलें दिसतें. पण असें आपणाला वाटण्याचें कारण हें कीं आपण वस्तुंकडे वरवर पाहतो. आपण व्यवहारांत इतकें मग्न असतो कीं दुसरें कांहींहि आपणाला दिसत नाहीं. पण अशा शुष्क नित्याच्या गोष्टींतहि साहित्याचे विरल सेवक कांहीं स्वर्गीय तत्त्वें बघू शकतात, आणि जगाला ते दाखवू शकतात. जग नंतर कबूल करतें कीं व्यवहारी दृष्टि खोटी असून ही दुसरी दृष्टि खरी

होय. कवी, नाटककार, कादंबरीकार आपणाला प्रोत्साहन देऊ शकतात याचें कारण हेंच होय. ज्या प्रसंगांना व जगाला ते बघतात; त्यांनाच आपणहि बघतो. फरक इतकाच असतो कीं, त्यांची दृष्टि कल्पना आणि ध्येयांनीं भरपूर असते; तर आपली दृष्टि संकुचित असते. निराशेंतहि त्यांना आशा व आशेंतहि निराशा, शुष्कपणांतहि रसिकता, आणि ऐहिक गोष्टींतहि त्यांना स्वर्गीय तत्त्वें दिसतात. आपणाला असें कांहीं दिसत नाहीं. पडद्याआड काय आहे तें ते बरोबर बघू व दाखवू शकतात. बाकीचे लोक तसें बघण्याचा प्रयत्नच करीत नाहींत किंवा केला तरी स्वार्थी आणि व्यवहारी दृष्टीनें केल्यामुळें खऱ्या गूढ स्वरूपाची पारख त्यांना होत नाहीं. ध्येय जीवितांत कुठें असतें ? तें तर वाङ्मयांत असतें. तरी देखिल ध्येयांतच सत्यांश जास्त असतो असें कोण नाहीं म्हणणार ? प्रेम, मैत्री, न्याय इत्यादिकांचीं उदाहरणें संसारांत मिळतील, पण तीं पाहिजे तशीं नसतात. त्याचीं आदर्शभूत उदाहरणें तर कवि किंवा नाटककाराच्या लेखणीद्वारांच प्रगट झालेलीं दिसतील किंवा एखाद्या धर्म अथवा नीतिच्या उपदेशकाकडून वर्णिलेलीं आढळतील. अशा उदाहरणांत किंवा उपदेशांत सत्य नसतें असें कोण म्हणेल ? व्यवहारांतल्या गोष्टींना अनेक तऱ्हांनीं प्रोत्साहन देणाऱ्या या साहित्यकथा अधिक स्पष्टपणें ईश्वराचें ज्ञान करवीत नाहींत असें कोण म्हणेल ? त्यांत सत्य नाहीं असें कोण म्हणेल ?

पुस्तकें छापलीं जाऊं लागल्यापासून वाङ्मयाच्या प्रसार इतका झाला आहे व पुस्तकें इतकीं स्वस्त मिळूं लागलीं आहेत कीं जो मनुष्य वाङ्मयाशीं सहवास ठेवतो, त्याला घरीं बसल्या सर्व

प्रकारच्या माणसाशीं भेटतां येतें व त्यांचा उपदेश ऐकतां येतो. कार्लाईलच्या म्हणण्याप्रमाणें उत्तम पुस्तकांचे लेखकच खरे भविष्यवेत्ते, खरे धर्मगुरू असतात आणि पुस्तकालय हेंच आपलें विश्वविद्यालय होय. उत्तम साहित्यसेवक हा समाजाचा व निसर्गाचा परीक्षक असतो; त्याच्या सूक्ष्म अवलोकनामुळें तो ज्या प्रकारचें भविष्यदर्शन करूं शकतो, तसें अन्य पुरुष करूं शकत नाहींत. साहित्यसेवकच आपला खरा धर्मगुरु आहे. धर्मगुरूचा उपदेश एक असेल आणि एखाद्या तेजस्वी लेखकाचा दुसरा असेल तर आपण त्या दुसऱ्या उपदेशानेंच आकर्षिले जाऊं; आणि त्या विचारांचा कर्ताच आपला खरा धर्मगुरू बनेल. पुस्तकालयाच्या बाबतींतहि तसेच आहे. एखादें लहानसें पण विवेकपूर्वक जमा केलेल्या पुस्तकांचें पुस्तकालय, हेंच आपलें खरें विश्वविद्यालय होय. आपल्या शाळेंतील गुरू हे तर नाममात्र असतात, त्यांच्या शिक्षणापेक्षां जास्त उच्च प्रकारचें शिक्षण आपणाला एखाद्या पुस्तकापासून मिळालें तर त्या पुस्तकाच्या लेखकालाच आपण खरा गुरू मानणार. अशा अनेक गुरूंचा संग्रह, पुस्तकालयाच्या मदतीनें, हल्लींच्या काळांत करता येतो. कार्लाईल यानें पुस्तकालय हेंच आपलें खरें विश्वविद्यालय असें म्हटलें आहे तें ठीकच.

साहित्यप्रेमी मनुष्य स्वतःच्या जीवनावर जो शुद्ध प्रकाश पाडू शकतो तो अन्य पुरुषांना पाडतां नाहीं येणार, हें उघडच आहे. निदान तितक्या आनंदानें किंवा सहजपणें तरी पाडतां नाहीं येणार. या विश्वरूपी रंगभूमीचा सूत्रधार तिला आपल्या

अंकुशांत कशी ठेवतो इकडे साहित्यप्रेमी नेहमीं लक्ष देतात. व्यवहाराच्या रुक्षतेंतहि साहित्यप्रेमी कांहीं निराळ्या प्रकारची रसिकता अनुभवतो. साहित्यप्रेमी पुरुषांच्या आयुष्यांत कंटाळवाणें प्रसंग फार कमी येतात. कारण ते वाचन, मनन किंवा उच्च प्रकारचें निरीक्षण करण्यांत नेहमीं उद्युक्त असतात त्यांच्या आयुष्यांत शून्यतेचे प्रसंग कमी येतात. त्यांच्या गरिबींतहि सद्विचार व आत्म्याचें उच्च आदर्शरूपी श्रीमंती असते. संसारांतील हलक्या स्थितींतहि स्वतंत्र भावनांच्या भव्यतेमुळें ते उच्च स्थितींत असतात. जंगलांतहि त्यांचें मंगल होतें दुर्भाग्यांतहि सद्भाग्याचे अंश असतात. तात्पर्य, जे कांहीं कंटाळवाणें किंवा त्रासदायक असेल त्यांतील वाईटपणा नाहींसा होऊन सद्भावनामुळें सर्व चांगलेंच दिसते. सद्भावनांच्या संगोपनांत साहित्यरसिकता महत्त्वाचा भाग घेत नाहीं असें कोण म्हणेल ?

२४

# कल्पनावाद

स्वप्नें मनुष्यमात्राला पडतात, पण तीं दोन प्रकारचीं असतात. झोंपेत पडणारीं किंवा जागृतावस्थेंत पडणारीं. पहिल्या प्रकारचीं स्वप्नें झोंपेला हानिकारक असतात आणि जागृतावस्थेंत त्यांपासून कांहीं फायदा होत नाहीं. पण दुसऱ्या प्रकारचीं स्वप्नें आयुष्यांत फार उपयोगीं असतात. अशीं स्वप्नें म्हणजे कल्पनासृष्टींत यथेच्छ विहार. अशीं स्वप्नें म्हणजे व्यवहारापासून दूर जाऊन आदर्श-विचारांत रममाण होणें.

एके प्रसंगीं मीं माझ्या भाषणांत असा विचार प्रदर्शित केला होता कीं, विद्यार्थी दशेंतील कांहीं खास हक्क असतात, त्यांतील एक असा कीं कल्पना आणि ध्येयाच्या सृष्टींत मनसोक्त विहार करणें. व्यावहारिक जीवन कशा प्रकारचें असते याची विद्यार्थी दशेंत फारच थोड्यांना जाणीव असते. परिस्थिति त्यांना व्यवहारापासून दूर ठेवणारी अशी असते. त्यांचें ज्ञान त्यांना पुस्तकांच्या मार्फत मिळालेंले असतें. आणि गुरूकडून जरी तें मिळालेलें असलें तरी त्यांत व्यवहाराचा भाग थोडा असतो. कारण गुरू जितके ध्येय-सृष्टींत रमतील तितकें त्यांचें कार्य उच्चतर बनेल; आणि गुरूंचें आयुष्य बहुतेक एकमार्गीच असते. व्यवहारांतील अडचणी अशा नोकरी करणाऱ्यांना क्वचित्‌च अनुभवायला सांपडतील. यामुळें विद्यार्थी व्यवहारापासून दूरच राहतात. दुसरें तें तारुण्या-वस्थेंत असतात. आणि तारुण्यावस्थेचा काळ हा आशा, कल्पना,

ध्येय, स्वप्नें यांचा असतो. अशा कारणामुळें विद्यार्थीदशेंतील खास हक्क, माझ्या त्या भाषणांतील मुख्य मुद्याप्रमाणें धन्य अधिकार, स्वप्नसृष्टींत, रममाण होण्याचा, कल्पना करण्याचा, आणि ध्येयें रचण्याचा असतो आणि खुशाल तो तसा असो ! ज्या तरुणानें हा अधिकार उत्तम रीतीनें गाजविला नसेल त्याचें भविष्य क्वचित्‌च उज्ज्वलै निघेल.

तरुणांप्रमाणें मनुष्यमात्राला ही गोष्ट आवश्यक आहे. दृष्टीसमोरच्या गोष्टींहून दूरच्या गोष्टींचा जो विचार करूं शकत नाहीं, अमोल आशांनी भरलेल्या मधुर स्वप्नांचा जो अनुभव घेऊं शकत नाहीं, उच्च ध्येयांची स्वतःच्या भावी जीवनांतील नियामक तत्वें म्हणून जो स्थापना करुं शकत नाहीं, त्याची उन्नति क्वचित्‌च होते आणि झाली तरी ती नाहीं सारखीच.

कल्पना करणें, स्वप्नांचा अनुभव घेणें म्हणजे आकाशांतील चंद्राला पकडण्याजोगें निरर्थक आहे असें कित्येक वेळा म्हणण्यांत येतें. अर्थात व्यवहारांत असाध्य अशा वस्तूला साध्य करण्याकरितां व्यर्थ परिश्रम करण्याजोगे व शक्तिचा अपव्यय करण्यांजोगें हें आहे. आतां हें खरोखर असें आहे किंवा नाहीं तें पुष्कळ अंशीं कल्पनांवर अवलंबून असतें. तुम्ही किंवा मी जपानचा राजा होऊन प्रजेला असें सुख देऊं आणि तसें सुख देऊं, असा कायदा करूं आणि तसा कायदा करूं इत्यादि विचार करणें हास्यास्पद होय, आणि त्यांना अमलांत आणण्याकरितां मेंदुला दिलेले श्रम व्यर्थच होत. पुष्कळांच्या कल्पना थोडयाफार अंशानें अशा प्रकारच्या असतात आणि म्हणून जगांत. कल्पनावाद हास्यास्पद होऊन

बसला आहे. पण तुम्हीं किंवा मी उत्तम लेखक, उत्तम शिक्षक उत्तम वकील झाल्यावर काय काय विचार व कोणकोणतीं ध्येयें अमलांत आणावयाचीं याचा विचार व्यक्त किंवा अव्यक्तपणें न केला तर आपणाला आपलें आयुष्य उज्ज्वल बनवितां येणार नाहीं.

कल्पनेवांचून समाजसुधारक कोण बनू शकतो ? कल्पनेवांचून धर्मसुधारकहि कोण बनू शकतो ? कल्पनांवांचून स्वतःच्या व दुसऱ्यांच्या आयुष्याला उज्ज्वल कोण बनवू शकतो ? जशा कल्पना अधिक उदात्त तसें जीवन अधिक चांगलें निघण्याचा संभव. जेवढ्या कल्पना मोठ्या, तेवढे त्यांना साध्य करण्याकरितां मोठे प्रयत्न करावे लागतात, आणि तसें केल्यानें धारलेलें पार नाहीं पडलें तरी कांहीं फायदा होतोच; कल्पनांवांचून जें कांहीं साधलें जातें त्यांत आणि कल्पनांसहित जें साध्य होतें त्यांत नेहमीं फरक राहणारच.

कल्पना आणि विज्ञानशास्त्र यांचा नेहमीं विरोध दर्शविण्यांत येतो. विज्ञानाची वृद्धि अनुभव आणि प्रयोगांच्या जोरावर झाली आहे, आणि कल्पनेचें तर या गोष्टींशीं वावडें आहे. म्हणून कल्पना त्याज्य होत असें सांगण्यांत येतें. पण हें खरें नाहीं. कल्पनेचा आणि अनुभवाचा विरोध आहे हें खरें, पण कल्पना आणि विज्ञान यांचा विरोध मुळींच नाहीं. नव्या नव्या कल्पनांवांचून किती थोडे शोध होतात ? कल्पनांवांचून नवीन शोध शक्य आहेत काय ? न्यूटन यानें पृथ्वीवर पडणाऱ्या वस्तु आणि आकाशांत सूर्याकडे आकर्षिले जाणाऱ्या ग्रहांचा नियम एकच असला पाहिजे अशी प्रथम कल्पनाच केली होती. त्यानें अशी कल्पना केली

नसती तर गुरुत्वाकर्षणाचा मोठा शोध लागलाच नसता. पुष्कळ नियम असे कल्पितच असतात. प्रसंगांशीं ते जुळते आल्यानें सिद्ध मोजले गेले आहेत. पण ते अगोदर कल्पिले नसते गेले तर सिद्धहि झाले नसते हेंहि खरें आहे. वैज्ञानिक शोधांचेंहि असेंच आहे. आगगाडी, मोटर, विमान वगैरे आश्चर्यकारक गोष्टी एकेकाळीं एखाद्या विज्ञानशास्त्र्याच्या डोक्यांतील स्वप्नदर्शनेंच होतीं. विज्ञानाची खरी वाढ कल्पनांवांचून शक्य नाहीं.

ज्याच्या कल्पना शुद्ध, ज्याचीं स्वप्नें मधुर, ज्याची ध्येयें उच्च आणि हें सर्व पाहण्याची ज्याची इच्छा प्रबळ व ज्याचे प्रयत्न अमर्याद असतील तोच मनुष्य जगांत कांहीं करू शकतो. नाहींतर व्यावहारिक आयुष्य अनुभवांप्रमाणें व्यतीत करणाऱ्यांचें जग बनलेलें आहेच. ते आयुष्य घालवितील, पण विशेष कांहीं करून दाखवितील असें क्वचित्च घडेल. कल्पना करणारे फसतात हें खरें आहे. स्वप्नें पुष्कळ वेळां स्वप्नेंच रहातात. आणि ध्येयवादी यांचीं ध्येयें फलीभूत न होतां, त्यांना अधिक कष्ट सहन करावे लागतात हेंहि खरें आहे. त्याचबरोबर या सर्व निष्फळतेंत सफळतेचीं बीजें असतात हेंहि कांहीं खोटें नाहीं. लक्षांत फक्त इतकेंच ठेवावयाचें कीं, या कल्पना सट्टेबाजी प्रमाणें नसाव्यात. श्रमांच्या प्रमाणांत कल्पना आणि कल्पनांच्या प्रमाणांत श्रम व्हावयाला हवेंत. जर असें झालें तर कोणतीहि कल्पना शेवटीं निष्फळ ठरत नाहीं. कल्पना करा आणि तुम्ही सुधराल; कल्पना करा आणि तुमची प्रगति होईल; कल्पना करा आणि तुम्ही सुखी व्हाल.

२५

# निसर्ग

मनुष्य निसर्गाचें अंग आहे. निसर्गावर त्याचें प्रेम असतें. कारण तो स्वतःच निसर्ग आहे. निसर्गांत जें नाहीं तें त्याच्यांत नाहीं. जें त्याच्यांत नाहीं तें निसर्गांतहि नाहीं. निसर्ग ईश्वर आहे. अथवा तसें नसलें तरी निसर्गांत ईश्वर आहेच. ज्याचें निसर्गावर प्रेम नसतें, त्याचें ईश्वरांवर नसतें; तो भयंकर असतो, कृत्रिम असतो, आणि कृत्रिमपणा नेहमीं सद्गुणांपासून दूर असतो. म्हणून अशा माणसापासून नेहमीं सावध असावें. निसर्गविरोधी मनुष्य नीति-विरोधी असतो.

निसर्गांत शुद्धता आहे. निसर्गांत माधुर्य आहे. निसर्गांत पावित्र्य आहे. जर निसर्गांत हें सर्व नसेल तर तें कुठेंहि नसेल.

जितके निसर्गाचे अंश मनुष्यांत अधिक तितकी त्याच्या ठिकाणीं शुद्धता, मधुरता, पवित्रता अधिक. उत्तम कवीचे ठिकाणीं हें सर्व असतें. जो निसर्गमय असतो तो स्वतः आणि भोंवतालची सृष्टि यांत त्याच्या दृष्टीनें भेद नसतो. म्हणूनच तो ज्ञानी असतो. खरा तत्त्वज्ञानी तोच असतो.

निसर्गावर प्रेम करावयाचें असल्यास निसर्गांतच फिरा. पक्ष्यांच्या किलकिलाटांत, सूर्याच्या उदयास्तांत, नद्यांच्या खळबळाटांत, समुद्राच्या भरती ओहोटींत, काय आहे तें पहा. वाऱ्याच्या सोसा-ट्यांत आणि पावसाच्या झिमाझिममध्यें काय दिसतें तें पाहा. पर्व-ताच्या खिंडारांत आणि अरण्यांत काय आढळतें तें बघा. बघाल

इतकेंच पुरेसें आहे. येथें ज्ञाता आणि ज्ञेय यांत भेद नाहीं. काय आहे तें पाहिल्याबरोबरच त्यांतील सुंदरता, मधुरता, भव्यता, दिव्यता जें असेल तें तुम्ही जाणाल. येथें पाहतांक्षणींच ज्ञान मिळतें; ज्याला तसें होत नाहीं त्याला ज्ञान कधींहि मिळत नाहीं.

निसर्गावांचून शारीरिक आणि मानसिक जीवन अशक्य आहे. निसर्गाखेरीज आपलें पोषण शक्य नाहीं. क्षणोक्षणीं आपण निसर्गाच्या कृपेवर अवलंबून असतो. आपलें अन्न, आपला श्वासोच्छ्वास, आपलें पाणी, आपणाला क्षणोक्षणीं लागणाऱ्या वस्तु— निसर्गापासूनच आपणाला मिळतात. मानसिक जीवनाविषयींहि असेंच आहे. आपण समाजाकडून कोणकोणत्या गोष्टींची आशा करितो ? मित्र मदत करील, मातापिता पोषण करतील, राजा पालन करील,—या श्रद्धेच्या जोरावरच आपण मानसिक शांति आणि मानसिक जीवन अनुभवतों. या श्रद्धेचा आधार कशावर आहे ? निसर्गावरच. निसर्गाच्या नियमांवरच ही श्रद्धा आधारलेली असते. चांगल्या माणसांकडून चांगल्या गोष्टींची अपेक्षा करणें, मित्राकडून मैत्रीची, मातापितरांकडून पोषणाची, राजाकडून पालनाची-या सर्व आशा त्या त्या व्यक्तींचा स्वभाव टिकण्यावर अवलंबून असतात. आणि जसें बनत आले आहे तसें बनेलच या नियमांवर आपली तद्विषय श्रद्धा उभारलेली असते. हा नियम निसर्गाचा आहे. किंबहुना तो नियमच निसर्ग आहे.

निसर्गावांचून आपली प्रगति तरी कोठे होते ? विज्ञानाच्या जोरावर आपण निसर्गावर सत्ता मिळवू शकतो. आणि निसर्गाला आपलें सहाय्यक, किंवा कित्येक म्हणतात त्याप्रमाणें गुलाम बनवू

शकतो. आगगाडी, तारायंत्र, मोटर, विमान इत्यदि सर्व निसर्गावर विज्ञानाच्या जोरावर आपण मिळविलेली सत्ता दर्शवितात. आणि त्यांच्यामुळें आधुनिक प्रगति आपणाला सर्वत्र दिसते. पण आपण निसर्गाला सहाय्यक किंवा गुलाम बनविले याचा अर्थ काय? निसर्ग एखादी निराळी वस्तु असावी आणि ती आपण आपल्या अंकित केली, असा अर्थ तर नाहींच. विज्ञानशास्त्री अशा प्रकारचा अहंकार बाळगतात. निसर्गामुळेंच ते मोठे झाले, निसर्गाला ते वाटेल तें करायला लावू शकतात असें ते मानतात. गरीब बिचारे विज्ञानशास्त्री! तुमची मला दया येते. दया येते एवढ्याकरितां कीं, तुम्हांला तुमच्या निर्बलतेचें भान नाहीं. निसर्गाला तुम्ही दास बनविता! बनवितां का तुम्ही निसर्गाला दास? मुळींच नाहीं. निसर्गाचें एक बळ दुसऱ्या बळावर सत्ता गाजविते. तुम्ही कांहींच करूं शकत नाहीं. तुम्ही निसर्गाला फक्त आपलें सहाय्यक बनवू शकता. यापेक्षां दुसरें कांहीं करणें तुम्हांला अशक्य आहे.

प्रिय वाचक, तूं निसर्गावर प्रेम कर आणि निसर्ग तुझ्यावर प्रेम करील. तुझ्या आनंदाची तें वाढ करील आणि तुझ्या दुःखांत तें तुझें सान्त्वन करील. आपण जेव्हां आनंदांत असतो तेव्हां निसर्गहि आपणाला आनंदांत नाहीं दिसत का? आपला आनंद निसर्ग द्विगुणित करतें. आपण दुःखांत असतो तेव्हां निसर्गहि दुःखी दिसत नाही का? कलापी म्हणतात त्याप्रमाणें त्यांत निःसंशय कांहीं तरी किमया आहे; त्यांत अशी कांहीं जादू आहे कीं जो जितकें त्याच्यावर प्रेम करतो तितकें तें त्याच्यावर प्रेम करतें, त्याच्या अशा औदार्यांतच त्याचें ऐश्वर्य आहे.

जगांत अप्रामाणिकपणा व तंटे बखेडे असतात. निसर्गांत तें कांहींहि नाही. निसर्ग कोणाला फसवीत नाहीं. आणि म्हणूनच विज्ञानशास्त्री म्हणतात त्या प्रकारची सत्ता त्यांना निसर्गावर मिळते. निसर्ग फसवितें तें फक्त ठगांनाच; निसर्ग भांडतें तें फक्त भांडखोरांबरोबरच.

निसर्गाशी विरोध करुन कोण यशस्वी झाला आहे ? कोणाला सुख आणि आनंद मिळाला आहे ? दुर्गुणी जीवन कृत्रिम असतें आणि म्हणून दु:खदायक असतें. सद्गुणी जीवन नैसर्गिक असतें आणि म्हणूनच सुखदायक आणि श्रेष्ठ असतें. सुरवातीला सुखी न वाटलें तरी परिणामीं तें सुखीच निपजतें. निसर्गांत ईश्वर दृश्यमान होतो. कोणी म्हणतात कीं ईश्वराला आम्ही मानीत नाहीं, कारण आम्हांला तो दिसत नाहीं. अशांना मी एवढेंच सांगेन कीं, निसर्गाकडे बघा, तिथें ईश्वर आहेच आहे. तुमच्या डोळयांना तुम्हीं बघतां काय ? तुमच्या आत्म्याला तुम्हीं पाहतां काय ? तुम्हीं स्वत:ला बघतां काय ? जर बघत असला तर कोणत्या रीतीनें बघतां तें दाखवा. त्या त्या वस्तूच्या अविर्भावांत अथवा त्यांच्या क्रियेमध्यें तुम्हीं स्वत:ला कल्पनेनें जाणतां, तसें नसेल तर तुम्ही न पाहतां नुसतें मानतां असें म्हणावें लागेल. ह्याचप्रमाणें निसर्गाच्या ठिकाणीं ईश्वराला पाहा. आणि तसें पाहतां न आलें तर माना, आणि निसर्गांत ईश्वर असल्यामुळ निसर्गावर प्रेम करा निसर्गाचें अनुकरण करा, निसर्गाची पूजा करा. मग तुम्हांला कसलीहि गरज भासणार नाहीं.

२६

# विवाह

बेकन यानें एके ठिकाणीं लिहिलें आहे कीं, जे लोक विवाह केल्यावाचूनचें आयुष्य घालवितात ते उत्तम मित्र, मालक आणि उत्तम नोकर असतात. पण नेहमींच ते कांहीं उत्तम 'प्रजा' नसतात. कारण ते लवकर वाटेल तिकडे पळून जाऊ शकतात. दंगेधोपे आणि लबाडीनें भरलेल्या मुंबई शहरांत जर एखादा एकटा दुकटा तरुण मनुष्य भाड्याची खोली शोधायला गेला तर चांगल्या चाळींतून त्याला पहिला प्रश्न हा विचारण्यांत येईल कीं, तुम्ही कुटुंबवत्सल अहात कीं, एकटे ? एकट्या मनुष्याबद्दल अविश्वास दाखविण्यांत येतो. अशा तऱ्हेनें मनुष्य व नागरिक या नात्यानें एकट्या दुकट्या मनुष्याकडे अविश्वासानें बघण्यांत कांहीं तथ्य आहे काय ? ह्या प्रश्नाचें उत्तर देणें कांहीं सोपें नाहीं. कारण कित्येक कुटुंबवत्सल एकट्या माणसाकरितांहि अधिक लबाड असतात आणि कित्येक एकटीं माणसें कुटुंबवत्सल मंडळींपेक्षां अधिक चांगलीं असतात. तरी पण समाजांत एकट्यादुकट्याकडे सामान्यपणें अविश्वासाची करडी नजर असते. याचीं कारणें अशीं आहेत कीं, विवाह मनुष्याला बंधनांत आणितो. विवाह मनुष्याला मऊ बनवितो. विवाह मनुष्याला रीतभात शिकवितो. विवाह मनुष्याला शब्दशः **गृहस्थ** बनवितो. आणि **गृहस्थ** नसलेल्या मनुष्याबद्दल समाजानें अविश्वास दाखविला तर तो सकारण होय.

एकट्यापेक्षां दुकट्याचें जीवन सामाजिक दृष्टीनें अधिक श्रेष्ठ होय. इतकेंच नाहीं तर व्यक्तिजीवनाच्या दृष्टीनें देखील तें

श्रेष्ठ होय. एकट्याचें सुख तें सुख नाहीं व दुकट्याचें दुःख तें दुःख नाहीं. विभागल्यानें दुःख कमी होतें आणि वांटणी केल्यानें सुख वाटतें.

ह्याचा अर्थ असा नव्हे कीं, विवाह करणें स्त्रीपुरुषाला आवश्यक आहे. एकमेकांची परीक्षा घेतल्यावांचून किंवा एकमेकांच्या आवडीनिवडीचा अभ्यास केल्यावांचून भावलाभावलीप्रमाणें दुसऱ्यांनीं लावलेल्या विवाहाला क्वचितच विवाह म्हणतां येईल. विवाहानंतर प्रत्येकाला कित्येक कर्तव्यें स्वीकारावी लागतात आणि त्याखेरीज कित्येक आकांक्षांवर पाणी सोडावें लागतें समजा, एखाद्याचें ध्येय एकाकी जीवनांत सफळ होण्याजोगें आहे आणि त्याकरितां त्याची तीव्र इच्छा असेल तर काय त्यानें त्याचा त्याग करावा ? समजा, एखाद्या स्त्रीची देशसेवा करण्याची तीव्र इच्छा आहे, वाङ्मयसेवा करण्याची लालसा असेल, ऐहिक आनंदाबद्दल तिरस्कार असेल, आणि त्या सर्वांकरितां तिची लायकी असेल, तर काय तिनें विवाह करून फुकट त्रास सोसावा ? त्याचप्रमाणें समजा कीं एखाद्या पुरुषाला तनमनधन देशाची किंवा समाजाची सेवा करण्यांत आयुष्य घालवावयाचें असेल, अथवा त्याचा इतक्या मोठ्या आकांक्षा आहेत कीं त्या साध्य करण्यांत विवाहाची अडचण होण्याजोगी आहे, तर काय त्यानेंहि विवाहाची बेडी पायांत अडकवून घ्यावी ? या प्रश्नाचें उत्तर देणें थोडें कठिण वाटेल, पण सामान्यपणें असें लोक अपवादरूप असतात सर्व साधारणपणें वैवाहिक जीवनांतच सुख असतें. वैवाहिक जीवनांत बंधनें असतात. पण मनुष्याची प्रगति करणारीं तीं बंधनें असतात. मनुष्याला संस्कारयुक्त आनंद उपभोगायला विवाह शिकवितो.

आणि म्हणून वैवाहिक बंधन हें सर्वथा इष्ट होय. विवाह ही स्वार्थ-त्यागाची पाठशाळा आहे. आग्रह दुराग्रहाचा त्याग करायला या शाळेंत तो शिकतो, आणि सामाजिक जीवनाकरितां लायकहि तो येथेंच बनतो. आयुष्याच्या निरनिराळ्या काळांत उत्पन्न होणाऱ्या गरजा भागविणारी विवाह ही एक संस्था आहे. तारुण्यावस्थेंत प्रेमोर्मींनीं कोणत्या तरुण–तरुणीच्या हृदयावर सत्ता गाजविली नसेल? त्या प्रेमोर्मींना पवित्र दिशेंत ठेवण्याचें कार्य विवाहानें साध्य होतें. विवाह त्या ऊर्मींना शांतिमय बनवितो. विवाहावांचून प्रेमोर्मी मनुष्याला घातक होतात. तारुण्यावस्थेंतील अडीअडचणींच्या वेळीं कोणत्या स्त्रीला अगर पुरुषाला जिवलग स्नेहाची जरूरी भासत नाहीं? विवाहानें अशा प्रकारच्या मित्राची गरज भागते. वृद्धावस्थेंत सर्वांना शारीरिक कमजोरपणा भासतो. त्या काळांत पत्नी पतिची सेविका बनते आणि पति पत्नीचा सेवक बनायला हवा. आयुष्याच्या निरनिराळ्या परिस्थितींत एकसारखें-पणानें उपयोगीं पडणारें विवाहासारखें-अर्थात् विवाहाच्या परिणामरूपी संबंधासारखें–दुसरें काय असूं शकणार?

पण असले आदर्शरूप संबंध किती होतात? विवाहानंतर शोक करण्याची पाळी हिंदुस्तानांत किती तरी विवाहांत येते! आणि तसें होणारच. कारण विवाह करणाऱ्यांच्या संमतिशिवाय येथें विवाह होतात. शिक्षणाच्या वाढीमुळें आणि इतर कांहीं कारणांमुळें विवाहाचें वय आतां वाढू लागलें आहे. आणि विवाहाची वयोमर्यादा वाढली कीं इच्छा असो वा नसो विवाह करणाऱ्यांची संमति घेतली जाईलच.

पण या स्थळीं दुसरा एक मुद्दा विचारांत घेण्याजोगा आहे. लग्न कोणत्या वयांत करावें ? मुलीचें वय किती असावें ? मुलाचें किती असावें? या प्रश्नांचें नक्की उत्तर देणें शक्य नाहीं. कारण वय हें शारीरिक आणि मानसिक विकासाचें केवळ चिन्ह आहे. आयुष्यांत किती पुढें गेलों त्याची सूचना वयामुळें मिळते. विकास होणें हें अगत्याचें आहे. लग्नामुळें शारीरिक, व मानसिक, व सामाजिक कर्तव्यें उत्पन्न होतात; आणि या सर्व बाबतींत सारख्याच वयाच्या स्त्रीपुरुषांत कांहीं सारखाच विकास झालेला नसतो. असें जर आहे तर विवाहाची वयोमर्यादा ठरविणें हें हास्यास्पद होय तरुण किंवा तरुणींत शरीराची पूर्ण वाढ सामान्यपणें वयाच्या अठरा ते वीस वर्षांच्या दरम्यान होतें. तरुणांपेक्षां तरुणींची मानसिक वाढ लवकर होते. सामान्यपणें अठरा ते वीस वर्षांच्या तरुणापेक्षां तितक्याच वयाची तरुणी जगाविषयीं अधिक जाणत असलेली दिसते–शिवाय विवाहामुळें लालनपालनाची जबाबदारी उत्पन्न होते. जो स्वतः कमवीत नाहीं त्यानें लग्न करणें भयंकर होय. त्याचें लग्न त्याला संकटांत टाकतें, आणि त्याच्या स्वतःच्या आकांक्षावर अंकुश ठेवितें. इंग्रजींत अशी एक म्हण आहे कीं दारिद्र्य जेव्हां दारावाटें आंत येतें तेव्हां प्रेम खिडकींतून उडी घेऊन पळून जातें. ही म्हण आयुष्यांतील कटु अनुभवांचें दिग्दर्शन करविते. प्रेम, स्नेह, हीं देखील दारिद्र्य आलें कीं बहुतेक नाहींशीं होतात. आर्थिक स्थितीचा पाय ज्याचा मजबूत झालेला नाहीं अशानें लग्न करणें म्हणजे स्वतःचें भविष्य बिघडवून घेण्याजोगें, लग्नांतील कटूता वाढविण्याजोगें आणि समाजांत भाररूप आयुष्य घालविण्याजोगें आहे.

तरीपण हें सत्य, ही मर्यादा, लक्षांत ठेवूनहि असें म्हणतां येईल कीं, विवाहकाल अकारण लांबवूं नये. अशा बाबतींतील आंकड्यांची मोजदाद ही अपूर्ण व वरवरच समजावी. फार मोठ्या वयीं केलेलीं लग्नें, कांहीं नेहमींच सुखकारक नाहीं होत; त्यांत 'शेळी काढायला गेलों, तों उंटच शिरला' या म्हणीसारखीच स्थिति होण्याचें फार भय असतें. लहान वयांत युवक आणि युवती यांची वाढ होत असते. एकमेकांचीं मानसिक वळणें बदलतां येण्याजोगीं असतात. पण मोठ्या वयांत नास्तिक तो नास्तिक, आस्तिक तो आस्तिक, चैनी तो चैनी आणि कद्रु तो कद्रु, कडक तो कडक आणि नरम तो नरम अशा अमुक एका वळणांतच स्त्री किंवा पुरुष कायम रहातात. आणि अशा प्रकारचा कायमपणा किंवा आग्रहीपणा लग्न झालेल्यांना कधीं सुखदायक झाला आहे ? पतिपत्नींच्या सुखाकरितां जी आवश्यक गोष्ट आहे ती ही कीं, दोघांच्या भावनांचें ऐक्य, दोघांच्या विचारांतील सारखेपणा, दोघांच्या आयुष्यांतील अनुकूलता–हें जिथें नसेल तिथें तें संपादन करायला हवें आणि तें अमुक एक वयापर्यंतच होऊं शकतें. ज्या प्रमाणें शिक्षण उमलत्या मेंदुलाच देणें सुलभ असतें त्याप्रमाणें अशा प्रकारचें ऐक्य स्थापन करणें अमुक एक वयांतच शक्य असतें. त्यानंतर जिथें काडीमोड करणें अशक्य असेल तिथें एकदां विवाह झाला कीं, तो कायमकरितां बंधनकारक. हें बंधन सरळ असेल तर सुख मिळेल, तसें नसेल किंवा तसें होऊं न शकलें तर कायमचें दुःख. या दृष्टीनें मी लहान वयांत लग्न करणें पसंत करतों. लहान वयांत म्हणजे सामान्यपणें मुलीच्या बाबतींत सोळा सतराव्या वर्षीं, आणि मुलाच्या बाबतींत बावीस तेवीसाव्या वर्षी.

२७

# आचार आणि विचार

आचार आणि विचार, वर्तन आणि मनन–हा अनुक्रम मी नेहमीं पसंत करतों. आणि या अनुक्रमांत मी नेहमीं एक गर्भित अर्थ पहात असतों. आचार आणि विचार या दोहोंत पहिल्यालाच मी अधिक महत्त्व देतों. आणि पहिला दुसऱ्याला सहज ओढून नेऊ शकतो असें मी मानतों. या गोष्टीचे पुरावे हवे असल्यास सहज मिळतील. समजा कीं तुम्ही शांत प्रकृतिचे आहांत. भांडण करा आणि तुम्हीं भांडणाचे चाहते बनाल. समजा तुम्ही सुधारक नाहीं आहांत. जरा स्वातंत्र्य मिळूं द्या आणि तुम्ही सुधारकी विचाराचे बनाल. समजा कीं तुम्ही स्त्रीस्वातंत्र्याच्या विरुद्ध आहांत. तुम्ही त्याचा अनुभव घ्या आणि तुमचे विचार पालटतील. ह्याच्या उलट समजा कीं एखाद्या विचाराला आचारांत उतरविण्याची इच्छा करीत आहांत. तरी असें होईल कीं, तुम्ही विचार करीतच रहाल आणि तसें असूनहि तुम्ही कदाचित कार्य करूं नाहीं शकणार. मी असा विचार करतों कीं, मी ज्ञातिबंधनें तोडायला हवींत. मी असा विचार करतों कीं, अधमवृत्तींना मी थारा देतां कामा नये. मी असा विचार करतों कीं, अमुक मंडळींत मी फिरतां कामा नये; असें असून हे विचार केवळ विचारच राहून आचारांत त्यांचें परिवर्तन न होणें शक्य आहे. मी कवितेचा शत्रु असूनहि जर चार ओळी रचल्या तर माझे विचार बदलतील. मी देखील कवि बनण्याची आशा बाळगीन आणि कवींना चाहीन.

व्याकरणाविषयीं माझें कांहींहि मत नसलें तरी सद्ग्रंथानें जर मी लेखक बनलों तर माझे विचार व्याकरणाच्या बाबतींत अनुकूल बनतील. मी ज्ञातिबंधनांच्या बाबतींत अनुकूल असलों, आणि एक वेळ जर मीं तीं तोडलीं तर त्या बाबतींत माझे विचार पालटतील. मी देखील सुधारक होण्याची इच्छा बाळगीन आणि सुधारक बनू शकेन.

हें झालें वरवर पाहाणें. सूक्ष्मपणें बघितलें असतां आचार-विचारांचें संबंध फार दृढ असलेले आढळतील. आचार आणि विचार हे आयुष्यरूपी ढालीच्या दोन बाजूंप्रमाणें होत. त्या दोहोंतील एक, आयुष्याचा सूक्ष्म आविर्भाव आहे, दुसरा स्थूल आविर्भाव. जसा आचार हा विचाराचा उत्पादक आहे, तसाच विचारहि आचाराचा उत्पादक आहे. विचार असून तो आचारांत आला नाहीं तर समजावें कीं, विचार असावा तितका सरळ नाहीं. कांहीं गडबड आहे. कांहीं खटपट आहे. कांहीं गुंतागुंत आहे. रस्सीखेंचाच्या खेळांत दोन पक्ष असतात. आणि दोन्ही पक्ष दोराला समोर ओढतात. दोर एकाहि दिशेला ओढला न गेल्यावरून कांहीं असें अनुमान काढतां नाहीं येणार कीं, दोरावर जोर वापरण्यांत येत नाहीं. तो एका बाजूला हळूच ताणला गेल्यावरून कांहीं असें समजतां नाहीं येणार कीं, जोर फारच थोडें वापरण्यांत येत आहे. त्याचप्रमाणें एखादा विचार आचारांत न आला तर तेवढ्या-वरून असें म्हणतां नाहीं येणार कीं, विचारांत असलेली काम-करविण्याची शक्ति मदत करीतच नाहीं. ती शक्ति वापरली जाऊ-नहि वर्तनावर कांहीं परिणाम न झाला, तर विचार गुंतागुंतीचे

व विरोधी असले पाहिजेत. वर्तनाला विरोधी असे तयार होत असले पाहिजेत.

उदाहरणार्थ समजा कीं एक शिकलेला मनुष्य—एक बी. ए-कोर्टांत साक्ष द्यायला गेला. "ईश्वराला साक्ष ठेवून मी जें सांगेन तें खरें सांगेन, खऱ्याशिवाय दुसरें कांहींहि सांगणार नाहीं"-अशी शपथ त्यानें घेतली. हल्लीं त्या शपथेला मुळींच किंमत नाहीं. पोपटाच्या बोलण्याप्रमाणें ती नुसती उच्चारली जाते. तरी पण खोटें बोलण्याचा प्रसंग आला आणि तो बोलला तर परिणाम काय होणार ? खोटें बोलण्यापासून होणाऱ्या नुकसानाविषयीं शाळेंत उपदेश ऐकून ऐकून बिचारा निम्मा बहिरा झालेला असेल. असें असून खोटें बोलण्याच्या मोहाला तो इथें बळी पडला, तर तेवढ्यावरून त्याचे विचार त्याच्या मनांतच राहिले असें म्हणतां येईल काय ? मुळींच नाहीं. सद्विचारांना धाब्यावर बसवीत असतांना त्याचें रक्त उसळलें असेल. खोटें बोलत असतांना तो अडखळला असेल, आणि घामानें डबडबला असेल. विचारांचा परिणाम तो हाच. बुचकळ्यांत पडणें हीच इथें क्रिया, तोच आचार, तेंच वर्तन. शेवटीं खोटें बोललाच तर त्याचा अर्थ एवढाच कीं खोट्याविषयींचे त्याच्या मनांतील विचार अधिक जोरदार आहेत.

ज्ञान आणि कर्म यांतील हा गाढ संबंध व्यक्तिजीवन आणि प्रजाजीवनांत नेहमीं पाह्यला सांपडतो.

ज्ञानी पुरुष कर्मनिष्ठ बनायला हवा. कर्मनिष्ठ पुरुष ज्ञानी बनायला हवा. वरवर पाहिलें असतांना या दोन्ही गोष्टी खोट्या

वाटतील. पण तसें नाहीं. ज्ञानी पुरुष कर्मनिष्ठ बनलाच पाहिजे. पुष्कळ लोक वेदांती असतात. शास्त्रपुराण जाणणारे असतात. नीतीचे उपदेशक असतात. तरी पण कर्म करण्यांत निष्फळ होतात. त्यांच्या आयुष्यावर अनीतीचे डाग दिसत नाहींत का ? बेकन हा एक इंग्रज तत्त्वज्ञानी होता, नीतीचा उपदेश करणारा होता, आणि न्यायाधीशहि होता. त्याच्यावर ठेवण्यांत आलेला लांच घेतल्याचा आरोप त्यानें कबूल केला आणि मग लंगडें समर्थन केलें. पुष्कळ शिकलेले लोक असत्य बोलतात, गुन्हे करतात, आणि सामाजिक व धार्मिक अधोगतीचे भागीदार बनतात ही सामान्य अनुभवाची गोष्ट आहे. तर मग ज्ञान आणि कर्माचा येथें काय संबंध राहिला ? मी म्हणतों कीं तो संबंध नष्ट झालेला नाहीं. आपली त्याविषयीं तपास करण्याची दृष्टि मात्र सदोष असली पाहिजे. त्या त्या व्यक्तींचें ज्ञान कशा प्रकारचें आहे तें आपण पाहूं शकत नाहीं, पाहूं शकलों नाहींत. त्यांचे विचार विरोधी असले पाहिजेत; त्यांच्या ज्ञानाचें अपूर्ण स्वरूपच आपणाला दिसत असलें पाहिजे.

कर्मनिष्ठ पुरुष ज्ञानी बनलाच पाहिजे, याविषयीं देखील हेंच सांगतां येईल. पुष्कळ माणसें हातांत जपमाळ, कपाळावर तिलक, आणि मुखांत मंत्र ठेवूनहि मनांत अधम विचार वागवितात. पण म्हणून काय झालें ? बाहेरून दिसणारीं त्यांचीं कर्में त्यांच्या विचारांवर परिणाम करीत नाहींत. पण त्यांचीं कर्में कोणतीं ? बाहेरून दिसणारीं कर्में हीं कर्में आहेत का ? जड कर्मांना कांहीं कर्म म्हणतां नाहीं येणार. **विचारानें निर्णीत होणारें कर्मच कर्म**

होय. आणि अशीं कर्में, वर उल्लेखिलेलीं कर्में नाहींत. मी झोंपलों असतांना तुम्ही माझा हात धरून प्रॉमीसरी नोटीवर सही करून घेतलीत तर तें कर्म मीं केलें असें म्हणतां येईल ? सही मीं केली म्हणतां येईल ? कधींच नाहीं. जर तें कर्म नसेल तर निरनिराळ्या प्रमाणांत होणारे कर्माचे आभासहि कर्में नव्हेत. जपमाळ,—अरेरे ! जपमाळ बिचारी काय करणार ? गंध - अरेरे ! गंध बिचारें काय करणार ? मंत्र—अरेरे ! बिचारे काय करणार ? मानसिक पावित्र्य या वस्तु कशा देऊ शकणार ? **तें आहेंच कुठें** कीं कांहीं कार्य करूं शकेल ? येथें तें केवळ देखाव्यापुरतें आहे. आणि कारणच नाहीं तर कार्य कोठून होणार ?

सामाजिक जीवनाचेंहि असेंच आहे. अशी कोणती सामाजिक प्रवृत्ति आहे कीं जिच्यांत विचाराचा परिणाम आचारावर आणि आचाराचा परिणाम विचारावर होत नाहीं ? कोणती सामाजिक प्रवृत्ति अशी आहे कीं जिच्यांत विचार आणि आचाराचें ऐक्य नाहीं ? फ्रान्स देशांत जी मोठी राज्यक्रांति झाली ती देशांतील विचारवतांच्या विचारांच्या परिणामरूपानें होती; आणि त्यांचे जे विचार होते ते भोंवतालच्या परिस्थितीचे प्रतिबिंबरूप होते. सूक्ष्म अवलोकन केल्यास प्रत्येक देश व प्रत्येक समाजाविषयीं ही गोष्ट खरी असलेली आढळेल. म्हणूनच क्रांतिकारक विचारांना डांबून टाकण्यांत येतें. म्हणूनच क्रांतिकारक लोकांना डांबून टाकण्यांत येतें.

२८

# आत्महत्या

इंडियन पीनलकोडमध्यें असें एक कलम आहे कीं "जो कोणी आत्महत्या करण्याचा प्रयत्न करील आणि तसा गुन्हा अंमलांत आणण्यापुरतें कांहींहि कृत्य करील त्याला एक वर्षापर्यंतची साध्या कैदेची, किंवा दंडाची, किंवा दोन्हींची शिक्षा फर्माविण्यांत येईल."

आत्महत्येच्या प्रयत्नाला गुन्हा न समजला तर क्षुल्लक कारणांमुळें आवेशी व भावनाप्रधान स्त्रीपुरुष जीवाचा त्याग करतील, आयुष्यांतील गांभीर्याकडे ते तिरस्कारानें बघतील, आणि सामान्यपणें त्यांच्या नीतीची अधोगति होईल. दुसरें कारण कायद्याची सत्ता स्थापन करण्याविषयींचें सांगतां येईल. मनुष्यमात्राचा स्वभाव गुन्हा केल्यावर तो लपविण्याचा असतो, आणि तसें करणें जर त्याला सोपें नसेल आणि कायद्यानें मिळणारी शिक्षा सहन न करण्याचा त्याचा दृढ निश्चय असेल तर तो आत्महत्या करून दुष्कृत्याला शिक्षारहित बनवू शकतो. एकच गुन्हा असा आहे कीं त्याला मनुष्य शिक्षापात्र करू शकत नाहीं. आणि तो आत्महत्येचा होय. पण आत्महत्येच्या **प्रयत्नाला** शिक्षा करतां येते, आणि आत्महत्येचें कृत्य पुरें होण्यापूर्वीं पुष्कळ वेळां प्रयत्न उघडकीस येतो. म्हणून त्या प्रयत्नाबद्दल जर मनुष्याला शिक्षा करण्यांत आली तर आत्महत्येच्या रूपानें दुसऱ्या अपराधांची शिक्षा टाळण्याचें काम अशक्य बनेल.

हीं कारणें ठीक आहेत. पण मनाला पुरेसा संतोष वाटत नाहीं. सामाजिक अनीति अटकविण्याकरितां आणि राज्यसत्तेच्या स्थैर्याकरितां या कृत्याला गुन्हा समजतां येईल. पण येथें हक्काचा प्रश्न उत्पन्न झाल्याबरोबर मन पुनः संशयांत पडतें मनुष्याच्या मालकीच्या वस्तुचा मनुष्यानें नाश केला तर त्यांत सरकारला काय? माझ्या घराला मी काडी लावली तर त्यांत सरकारचें काय बिनसतें? माझ्या पुस्तकांना मीं नदींत टाकलें तर त्यांत सरकारला काय? माझ्या मालकीची वस्तु मी वाटेल तशी वापरीन त्याच प्रमाणें कोणत्याहि प्रकारचा गुन्हा केल्यावांचून, समाज किंवा सरकारचें कोणत्याहि प्रकारचें नुकसान केल्यावांचून, मी माझ्या वैयक्तिक दुःखामुळें, माझा आत्मा आणि शरीर यांतील संबंध मीं नाहींसा केला तर त्यांत राजाचें काय नुकसान होणार? माझ्या हक्काच्या गोष्टीवर राजाचा प्रतिबंध का असावा? या प्रश्नाचें उत्तर असें मिळतें कीं, जें माझें असेल त्याच्या बाबतींत सरकार मध्यें पडत नाहीं; येथें ज्याला माझें म्हणण्यांत येतें तें माझें आहे का? आत्मा, माझा आत्मा, माझा जीव, माझा आहे का? हें सर्व राज्याचें आहे, आणि आत्महत्या तर ॲरिस्टॉटल म्हणतो त्याप्रमाणें माझ्या जीवाविरुद्ध कृत्य नसून राजाला अन्याय करण्यासारखें कृत्य आहे आणि म्हणून गुन्हा होय. राज्याच्या व्यवस्थेमुळें आणि राज्याच्या रक्षणामुळें मीं जन्म घेतला, आणि अमुक समाजांत मी शांततेनें जगूं शकलों. राज्याच्या रक्षणामुळें जो जीव मी टिकवूं शकलों आहे, त्याच्यावर माझी नाहीं तर राज्याची मालकी आहे. जर असेंच असेल तर समाधान होतें.

राज्याकडून मिळणाऱ्या रक्षणामुळें राज्याचे उत्पन्न होणारे हक्क अगदीं योग्य होत. आणि ज्या अर्थी आपली सुखशांति, आपलें गृहजीवन, आपलें सामाजिक जीवन—हें सर्व राज्यावर आधारभूत आहे त्या अर्थी आपल्यावर राज्याचा हक्क आहेच. तरीपण कित्येक अपवादरूप दाखले असे सांपडतात कीं जिथें हें म्हणणें लागूं पडत नाहीं. समजा, एखादा अत्यंत गरीब आणि अत्यंत दुःखी मनुष्य कसे तरी दिवस काढत आहे; त्याचें दुःख वाढलें आणि त्याला खायलाप्यायलाहि मिळेनासें झालें, समाजानें त्याला दया दाखविली नाहीं किंवा सरकारनें त्याचा बंदोबस्त केला नाहीं; आणि अशा वेळीं त्या व्यक्तीनें आत्महत्येचा प्रयत्न केला. अशा ठिकाणीं सरकारचा हक्क कसा प्रस्थापित होणार? सरकारनें ज्याचें कांहींच रक्षण केलें नाहीं, त्याला शिक्षा करण्याचा हक्क सरकार काय दाखवू शकणार? सरकारच्या ह्या हक्काचें सर्वच बाबतींत समर्थन करणें कठिण आहे.

तरी पण आत्महत्येचें कांहीं समर्थन करतां येईल असें नाहीं. शेक्सपिअरच्या हॅम्लेट नाटकांत आत्महत्या करायला जात असतांना हॅम्लेट थबकतो, आणि त्याचें कारण असें दर्शवितो कीं आत्महत्या केल्यानें काय होणार? या जन्मांतलि दुःखापासून मुक्त झालों, तरी मरणानंतर काय असेल—याची भीति आपणाला अधिकच घोंटाळ्यांत टाकेल अशी आहे. आगींतून निघून फुपाट्यांत पडल्यासारखें तर नाहीं होणार? अशी मनांत शंका उत्पन्न होते पण समजा कीं एखाद्याला हें भय नाहींच मुळीं. तर मग त्याच्या आत्महत्येविषयीं काय म्हणणार?

या प्रश्नांत अधिक गुंतागुंत होण्याचें हें कारण कीं, जगांत कित्येक लोक आत्महत्येचा तिरस्कार करीत नाहींत. जपानी लोक तसें करीत नव्हते. इतकेंच नाहीं तर कित्येक तत्त्वज्ञानी त्याचा बचाव करितात. ग्रीसमधील स्टॉईक तत्त्वज्ञानी आत्महत्येला अनीतीचें कृत्य समजत नव्हते. इतकेंच नाहीं तर कित्येक वेळां उत्तम समजत. या तत्त्वज्ञान्यांचें असें मत होतें कीं, सुशील मनुष्य पार्थिव वस्तूंपासून विरक्त राहण्याची इच्छा करील, आणि अशा रीतीनें नैतिक स्वातंत्र्य प्राप्त करून घेईल. जगांतील कोणत्याहि वस्तुच्या ठिकाणीं मनुष्याची आसक्ति नसावी. तशीच गरज वाटल्यास आत्म्याचाहि त्याग करून नैतिक स्वातंत्र्याचा अनुभव घ्यावा. अर्थात्, त्यांच्या मतानें सुशील मनुष्याच्या स्वातंत्र्याचा पुरावा हा होता कीं, तो मनांत येईल तेव्हां जगाचा निरोप घेऊ शकतो. मनुष्याला कोणत्याहि प्रकारची आसक्ति नसावी; स्वतःच्या जीवाबद्दलहि आसक्ति नसली म्हणजेच मनुष्याचें मन स्वातंत्र्य व नैतिक श्रेष्ठता अनुभवूं शकतें. दुःखमुक्त होण्यापेक्षां नैतिक स्वातंत्र्य अनुभवण्याचें साधन म्हणून आत्महत्येचें समर्थन हे तत्त्वज्ञानी करतात. सुखदुःखाला ते क्षुल्लक वस्तु समजत. सुखाचा आनंद आणि दुःखाचा क्लेश या दोन पर्वा न करण्यासारख्या गोष्टी ते मानीत. असें असूनहि आत्महत्येचें समर्थन ते करीत, आणि तें मनुष्याचें स्वातंत्र्य अनुभवण्याचें साधन म्हणून. ते असें सांगत असत कीं, ज्याप्रमाणें जेवण झाल्यावर मनुष्य जेवणाऱ्यांच्या पंक्तीतून उठून दूर जाऊ शकतो, त्याच प्रमाणें आयुष्य निरुपयोगी झाल्यावर आत्महत्या करून समाजाचा संगहि मनुष्य तोडूं शकतो.

वयामुळें मनुष्य अगदीं अशक्त झाला असेल तेव्हां, किंवा असाध्य रोगानें पीडला जात असेल तेव्हां, किंवा मानसिक शक्ति अगदी निर्बळ झाल्या असतील तेव्हां, किंवा पुष्कळ आपत्ति येऊन पडल्या असतील तेव्हां, किंवा एखाद्या जुलुमांतून मुक्त होण्याची मनुष्याची इच्छा असेल तेव्हां, तो त्याच्या आयुष्याचा शेवट करूं शकतो. पण असा तऱ्हेनें आत्महत्येचें समर्थन होऊं लागलें तर अनीतीचीं दारें झपाट्यानें उघडल्यासारखीं होतील. हिंदुस्थानासारख्या देशांत गृहजीवनाच्या बाबतींत किती तरी जणांना त्रास होत असेल ? कितीतरी व्यक्तींचें समाजजीवनहि अगदीं कटु बनत असेल ? शारीरिक आणि मानसिक दुःखानें किती तरी लोक गांजले, पिचले गेले असतील ? म्हणून काय आत्महत्या त्यांच्याकरितां इष्ट मानतां येईल ? काय ती अनीति नाहीं ? आणि तिचें समर्थन केल्यानें परिणाम किती भयंकर होईल ? किती तरी **स्नेहलता** उत्पन्न होतील. सर्वच स्टॉईक तत्त्वज्ञानी हें समर्थन मान्य करीत नव्हते. कारण दुःखाला कंटाळणें हें कांहीं सुशीलतेचें चिन्ह नव्हतें. इतकेंच नाहीं तर या तत्त्वज्ञान्यांनीं केलेल्या आत्महत्येचा उदाहरणांकडे पाहिलें असतां, त्यांनीं केलेलें समर्थन किती हास्यास्पद आहे हें समजतें. झीनो नांवाच्या स्टॉईक तत्त्वज्ञान्यानें वृद्धावस्थेंत आत्महत्या केली. याचें कारण असें सांगण्यांत येतें कीं, त्याचें बोट मोडलें होतें, त्याच्या दुःखांतून मुक्त होण्याकरितां त्यानें हा मार्ग काढला. केटो नांवाच्या तत्त्वज्ञान्यानें राज्यपरिवर्तनानें झालेल्या दुःखामुळें आत्महत्या केली. या दृष्टांतावरून एवढेंच दिसत कीं, दुःखानें गांजलेला मनुष्य त्यांतून मुक्त होण्याकरितां

आत्महत्या करूं शकतो. पण असें जर करण्यांत आलें आणि जर त्याचें समर्थन केलें गेलें तर अनीति उत्पन्न होईल, आणि क्षुल्लक कारणांवरून माणसें आत्महत्या करतील.

पण स्टॅाईक लोकांचें खरें महत्त्वाचें समर्थन दुसऱ्या प्रकारचें होतें. तें समर्थन असें कीं, नैतिक स्वातंत्र्याच्या रक्षणाकरितां आत्महत्या करतां येते. समजा कीं देशसेवेकरितां आत्महत्या करणें आवश्यक असलें, किंवा एखादें अनीतिचें कृत्य करण्याकरितां आपल्यावर येऊन पडलेल्या वजनांतून मुक्त होण्याकरितां आत्महत्या करणें जरूरीचें असलें, तर मग काय ? क्वचितूच्र तिचें समर्थन होणार नाहीं. समजा कीं दोन देशांत युद्ध चालले असतांना एका देशाचा मनुष्य दुसऱ्या देशाच्या मनुष्याच्या हातांत सांपडला. त्याच्या जवळ महत्त्वाची असलेली माहिती काढून घेण्याकरितां त्याला अनेक प्रकारचा त्रास देण्यांत आला. त्यांतून मुक्त होण्याचा –आपल्या देशाची माहिती शत्रुला न देण्याचा–एकच मार्ग आत्महत्या असेल, तर काय त्यानें त्याचा अवलंब करूं नये ? सती स्त्रीच्या पातिव्रत्याचा भंग होत असेल आणि त्यांतून सुटण्याचा आत्महत्येशिवाय दुसरा मार्ग नसेल, तर काय तिनें त्या मार्गाचा अवलंब करूं नये ? त्या मार्गाचें अवलंबन करण्यांत तिची खरी नैतिक स्वतंत्रता आणि श्रेष्ठता सांभाळली जात नाहीं का ? नीतिमान् स्त्रीपुरुषांच्या नीतीची खरी शोभा म्हणजे अशा प्रसंगीं आत्महत्याच होय त्यांत त्यांचें सौंदर्य आहे; त्यामुळें ते पूजनीय होतात.

आणि असें असूनहि एखादें वेळीं आपणाला क्षोभ होईल. अपवाद ठरविण्याचा मन कितीहि प्रयत्न करीत असले तरी एका गोष्टीचा विचार करीत असतांना अपवाद राखावेत किंवा नाहीं त्याची शंका वाटते. आत्महत्येचें कोणत्याहि प्रसंगीं झालेलें समर्थन बरें वाटत नाहीं. तो विचार हा कीं, मनुष्यजन्म हें ईश्वराकडून मनुष्याला मिळणारें बक्षिस आहे. मनुष्यदेह उत्पन्न करणें जर त्याच्या हातांत नाहीं, तर त्याचा नाश करण्याचा त्याला काय अधिकार ? जर उत्पन्न करण्याची गोष्ट त्याच्या हातांतली नाहीं, तर त्याची मालकीहि ईश्वराची किंवा निसर्गाचीच होय. ईश्वरानें किंवा निसर्गानें त्याचा अंत आणणें हें ठीक आहे. वाटेल तसा अनिष्ट प्रसंग असो, वाटेल तसें मोठें दुःख असो, आधिव्याधि वाटेल तेवढी भयंकर असो, तरी देखील ईश्वराच्या किंवा निसर्गाच्या ठिकाणीं मनुष्यानें श्रद्धा ठेवलीच पाहिजे. ते जें करतें तें अनिवार्य असतें. आणि एका जन्मांत नाहीं तर दुसऱ्या जन्मांत, एका समाजांत नाहीं तर दुसऱ्या समाजांत बदला मिळालाच पाहिजे. अशी श्रद्धा असायला पाहिजे. आयुष्य ही स्वाधीनची गोष्ट नाहीं, म्हणूनच त्याचा प्रश्न गहन आहे, फार गहन आहे हें सर्वमान्य आहे. याच्याच जोडीला केव्हांतरी बदला मिळतो या विचारावर श्रद्धा ठेवलीत किंवा कर्मानुसार फळ मिळतेंच, यावर तुमचा विश्वास असला कीं आत्महत्येचें समर्थन तुम्ही कधींहि करणार नाहीं. हें खरें आहे कीं शेवटीं बुद्धिपेक्षां भावनांवर आपण जास्त आधार ठेवतो. आयुष्याच्या किती तरी गोष्टी श्रद्धेवर अवलंबून असतात ! या विचाराबरोबर आत्महत्येचीं सर्व समर्थनें नाहींशीं होतात.

आत्महत्या पापमूलक आहे. कारण आयुष्यांत गांभीर्य आहे, गहनपणा आहे. जीवाची उत्पत्ति ईश्वर किंवा निसर्गाच्या हातीं आहे, तर त्याचा नाश करणें मनुष्य आपल्या हातीं कसें घेऊं शकणार ?

२९

# डाव हातांतून गेला

दिलगीर होणें निरुपयोगी आहे. पुष्कळ गोष्टी मनुष्याला शक्य असतात. पण स्वतःच्या चुकांमुळें किंवा बेपर्वाईमुळें किंवा दुसऱ्या एखाद्या कारणामुळें तो त्या घालवितो. आणि मग एकदा गेलें कीं गेलें. एक अमोल संधि घालविली कीं, त्याच्याच बरोबर मनोवांछित वस्तु नेहमीकरितां मनांतून दूर कराव्या लागतात. यापेक्षां अधिक वाईट काय असेल ?

स्वातंत्र्य हें ज्याचें जीवनसूत्र असेल त्याला त्याचा एक वेळां जरी त्याग करावा लागला तर त्याची स्थिति कशी होते ? सत्य हें ज्याचें जीवनसूत्र असेल त्याला एकच वेळ थोडेसें असत्य बोलावें लागलें तरी त्याच्या मनाची स्थिति कशी होते ? द्रव्याच्या बाबतींतहि असेंच आहे. एखादी गरीब अबला, किंवा अनाथ बालक, किंवा अशक्त मनुष्य, स्वतःच्या जीवनाला लागणाऱ्या साऱ्या खर्चाची रकम एखाद्या बँकेंत ठेवतात, पुढें बँक बुडणार अशी अफवा त्यांना ऐकूं येते, स्वतःचा पैसा त्यांतून काढून घेण्याचा ते निश्चय करतात, इतक्यांत चांगली वार्ता ऐकल्यानें पुनः बँकेंतच राहू देतात–आणि एका तासानंतर त्यांना कळतें कीं बँक बुडाली ! अफसोस ! त्यांच्याबद्दल कोणाचें हृदय द्रवणार नाहीं ? एखाद्या शेतकऱ्यानें पाऊस उशीरां येईल असें समजून रखडत असावें, आणि पावसानें लवकर येऊन जावें. परिणाम असा होईल कीं शेती फुकट जाईल. मागाहून त्यानें परिश्रम पुष्कळ

घेतले तरी ते मागाहून म्हणून निरुपयोगी होत. वांच्छित पतिची कल्पना एखादी युवती करीत असावी आणि कांहीं कारणामुळें तिला दुसऱ्याशीं लग्न करावें लागलें, तर मग तिच्या सुंदर कल्पना केवळ कल्पनाच आजन्म राहातात. एखाद्याचा शब्द, पण तो कटु किंवा गोड वापरल्यानें आयुष्य सदाकरितां निर्णीत होण्या-जोगे प्रसंग आयुष्यांत नाहीं घडत का ? सर्व मागें घेतां येतें पण तोंडावाटें काढलेला शब्द परत घेतां येत नाहीं. माफी मागितल्यानें त्याची तीव्रता कमी होतें, पण समूळ नाश तर नाहींच होत. द्वेषी मनुष्याच्या मनाला तर त्या शब्दांचा मारा नेहमींप्रमाणें होत राहातो. एकच कटु प्रसंग, पण नेहमींकरितां सत्यानाश एखादे वेळीं होतो. एक लहानच चूक, आणि तुम्हीं जमाविलेलें सर्व पाण्यांत जातें. एखादें वेळीं सहज एखादें दार किंवा खिडकी उघडी राहावी आणि नेमकें चोरानें आंत येऊन चोरी करावी ! परिणाम काय होईल ? पश्चाताप करण्याचा प्रसंग. त्याचें स्वातंत्र्य, त्याचें सत्य, त्याचें द्रव्य, त्याची शेती, तिच्या वांछना, त्याचें सद्भाग्य, त्याचें सांठवलेलें सर्व—हें सर्वच गेलें. गेलें तें गेलेंच, सर्वांच्या हातांतून डाव गेला.

जर माझ्या वाचकांपैकीं कोणाचा डाव हातांतून गेला असेल, —आणि माझी खात्री आहे कीं, प्रत्येक मनुष्याच्या हातून चुकून एखादे वेळीं तरी डाव घालविला जातो,—तर त्याबद्दल मी दिलगीर आहे. ह्या दिलगिरींत सान्त्वनपर एकच गोष्ट आहे कीं, माझ्या हातांतून देखील पुष्कळ वेळां डाव चुकला आहे. प्रत्येक मनुष्याचें असें होतें. जगांत स्वतःच्याच चुकीनें स्वतःच्या आयुष्याचें नुकसान

झालें नाही अशा मनुष्याचा तपास करा आणि जर तुम्हाला तसा मनुष्य आढळला तरच दुःखी व्हा; नाहीं तर दुःख करणें व्यर्थ आहे असें समजून तें करण्याचें सोडून द्या.

जगांत **घालविलें** कोणीं नाहीं ? कोणींच नाही असें नाहीं. **घालविणें** हें ऐहिक आहे. **मिळविणें** स्वर्गीय आहे. घालविलेल्या गोष्टी विसरुन जा. मिळवावयाच्या गोष्टी नजरेसमोर ठेवा. आपण घालविलेले पुष्कळ असतें, तरी पण मिळवावयाचें त्याहिपेक्षां जास्त असतें. ज्यानें द्रव्य घालविलेलें असेल त्याचा सत्पुरुष बनण्याचा मार्ग अधिक सरळ होतो. द्रव्य ही माया नाहीं, खोटी उपाधी नाहीं असें कोण म्हणेल ? ज्यानें कीर्ति आणि नांव घालविलें आहे, त्यानें पुष्कळच घालविलें म्हणावयाचें. तसें पाहिलें तर त्यानें कांहींच घालविलें नाहीं. कीर्ति ! नांव ! कितीं मोहक आहेत हीं ! कोणाची कीर्ति आणि कोणाचे नांव अमर झालें आहे ? ज्यानें आप्तइष्ट घालविले आहेत, त्यानेंहि पुष्कळ घालविलें आहे. तरी पण नरसिंह मेहेताची आठवण करा. तो म्हणतो, "ठीक जाहलें सुटला संसार, सुखानें भजूं या गोपाळ" या सर्व गोष्टींत सर्वांत अधिक दुःख आपण एखादी गोष्ट आपल्या चुकीनें घालविली असेल तेव्हां होतें. आणि त्याविषयींच हे विचार आहेत बाकी नशीबाला शिव्या कोण देत नाहीं ? खरी जाचणूक आपल्या स्वतःच्या चुकीच्या वेळीं होते.

भूतकाळाकडे नजर ठेवून झालेल्याचा आणि गेलेल्याचा शोक करणें हें नामर्दपणाचें आहे; मनुष्याला आणि जनतेला तें नामर्द बनवितें. भविष्यकाळाकडे नजर ठेवणें, तें सुधरविणें, धारल्या

प्रमाणें तें बनविणें हें आपल्या स्वाधीनचें आहे. आशा ठेवावी आणि भविष्याकडे नजर राखावी-एक नाहीं तर दुसऱ्या मार्गानें उन्नति ही झालीच पाहिजे. धारलेलें नाहीं मिळालें तरी न धारलेलें असें कांहीं मिळेल; त्याचप्रमाणें अशी वृत्ति धारण केल्यानें लाभ होईलच.

३०

# दुःखितांना—स्वजनांची उणिव

माझ्या प्रिय दुःखी जनांनो ! तुम्ही दुर्दैवी आहांत. तुमचें काय दुःख आहे ? तुमचें प्रिय माणूस गेल्यानें का तुम्हीं दुःखी आहांत ? तुम्हीं फारच दुःखी आहांत हें मी कबूल करतों. ज्याच्यावर तुमच्या आशा आणि आनंद अवलंबून होता, ज्याच्या जगण्यामुळें तुम्हांला जगावेसें वाटत होते, त्याच्या मृत्युनें तुम्हीं शोकसागरांत पडले असतांना तुमचा शोक व्यर्थ आहे, कारण जग मिथ्या आहे, असें सांगण्याची माझी इच्छा नाहीं. अशा तत्त्वज्ञानावर माझा विश्वास नाहीं. आणि विश्वास असला तरी मी त्याचा उपयोग करूं इच्छित नाहीं. तुमचें दुःख योग्य आहे. तुम्हीं तें करा. तुमच्या मित्राजवळ, तुमच्या नातवाईकांजवळ, दोन घटका बसा, गेलेल्यांचें स्मरण करा—तें तर आहेच. त्याला दाबूं नका. तुमच हृदय हलकें करा आणि त्या रीतीनें मिळेल तेवढा आराम मिळवा. रडावयाचें असल्यास रडून टाका, रडणें दाबूं नका. रडा, रडवेल तितकें रडा. जसें मनांतून करावेसें वाटत असेल तसें करा, पण माझी विनंती इतकी कीं तें सर्व एकदां पूर्णपणें आणि लवकर करून टाका. दुःखांतहि कांहीं सुख असतें, आणि तेंच दुःखाचें सांत्वन करत. तें सुख गेलेल्या गोष्टींच्या शुद्ध स्मरणांत आहे. कोणीहि मनुष्य दोषरहित नाहीं. तुमचें अत्यंत प्रिय मनुष्यांहि या नियमाला अपवाद नाहीं. त्याच्यांतहि दोष असतील, आणि कित्येक प्रसंगीं ते तुम्हांला दोष म्हणून जाचकहि

झाले असतील. पण स्थिती आतां बदलली आहे. आतां गेलेल्या गोष्टींचें फक्त स्मरणच करावयाचें राहिलें आहे. स्मरण तुम्हांला नेहमीं चांगल्या गोष्टींचेंच होईल, दोष तुम्हांला कधीहि आठवणार नाहींत, आणि आठवले तरी त्यांत गेलेल्या माणसांच्या दोषापेक्षां तुम्हांला स्वतःच्या किंवा दुसऱ्या कोणाच्या दोषाची जाणीव होईल. तसें वाटलें तरी वाटूं द्या. अशीं शुद्ध स्मरणें तुम्हांला आनंददायक वाटतील. असलीं पवित्र स्मरणें तुम्हांला भविष्य-काळाकरितां प्रोत्साहन देणारीं होतील. आणि असें जितकें जास्त होईल तितकें स्वजन गेलें नाहीं तर आहेच, आणि खऱ्या रीतीनें आहे. या पेक्षां जास्त आराम तुम्हांला काय देईल ? या पेक्षां जास्त शांति तुम्हांला कोण देईल ? या पेक्षां जास्त सांत्वन तुमचे कशानें होईल ? अजूनहि तुम्हांला शांत वाटत नसेल तर मी तुम्हांला इतकेंच सांगेन कीं, तुमच्या सारखे स्त्रीपुरुष जगांत पुष्कळ आहेत. तुम्हांला एकट्याला दुःख आहे असें मानूं नका. दुःख पुष्कळ स्थळीं आहे, पण काळ जसा जातो तशीं सर्वजण दृढ खंबीर मनाचीं बनतात. तसेंच तुम्हांला देखील व्हावयाला पाहिजे. दुसरे देखील दुःखी आहेत, या विचारानें तुम्हांला समा-धान वाटायला हवें. समाधानच काय ? सामर्थ्य मिळावयाला हवें. बुद्ध आणि किसागौतमीची गोष्ट तुम्हांला माहीत नाहीं असें थोडेंच आहे ? पण सामर्थ्यहि तुम्हांला मिळेल. तुम्हीं जेव्हां पाहाल कीं, दुसऱ्यांनीं तुमच्या पेक्षांहि कठिण परिस्थितींत तुमच्या आप्तांपेक्षांहि अत्यंत निकटच्या आप्तांना घालविले आहेत, आणि असें असून त्यांना आपल्या दुःखाला विसरावें लागलें, तर तसें

करण्याचें बळ तुम्हांला ईश्वरानें दिलें नाहीं कीं काय ? दिलें आहे. त्याचा उपयोग करा आणि आपत्तीं समोर टिकाव धरण्याचें सामर्थ्य तुमचें वाढेल. अरेरे ! अशा शुद्ध अशा निर्दोष, अशा सद्गुणी, आणि अशा प्रेमळ नातेवाईकांची उणीव कशानें भरून निघेल ? अशा चांगल्या माणसांना देवानें कां नेलें ? अशा विचारांनीं जर तुमचें दुःख वाढत असेल तर त्यालाहि उत्तर आहे. काय तुम्हीं फक्त तुमचा स्वार्थ बघाल ? गेलेल्याचा नाहीं बघणार ? माझी खात्री आहे कीं तुम्ही बघाल. तुमचें नुकसान झालें आहे त्यापेक्षां त्याला लाभ ज्यास्त झाला आहे, हें नक्की समजा. तुमचा आप्त निर्दोष होता, शुद्ध होता, सद्गुणी होता, म्हणूनच ईश्वरानें त्याला आमंत्रण केलें. म्हणूनच निसर्गानें त्याला या संसारांतून काढून नेलें. या जगांत छळ आहे, अप्रामाणिकपणा आहे, अनेक प्रकारची कटुता आहे, त्यामुळें दुष्टांना जरी त्यांत आनंद वाटला तरी सज्जनांना त्यांतून मुक्ति मिळणें ही सुखाची अमोल संधि आहे. मृत मनुष्य सर्वथा सुखी होतें असें तुम्हांला वाटतें काय ? तें फार चांगलें माणूस होतें, पण त्याला कदाचित् द्रव्याचें सुख नसेल किंवा शारीरिक आरोग्याचें नसेल, आप्तमंडळींचें त्याला सुख नसेल, तसेंच मान व अब्रू हींहि त्याला नसतील. किंवा जरी सर्व असलें तरी दुष्टांच्या ईर्ष्येचें तो केंद्र बनला असेल आणि त्यामुळें तो सुखी नसेल. आणि असें असलें तर या जगांत राहण्यापेक्षां स्वर्गांत राहणें अधिक उचित होय, असें तुम्हांला नाहीं वाटत का ? वाटेलच. तरी पण तुम्ही दुःख करालच. कारण मनुष्यमात्र आपल्या स्वार्थाकडेहि बघतो असें असलें तरी हें दुःख तुम्हांला

सोडावेंच लागेल, कारण मनुष्यमात्राला ईश्वराच्या इच्छेला स्वाधीन व्हावें लागतें, ती इच्छा बलवान आहे, त्या इच्छेला शरण सर्वांना जावे लागतें. जर तसें असेल तर दुःख काय कामाचें ? पराधीन मनुष्याला दुःख कसलें ? पराधीनता सोडून स्वतःला रुचेल तसें करण्याचें जोंपर्यंत शक्य असेल तोंपर्यंतच पराधीनतेंत दुःख करणें योग्य आहे, पण पराधीनता संपूर्ण असेल तर तिच्या बद्दलचें दुःखहि अस्थानीं होय. ईश्वरानें किंवा निसर्गाने आयुष्यांतील अगदीं शेवटची किल्ली स्वतःच्या हातांत ठेवली आहे. ह्याविषयीं मनुष्य सर्वस्वीं पराधीन आहे तर मग त्याच्या परिणामाविषयीं शोक करणे अगदीं व्यर्थ आहे. शेवटीं असें मत सर्वांना स्वीकारावें लागतें. तुमची जखम रुजेल अशी तर नाहींच पण ती अनिर्वार्य आहे इतकें जर तुम्हीं समजलांत तर तुम्हांला ती निराळीच भासेल. ती जखम राहील पण ती तुम्हांला दुःख देणार नाहीं. त्या जखमेंत बोध आहे, त्या जखमेंत सत्य आहे, आयुष्यांतील अत्यंत कटु पण परिणामीं सत्य अस कांहीं अद्भुत तत्व आहे हें कबूल करावें लागतें.

तुम्हीं दुःखी अहांत तरी तुमच्या दुःखांत बोध आहे एवढेंच लक्षांत ठेवा. तुम्ही दुर्दैवी अहांत पण तसें सर्वच दुर्दैवी आहेत एवढें ध्यानांत ठेवा. तुम्हांला उणीव भासते पण ज्याची तुम्हांला उणीव भासते आहे त्यानें कांहीं चांगलें मिळवून वाईट घालविलें आहे एवढें विसरुं नका. तुम्हांला शोक होतो पण तो शोक ईश्वर किंवा निसर्ग ह्यांच्या बाबतींत असलेल्या तुमच्या पराधीनतेमुळें होय एवढेंच लक्षांत ठेवा. मग भावना जशा उत्पन्न होतील तशा होऊं द्या आणि तुम्हाला शांति कशी मिळत नाहीं तें बघा.

# ३१

# पैसा आणि परमेश्वर

नडियादच्या लोकांची अशी ख्याती आहे कीं, दुसऱ्या माणसांची आर्थिक स्थिति जाणल्यावांचून त्यांना बरें वाटत नाहीं. बरें पण तुम्हांला काय मिळतें ? कोठून मिळतें ? किती खर्च करतां ? किती खर्च करूं शकतां ? किती शिल्लक टाकतां ? किती शिल्लक टाकूं शकतां ?—हे किंवा असें प्रश्न बारकाईनें एखाद्यानें विचारले तर ओळखीवांचून तो खेडा जिल्ह्यांतील आहे असें मी सांगू शकतो. अशा प्रश्नांबद्दल कित्येक वेळां त्यांचा उपहास करण्यांत येतो. असें प्रश्न विचारणें हें विचित्र होय पण असे प्रश्न उत्पन्न होणें अत्यंत स्वाभाविक आहे. ज्याला असें प्रश्न उत्पन्न झालें नाहींत तो क्वचित्च उन्नति साधू शकतो. हे प्रश्न द्रव्याची आवश्यकता सुचवितात. ही आवश्यकता प्रत्येक देशांत आणि युगांत स्वीकारली गेली आहे. निवृत्ति नारायण पौर्वात्य देशांतहि धनेभ्यो परो बान्धवो नास्ति लोके । धनान्यर्जयध्वम् । अशा वचनांचा प्रतिध्वनि आपल्या कानांवर पुष्कळ वेळां येऊन आदळतो.

दुसऱ्या बाजूनें पैशाचा तिरस्कार करण्यांत येत असतो. पैसा म्हणजे मोह, पैसा म्हणजे मद, पैसा म्हणजे खोटी उपाधि असें सांगण्यांत येतें. पैसा आणि परमेश्वर यांत विरोध दाखविण्यांत येतो. पैशानें कांहीं सुख मिळत नाहीं. सुखदुःख मानण्यावर असतें. गरीबांत गरीब मनुष्य देखील उत्तम जीवन घालविल्यानें सुखी होऊ शकतो, असें शहाणपणाचें तत्वज्ञान ह्या देशांतच नाहीं तर इतर देशांतहि प्रचलित आहे.

पैसा तुच्छ आहे हा विचार मलाहि योग्य वाटतो. पण पैसा तुच्छ म्हणजे काय ? काय तुच्छ आहे. पैसा ? पैसा म्हणजे काय ? पैसा म्हणून पैसा. पैसा एक साधनवस्तु आहे. साध्य वस्तु म्हणून त्याचा स्वीकार तुच्छ आहे

पण पैशावर पैसा म्हणून प्रेम जगांत किती थोड्या माणसांचें असेल ? कित्येक माणसांना तें असतें; पण अशीं माणसें फार थोडीं. पैसा एकूट करणें आणि पैशाला पाहून खुष होणें त्यांच्या मतानें इष्ट असतें. ते धनिक आहेत, पण एका दृष्टीनें नाहींतहि. पैसा ज्या ज्या वस्तुंचा उपभोग मिळवून देतो, त्या त्या वस्तु त्यांच्या दृष्टीनें जणूं काय नाहींतच. अशा स्थितींत त्यांच्यांत आणि गरीब लोकांत काय आणि कसा फरक शोधून काढणार ?

पैसा हें साधन म्हणून पुष्कळ लोक त्याच्यावर प्रेम करतात. पैसा म्हणजे अन्नपाणी, पैसा म्हणजे कपडे, पैसा म्हणजे गाडी-घोडा, पैसा म्हणजे घरदार, आणखी पैसा म्हणजे मानपान, पैसा म्हणजे मित्र आणि सामाजिक स्थिति, पैसा म्हणजे ज्ञान. पैशावांचून या वस्तु प्राप्त होत नाहींत, आणि झाल्यातरी त्यांत कांहीं कमीपणा राहातो. पैशाचा पैसा म्हणून तिरस्कार करणें ठीक आहे. पण साधन म्हणून त्याचा तिरस्कर करणें म्हणजे उन्नतीच्या अनेक साधनांचा तिरस्कार करण्याबरोबर आहे.

ज्या ज्या वस्तु साधावयाच्या असतात त्या ध्येयरूप असल्या तर साधनें क्वचित्च हास्यास्पद ठरतात. पूर्वीं जेव्हां शिष्य गुरू-जवळ ज्ञान प्राप्त करून घेत असे, तेव्हां त्याला द्रव्याची कांहींच जरूरी नव्हती. पण हल्लीं ती आहे. कोणतें ज्ञान उत्तम पुस्तकां-

वांचून शक्य आहे ? शिवाय शास्त्रीय ज्ञान हें मोठ्या खर्चावांचून शिकतां आणि शिकवितां येत नाहीं. ज्ञानाची परोक्ष साधनें हिंडणें फिरणें, अवलोकन करणें, प्रवास—हीं देखील द्रव्यावांचून शक्य नाहींत. आणि असें कोण म्हणेल कीं, ज्ञान ही उत्तम वस्तु नाहीं ?

अनेक लोकांच्या दुःखाचें निवारणहि पुष्कळ अंशीं पैशामुळें होऊ शकतें. गरिबांच्या गरिबींत दुःख आहे, आजाऱ्यांच्या आजा-रांत दुःख आहे. विधवांच्या वैधव्यांत दुःख आहे. गरीब, आजारी, विधवा-यांच्याकरितां आश्रम काढून त्यांना मदत करितां येईल, आणि उन्नतीचे मार्ग त्यांना मोकळे करून देतां येतील हें काय द्रव्यावांचून शक्य आहे ?

आपल्या किंवा दुसऱ्याच्या आत्म्याची उन्नति साधण्याकरितां अथवा आपल्या किंवा दुसऱ्याच्या दुःखाचें निवारण करण्याकरितां आपण परमेश्वराजवळ जातों. ईश्वर ज्ञानस्वरूप आहे, ईश्वर आनंद स्वरूप आहे. साधन म्हणून द्रव्याची प्राप्ति करण्यांत, ईश्वराशीं त्याचा विरोध आहे असें दाखविणें कठीण जाईल.

पुष्कळ तरुणांना द्रव्यप्राप्तीची आवड असते. मी म्हणतों, खुशाल असो ती इष्ट आहे. इतकेंच नाहीं तर ज्यांना नसेल ते माझे असले तर मी त्यांना ती आवड उत्पन्न करायला सांगितल्या-वांचून राहणार नाहीं. तुमची चूक होते आहे. सुखाचा आधार सद्गुणांवर असतो. सुखाचा आधार मनाची विशुद्धता आणि शांतीवर असतो. बाह्य वस्तूंवर नाहीं. मला हें मान्य आहे. पण

मी इतकेंच विचारीन कीं, ही विशुद्धता, ही शांति, गरिबींत किती तरी वेळां नाहींशी होते ? गरिबी म्हणजे दुर्गुणांना लालूच, गरिबी म्हणजे कित्येक अंशानें मैत्रीचा अभाव, गरिबी म्हणजे सामाजिक तिरस्कार, गरिबी म्हणजे कर्जाची भीति, आणि कर्जाची भीति म्हणजे मानसिक क्षोभ. या गोष्टीला अपवाद सांपडतात हें खरें, पण ते विरल पुरुषांच्या ठिकाणीं. द्रव्य हें कांहींच नाहीं असें जर तुम्हांला शिकविण्यांत आलें असेल, तर तेवढें शिक्षण विसरून जा. त्यांत अशी सुधारणा करा कीं, वस्तुतः द्रव्य हें कांहींच नाहीं; वस्तुतः दुनियेंत पुष्कळशा गोष्टी साधनरूपच आहेत; पण साधनरूप तें आहे म्हणूनच तें आहे, आणि तें **महत्त्वाचें** आहे. कपडे देखील नग्नता नाहींशी करण्याचें साधन म्हणून आहेत, आणि तेवढ्याकरितां उपयोगी आहेत. आपण त्यांचा तिरस्कार करीत नाहीं, तर द्रव्याचा काय म्हणून ?

तरी देखील पैशाचा ईश्वराशीं विरोध आहे, आहे, आणि तो उघड आहे. आज जो गरिबांचा मित्र असतो, अनाथांचा वाली असतो, विनयाचा भांडार असतो, तोच मनुष्य जर सद्गुणांच्या ठिकाणीं दृढ नसेल आणि भाग्यबळानें दुसऱ्या दिवशीं श्रीमंत झाला तर आपणांला जगांत काय दिसतें ? तो गरिबीला पायाखालीं तुडवितो, अनाथांना हंसतो, मदाच्या आवेशांत अंध बनतो —त्याच्यासारखें कोणीं नाहीं असें मानतो. याचें कारण एकच कीं, पैसा हा जगांतील चांगल्या वस्तु मिळविण्याचें एक साधन, असा विचार त्याच्या मनांत नव्हताच, तर मग द्रव्यामुळें वाईट वस्तुंचें साधन समजून त्यानें त्याचा उपयोग करणें स्वाभाविक आहे.

गरिबींत स्वातंत्र्य आहे, सुख आहे, सद्गुण आहेत. तसेंच श्रीमंतींतहि ह्या वस्तु आहेत. इतकेंच कीं गरिबींत त्यांचा टिकाव सुलभतेनें लागतो. श्रीमंतींत तसें होऊं शकत नाहीं.

प्रत्येक मनुष्यानें श्रीमंत बनावें. कां बनू नये ? द्रव्याप्राप्तीच्या प्रयत्नांत चढाओढ असते, आणि चढाओढींत प्रगतीचें बीज असतें. पण खरी श्रीमंती पैसा बाळगण्यांत नसून, त्याचा उपयोग करण्यांत आहे. जितका हा उपयोग अधिक, तितकी श्रीमंती अधिक; जितका हा उपयोग उच्चतर, तितकी ही श्रीमंती उच्च प्रकारची. द्रव्य जवळ असूनहि जो जगाच्या उन्नतिकरितां प्रयत्न करीत नाहीं, जवळ द्रव्य असूनहि हजारों बंधुभगिनींचे तळतळाट कमी करण्याचा जो प्रयत्न करीत नाहीं, द्रव्य असूनहि जो देशाची आणि स्वतःच्या आत्म्याची उन्नति करण्याचा प्रयत्न करीत नाहीं, तो द्रव्यवान् नसून द्रव्यहीन आहे; साधनरूप द्रव्य त्याच्याजवळ नाहींच मुळीं. म्हणून तो गरीबाहूनहि अधिक गरीब आहे. तो कद्रु आहे. तो दयेला पात्र आहे. इतकेंच नाहीं तर तो तिरस्काराला पात्र आहे.

समाप्त.

# परिशिष्ट

## १

## ताजा ग्रॅज्युएट--मुकुंद बी. जोशी

स्थळ:—एक ऑफिस

मुख्य अधिकारी—लहेरी प्रसाद सेन.

पात्रें:—

| | |
|---|---|
| डेप्युटी—कुशाग्रबुद्धि | शिपाई |
| हेडक्लार्क—वजेशंकर | ताजा ग्रॅज्युएट—मुकुंद बी. जोशी, |
| दोन दुसरे कारकुन . | बी. एस्सी; बी. ए (ऑनर्स) |

(ऑफिसांत एक मुख्य अधिकारी, मध्यें डेप्युटी, आणि टोंकाशीं कारकून आपापल्या दरज्जाप्रमाणें बसले आहेत.)

(वजेशंकर मुख्य अधिकाऱ्याजवळ सह्या करवून घ्यावयाला जातो.)

वजेशंकर-साहेब, हे सहीचे कागद.

लहेरीप्रसाद—ओ माय लॉर्ड, किती हे कागद ! चंद्रकले-प्रमाणें कागद रोज वाढताहेत.

वजेशंकर-साहेब, हे कागद महत्त्वाचे आहेत; आज सह्या कराल तर ठीक.

लहेरी. सेन—तुम्हांला माझा उभा हुकुम आहे तो विसरलांत ?

वजेशंकर—साहेब, माहीत नाहीं. उभा हुकूम, हा कोणता वटहुकूम ?

लहेरी. सेन—Standing order, man ! माझा Standing order आहे. उभा हुकूम आहे, उभा की पंधरा पेक्षां जास्त सह्या एका दिवशीं मागूं नये. Standing order, "उभा हुकूम आहे, कायमचा मेमो आहे.

व्रजेशंकर—होय साहेब, कायमचा मेमो आहे पण सह्या थकल्या आहेत.

लहेरी. सेन—थकल्या असतील तर पडतील. पाहात नाहीं मी वर्तमानपत्र वाचीत आहें व चहा पीत आहें तें ?

( कारकुनाकडे कांहीं वेळ रागानें बघून व खुर्ची दुसऱ्या बाजूला फिरवून लहेरीप्रसाद सेन चहा पीत बसतो. व्रजेशंकर जवळच कागद बघत बसतो इतक्यांत हातांत सर्टिफिकिटांचा गठ्ठा घेऊन ताजा ग्रॅज्युएट मुकुंद बी. जोशी प्रवेश करतो. )

जोशी—( पहिल्या कारकुनास ) मिस्टर लहेरीप्रसाद सेन, या ऑफिसचे मुख्य अधिकारी कुठें आहेत ?

पहिला कारकुन—तुम्ही कोण ?

जोशी—अधिकारी कुठें आहेत ?—लहेरी प्रसाद सेन कुठें आहेत ?

प. का.—साहेबांचें काय काम आहे ? कुठल्या ऑफिसांतून हा गठ्ठा घेऊन आलांत ?

जोशी —ऑफिस ? आमचें ऑफिस म्हणजे आमचे विद्यापीठ.

प. का.—हे पीठ कोणतें बुवा ? डाळीचं पीठ माहिती आहे. हें विद्यापीठ म्हणजे काय ? तुमचें नांव काय आणि तुम्ही कां आलांत ?

जोशी—हा तर विद्यापीठाची बरोबरी डाळीच्या पिठाशीं करतों आहे ! ( प. कारकुनास ) माझें नांव मी. मुकुंद बी. जोशी, एसक्वायर असें आहे. आणि माझें काम तुमच्या साहेबांना भेटण्याचें आहे. तुमचे अधिकारी कुठें आहेत ? अधिकारी ?

दु. का.—( हळूंच, प. का. स ) कोणी पढत मूर्ख दिसतो आहे. साहेब वाचण्यांत आणि चहा पिण्यांत गर्क आहत म्हणून ठकि; नाहींतर आपली काणिक तिंबली असती त्यांनीं.

जोशी—अहो मिस्टर ! कां कांहीं उत्तर देत नाहीं ? ( मोठ्यानें ) अधिकारी कुठें आहेत ?

कुशाग्र—( प. का. स. ) हे कोण ?

जोशी—मी एक बी. एस्. सी आहें. बी. ए. ऑनर्स आहें. ताजा ग्रेज्युएट आहें.

कुशाग्र—मग इतक्या मोठ्यानें ओरडायला काय झालं ? इथं कां आलांत ? तुमच्या कॉलेजांतल्या डिबेटिंग सोसायटीची कांहीं इथं मीटिंग नाहीं कीं वाटेल तसा आरडाओरडा चालू शकेल.

जोशी—हळु बोलून उत्तर न मिळालें तर मोठ्यानें बोललेंच

पाहिजे. कांहीं कायद्याविरुद्ध थोडेंच केलें आहे ?

कुशाग्र—तुमच्या ओरडण्यानें ऑफिसच्या कामांत व्यत्यय येत आहे.

जोशी—कां ? कांहीं ट्रेसपास थोडाच केला आहे ? एका जाहीर ऑफिसांत, जाहीर हक्कानें, जाहीर कामाकरितां, जाहीर रीतीनें, जाहीर परिस्थितींत, जाहीर समयीं, जाहीर मुलाकतीकरितां जाहीर होणें याला जर व्यत्यय म्हणत असतील तर ऑफिस ठेवण्याचें प्रयोजन काय ? माझें वर्तन अगदीं तर्कशुद्ध आहे. Quite logical.

कुशाग्र—तुम्हांला कोणीं दाखल केलें ?

जोशी—दाखल कोण करणार ? दाखल होण्याची मनाई असली तर एक तर दारें बंद असावयाला पाहिजेत कवा दारावर पाटी हवी कीं, No admission without permission, परवानगी शिवाय आंत येऊं नये. दारें उघडीं होतीं,; दारावर पाटी विटी कांहीं नव्हती. मला वाटतें माझा प्रवेश तर्कसिद्ध आहे. अगदीं तर्कसमर्थित आहे. It has a logical justification तुमचे अधिकारी कुठें आहेत. ?

कुशाग्र—अरे भल्या माणसा ! तूं व्यवहारीं दिसत नाहींस. काय काम आहे. ?

जोशी—मला अपॉइंटमेंट विषयीं भेटावयाचें आहे.



कुशाग्रः— तुम्हांला दाखल कोणीं केलें ?　　　　पान १६०

कुशाग्र—तरी हरकत नाहीं. पुरवा आपले कोड. साहेब आत्तां चहा पीत आहेत. त्यानंतर सहीचे कागद संपवितील. नंतर वेळ मिळाला तर आज, नाहीं तर उद्यां, साहेबांची रजा मिळवून त्यांना भेटा.

जोशी—( स्वगत )—हा थाप देतो आहे. असें बसून कांहीं नाहीं होणार. याच्या बोलण्यावरून ते चहा पीत बसलेले साहेब असावेत. ( मोठ्यानें ) सर ! (खोंकून आपल्याकडे लक्ष्य वेधीत) सर ! ( खूप मोठ्यानें ) अरे सर ! सर !

लहेरी. सेन—हा कोण आहे ? वजेशंकर, कोण आहे ?

जोशी-( एकदम पुढें येऊन ) गुड इव्हनिंग सर ! ( शेकहँड करितां हात पुढें करितो. )

लहेरी. सेन—(भुंवया चढवून ) यस ! तुम्हीं कोण ?

जोशी-मी ? मिस्टर मुकुंद बी. जोशी, एस्क्वायर, बॅचलर ऑफ सायन्स, बॅचलर ऑफ आर्टस, थर्ड क्लास ऑनर्स, ग्रॅज्युएट ऑफ् दि बॉंबे युनिव्हरसिटी, इन दि इयर 1914 आहे, आणि माझ्या लायकीप्रमाणें आपल्या ऑफिसांत शंभर रुपये पगाराची हेड क्लार्कची जी जागा रिकामी पडली आहे, तिच्याकरितां हुजुरांसमोर समक्ष उमेदवार आहे.

लहेरी. सेन—पण ही गडबड कां करीत होतास ? मि कुशाग्रबुद्धि यांस अर्ज देऊन जायचें होतेंत. तुमचे

qualifications काय आणि तुम्हांला pay किती हवा, तें अर्जांत लिहिलें आहेत ?

जोशी—अर्ज साहेबांना द्यावयाचा कीं कारकुनाला ? साहेबांनाच देणें योग्य आहे, आणि साहेबांनीं स्वतःच तो घेणें हें त्यांचें कर्तव्य आहे. म्हणून तो मी आपणालाच देईन. घ्या हा अर्ज. ( अर्ज देतो ) त्यांत पाहाल तर आपणाला स्पष्टपणें प्रादुर्भूत होईल —

लहेरीसिन—भूत ? भूत कोणाचें ? येथें कांहीं जादुगाराचें काम नाहीं.

जोशी—आपणाला प्रादुर्भूत होईल--that is you will see that, it will appear to you that, आपणाला कळेल—माफ करा साहेब, कॉलेजमध्यें संस्कृत फार पढलों म्हणून आम्ही कित्येक वेळां विनाप्रयत्न माठे अवघड शब्द वापरतों—कळेल कीं, मी मुंबई युनिव्हरसिटीचा एक बी. एस्. सी. आहें; आणि ज्यास्तींत बी. ए. आहे. नव्या कोर्सप्रमाणें बी. ए. थर्डक्लास ऑनर्स आहें. कॉलेजांत आप्रवेशबहिर्गमनांत शिष्यवृत्त्या धारण करीत होतों, आणि तेथील अनेक प्रवृत्तींत उत्साहपूर्ण भाग घेत होतों. कॉलेज मिसेलेनिमध्यें लेख लिहीत होतों आणि ते फार नांवाजले जात असत. प्रोफेसरांबरोबर टेनिस टुर्नामेंटमध्यें उतरत असे, आणि त्यांत प्रोफेसरांचा नेहमीं पराजय करीत असें. फर्स्टक्लास डिबेटर होतों. युनियनचा सेक्रेटरी, आणि माझ्या सहाध्यायांचा माननीय, वंद-

नीय, प्रशंसनीय असा पुढारी अनेक वर्षे होतों. आणि माझ्या मतें ही कांहीं जशी तशी योग्यता नव्हे; इतकेंच नाहीं तर·—

लहेरी. सेन--या सर्व तपशीलाचा येथें काय उपयोग ?

जोशी--कां साहेब ? लायकीप्रमाणें नेमणूक करायला आपण बांधले गेले ( हात आपटून ). आहांतच ना ? पाहण्याची इच्छा असल्यास हीं माझीं सर्टिफिकिटें आणि हे लेख ( मोठा गठ्ठा टेबलावर ठेवतो ). सर्टिफिकिटें टाईपरिटन आहेत. एखादें वाचून बघा. तार्किक क्रमानें in logical order—सर्वांत पहिलें माझ्या प्रिन्सिपॉल साहेबांचें सर्टिफिकिट ठेविलें आहे तें बघा.

लहेरी. सेन--वजेशंकर ! यांना जरा समजवा.

वजेशंकर--( जोशी यांस ) मिस्टर ! जरा समजा.

जोशी--होय समजलों. मी स्वतःच वाचीन. साहेबांना तसदी नाहीं देणार. प्रिन्सिपॉलसाहेब लिहितात कीं: —

Mukund B. Joshi was a student of this College for a period of eight or nine years, during which time he distinguished himself in various College activities. He is fairly intelligent and bears a good moral character despite the fact that at times his name was associated with some College mischief.

लहेरी सेन—( वजेशंकरास ) कोणी क्रॅंक दिसतो. समजूत घालून काढून लावा. सर्टिफिकेट तर त्याच्या विरुद्ध जात आहे.

वजेशंकर–साहेबांना वेळ नाहीं हें माहितच असेल.

जोशी–साहेब सांगतील तर जाईन. तुम्हीं तर कारकून आहांत

लहेरी. सेन-तुम्हांला कोणती नोकरी हवी तें माझे डेप्युटी मि. कुशाग्र यांना सांगून व अर्ज त्यांना देऊन जा.

जोशी-हेड क्लार्कची, रुपये शंभराची नोकरी हवी.

लहेरी. सेन–आम्हांला तर पंचवीस रुपयांची जागा भरावयाची आहे. बाकी सर्व भरल्या गेल्या. आम्हीं ऑफिसांतल्या लोकांनाच ग्रेडीप्रमाणें चढविलें आहे. तुमच्यासारखे नवीन, अनुभवावांचूनचे, उद्धत आणि मगरूर ग्रॅज्युएटांपेक्षां आम्हांला असें करणें ठीक वाटतें.

जोशी–Illogical, तर्काविरुद्ध लायकीचें वर्णन म्हणजे काय मगरूरी. ?

लहेरी. सेन–माझ्या बरोबर वादविवाद करायला आला आहांत ?

जोशी–नाहीं तर माझ्या हक्कांचें आपल्यांशों भांडण कसें होणार?

लहेरी. सेन-किती असभ्य.

जोशी–Illogical : तर्काविरुद्ध. मोकळ्या मनानें बोलणें म्हणजे काय असभ्यता ?

लहेरी. सेन–वजेशंकर, हा मनुष्य तर कंटाळा आणीत आहे.

जोशी-अर्जदाराचा अर्ज कर्तव्यानुरूप ऐकणें याचें नांव कंटाळा ? तुमचीं सर्व लक्षणें दूषित आहेत. त्यांत अतिव्याप्ति आहे. दुसरें कांहीं नाहीं. पण आपल्या-

सारखीं माणसें असें तर्कशास्त्राचें उल्लंघन करीत असलेलीं पाहून वाईट वाटतें. With due respect, Sir, your logic is faulty.

लहेरी. सेन-वजेशंकर, याला कोणीं दाखल केलें ?

जोशी—लायकीनें, माझ्या लायकीनें.

लहेरी. सेन--लायकी किती आहे ती प्रिन्सिपॉलच्या सर्टिफिकेटावरून दिसतेच आहे. Please leave the office.

वजेशंकर--साहेब काय म्हणाले ऐकलेंत. ?

जोशी--ऐकलें. पण हीं सर्टिफिकिटें तर साहेबांजवळ राहूं द्या.

वजेशंकर--गांध्याला द्या. त्याच्याकडे कांहीं किंमत येईल.

जोशी--What do you mean ? you have no business to disrespect me. काय, माझा अपमान करणार ? सबंध ऑफिस साक्ष देईल, तुम्हांला defamation मध्यें खेचीन.

कुशाग्र—( घंटा पुनः पुनः वाजवितो ) शिपाई ! पटावाला ! याला बाहेर काढा.

जोशी--मी स्वतः जाईन. पटेवाल्याला कशाला बोलावतां ? तुमच्यांपैकीं कोणाला माझ्या लायकीचें ज्ञान आहे कीं नाहीं. ?

लायकी नंबर वन--बी. एस्सी.

लायकी नंबर टु—ऑनर्स बी. ए., थर्डक्लास ऑनर्स.

लायकी नंबर थ्री—पन्नास सर्टिफिकिटांचा मालक.

लायकी नंबर फोर—नामांकित कॉलेज मिसलेनींतील लेखक

लायकी नंबर फाईव—सहाध्यायांचा पुढारी, एका रीतीनें त्यांचा **खरा गुरु, खरा प्रोफेसर, अरे! खरा प्रिन्सिपाल.**

It seems none of you respect learning and university degrees. I have still a logical remedy. I shall approach a member of the Legislative Council and try to have a question asked to Government in connection with your thus disregarding my claims. (जातो)

लहेरी. सेन—अशा विचित्र माणसाला पटेवाल्यानें आंत कसें येऊं दिलें? पटेवाल्याला बोलवा.

वजेशंकर—शिपाई! शिपाई!

प. का.—शिपाई!

दु. का.—शिपाई! (बाहेर जातो, आणि शिपाई झोंपलेला पाहातो. त्याला उठवून साहेबाजवळ पाठवितो. शिपाई डुकल्या घेत साहेबाजवळ जातो.)

लहेरी. सेन—Oh? he is dozing!! त्याला कां येऊ दिला?

सिपाई—साहेब, कोणाला?

लहेरी. सेन-Damn! तुम झोंप घेता है. वजेशंकर, याला एक रुपया दंड करा.

शिपाई—साहेब, नुकसान होईल. परवर दिगार दया करा. पगारांत पुरें होत नाहीं तर दंड कुठून भरणार?

लहेरी. सेन-जंगली! गुन्हा करकर दया चहती है! वजेशंकर Dismiss him.

वजेशंकर--Sir, be pardoned, be pardoned, Peons are difficulter to have than graduates.

लहेरी. सेन--( खूप हंसतो ) Vajeshanker, you have given me an intellectual treat! ( शिपायास ) जा, माफ करीत आहे. पुनः झोंपलास तर हांकलून देईल. ( एकीकडे ) वजेशंकराला अजूनहि इंग्रजी येत नाहीं. Be pardoned ! Good God and difficulter ! अशांचें इंग्रजी सुधरविण्याकरितां सक्तीच्या रात्रीशाळा हव्यात. ( वजेशंकरास ) आणा, सहींचा ढीग. ( सह्या करणें सुरू होते. )

## २

# वक्तृत्वकलेचें शिक्षण

### वक्तृत्वाचा शिष्य

### प्रवेश पहिला

स्थळः---वक्तृत्वकलेच्या प्रोफेसराचें वाचनालय.

पात्रें:--१. वक्तृत्वकलेचा प्रोफेसर.

२. वक्तृत्वकलेचा शिष्य.

( प्रोफेसर हाफकोट, टाय कॉलर, पाटलोण, हॅट वगैरे नवीन पद्धतीच्या पोशाकांत स्वतःच्या वाचनालयांत बसले आहेत. वक्तृत्वकला शिकू इच्छिणारा शिष्य धोतर वगैरे हिंदु पोशाकांत प्रवेश करतो. )

शिष्य--जयजय, गुरुश्री, जयजय.

प्रोफेसर--यस, गुडमॉर्निंग [ शेक हँड ].

शि.---आपणाला एक तसदी द्यावयाची आहे. वक्तृत्वानें लोकांची सेवा मला करावयाची आहे, आणि त्याकरितां वक्तृत्वकला शिकावयाची आहे. आपण मला ती शिकवाल काय ?

प्रो.---आनंदानें, मोठ्या आनंदानें. भल्याभल्यांना मी वस्ताद बनवून दिले आहेत. तर तुम्हांला कां नाहीं बनविणार ? तुम्हीं तर जात्याच बुद्धिशाली आहांत.

शि.---तें सर्व ठीक; पण--एकाच मुलाखतींत मला शिकावयाचें आहे.

प्रो.—तरी हरकत नाहीं. इतकेंच कीं फी जास्त द्यावी लागेल.

शि.—एकाच मुलाखतींत सर्व शिकविण्याची फी काय घ्याल ?

प्रो.—एकाच मुलाखतींत सर्व शिकावयाचें असल्यास रु ५'५५--१--० पडेल.

शि.--- फी फार ज्यास्त आहे.

प्रो.---तुम्हांला हें माहीत असावयाला पाहिजे कीं मी कांहीं साधारण शिक्षक किंवा पंतोजी नाहीं; पण एक प्रोफेसर आहे. आणि पंतोजी व प्रोफेसर यांमधील फरक तर तुम्ही जाणतच असाल ?

शि.—( एकीकडे ) आज काल प्रोफेसर फार वाढले आहेत. जो पाहावा तो प्रोफेसर ! गायन जाणणारा प्रोफेसर. कसरत करणारा प्रोफेसर, सरकस कंपनीचा मालक प्रोफेसर, जादूचा प्रोफेसर. उद्यां एखाद्या सराफ कट्टयाचा व कचरापट्टीचा प्रोफेसर होईल. जिथें--तिथें प्रोफेसराचें नांव वापरून जास्त पैसे उकळविण्याची दानत दिसते. काय करावें ? वक्तृत्व शिकावयाचेंच आहे. म्हणजे रुपये ५५५ द्यावयाला हवेत. (प्रोफेसराला उद्देशून ) रुपये ५५५ कबूल आहेत.

प्रो.—५५५ आणि १ आणा.

शि.—एक आणा कशाला ?

प्रो.—रसिदीच्या तिकिटाला. रसिदीवर लावावयाच्या तिकिटाचे

आणे मी काढूं लागलों तर संपलेंच म्हणावयाचें. माझ्याकडे असे पुष्कळ शिष्य येणार.

शि. – रुपये ५५१ आणि १ आणा कबुल. चला शिकवा.

प्रो. —सावधान. पाहा, माझ्या समोर पाहा. कल्पना करा कीं तुम्ही एखाद्या सभेसमोर उभे आहांत.

शि. -- सभा इथें कुठें आहे ?

प्रो.—कल्पना करा; कल्पना करावयाची.

शि.-( डोळे मिटून ) केली कल्पना.

प्रो. आतां जें जें तुमच्या समोर असेल त्याला त्याला संबोधा

शि.—( डोळे मिटून ) भिंतींनो, खुर्च्यांनो, आणि सद्गृहस्थांच्या मस्तकांनों !

प्रो. -अहो डोळे उघडून, पाहून बोला. भिंतींना आणि खुर्च्यांना का संबोधावयाचें ? सभेला संबोधून बोला.

शि.—ती इथें कुठें आहे ? इथें तर तुम्ही आणि मी दोघेंच आहोंत.

प्रो.—कल्पना करावयाला सांगितलें होतें तें विसरलांत ? सभा कल्पून तिला संबोधा. जें जें सभेंत असूं शकेल त्याला संबोधा.

शि.-बालकांनो व बालिकांनो ! स्त्रियांनो व पुरुषांनो !

प्रो.—सभ्य स्त्रीपुरुषांनो !—एवढेंच. बालक व बालिका त्यांत आल्या.

शि.—सभ्य स्त्रीपुरुषांनो !

प्रो.- आतां जें कांहीं सांगावयाचं असेल तें घाबरल्यावांचून



शिष्यः—( डोळे मिटून ) भिंतींनो, खुर्च्यांनो, आणि
सद्‌गृहस्थांच्या मस्तकांनो! पान १७०.

सांगून टाका. वक्तृत्वकला म्हणजे सफाईबंद बोलण्याची कला. आपण सर्व बोलतो, पण सफाईनें फारच थोडे बोलतात.

शि. सफाईनें कसें बोलावयाचें ?

प्रो.—शब्द सुंदर वापरावे, वाक्यें कर्णमधुर बनवावीं. शक्य तितकी त्याच्यांत गोडी आणावी. येईल ना ?

शि.—उदाहरणें देऊन समजवा.

प्रो.—पाहा, एखादें साधें वाक्य असलें तरी वक्तृत्वाला साजेसें तें बनवितां येतें. उदाहरणार्थ "हल्लीं दुष्काळा-मुळें महागाई आहे, आणि म्हणून गरिबांचा मरा आहे." इतकेंच सांगावयाचें असल्यास प्रथम त्या वाक्याला लांबवावें आणि त्यांत समतोलपणा आणावा. हेंच वाक्य वक्तृत्वाच्या दृष्टीनें असें रचावें-हल्लीं पुष्कळ दिवसांपासून, वर्षें झालीं, दोन तीन दशकांपासून पाऊस कमी पडतो, मेघराजाची अवकृपा आहे, देशांत दुष्काळ आहे, कहर गुदरला आहे, महागाई आहे, आणि म्हणून मध्यमवर्गापासून कनिष्ठ वर्गाला म्हणजे गरीब लोकांना जीविताच्या गरजांकरितां, अंगाधरील वस्त्रांकरितां, खाद्यपेयांकरितां, अर्भकांच्या संगोपनाकरितां, फारच कष्ट सहन करावे लागत आहेत, फारच त्रास सोसावा लागत आहेत, तात्पर्य त्यांचा बिचारांचा मरा आहे. पाहा-या वाक्याचे सहा तुकडे पडतात, आणि ते जणूं काय तराजूंत तोलल्याप्रमाणें

सारखे आहेत. ठिकठिकाणीं सांधे आहेत. त्यामुळें आतां वाक्य मधुर बनलें.

शि.—असें तर येईल

प्रो.—जें बोलावयाचें असेल ते अभिनयासहित बोलावें. भारानें सांगावयाचें असेल तिथें हात ठोकावा. आनंदाची गोष्ट असेल तिथें किंचित् स्मित करावें, जरूर वाटल्यास हंसावें. खेदाची गोष्ट असेल तिथें तोंड आंबट करावें, जरूर वाटल्यास रडावें. अशा प्रकारें व्यावहारिक मनुष्याप्रमाणें वागावें.

शि.—उदाहरण द्या.

प्रो.-जिथें तिथें उदाहरण काय देऊं? एक वेळ देतों आणखी. हें बघा, मघाचेंच वाक्य अभिनयासहित असें बोलतां येईल:-हल्लीं पुष्कळ दिवसांपासून (दोन हात पसरून), वर्षे झालीं, दोन तीन दशकांपासून (दोन तीन बोटें दाखवावीं), पाऊस कमी पडतो (आकाशाकडे हलकेंच बोट दाखवावें), मेघराजाची अवकृपा आहे (तोंड थोडें खिन्न करून), देशांत दुष्काळ आहे (हात हलवून), कहर गुदरला आहे, (एकदम तोंड खिन्न करून) महागाई आहे (अगदीं आंबट तोंडानें), आणि म्हणून मध्यम वर्गापासून कनिष्ट वर्गापर्यंत (तळ हाताचा भाग जमिनीकडे करून), म्हणजे गरीब लोकांना (तोंड व हात नमवून) जीविताच्या गरजांकरितां, अंगावरील वस्त्रांकरितां (कोट पाटलोण दाखवून), खाद्यपेयांकरितां;

(तोंडाजवळ हात नेऊन), अर्भकांच्या संगोपनाकरितां (मुलाला खेळवीत असतांना होतात तसे हात करून), फारच (तोंड फार दयार्द्र करून) कष्ट सहन करावे लागत आहेत, फारच त्रास सोसावा लागत आहेत, तात्पर्य त्यांचा बिचाऱ्यांचा मरा आहे (शरीर जणूं काय टाकून देऊन.)

शि.—आतां येईल.

प्रो.—अलंकार वापरावे.

शि.—दागिने कोणते वापरावें ?

प्रो.—अहो भाषेचे अलंकार; दागिने कसले ?

शि.—ते कसे असतात ?

प्रो.—इतकं नाहीं येत ? हें पाहा जिथें मुख म्हणावयाचें असेल तिथें मुखचंद्र म्हणावें, विद्या म्हणावयाचें असेल तिथें विद्यारत्न म्हणावें. साक्षर हा शब्द हल्लीं फार वापरावा लागतो, म्हणून जिथें साक्षर म्हणावयाचें असेल तिथें साक्षर रत्न म्हणावें. बस्, असें बोलण्याचा क्रम ठेवावा.

शि.—तें सर्व ठीक; पण नवीन कांहीं न सुचलें तर काय करावें ? दुसऱ्यांनीं वापरलेले अलंकार वापरतां येतात ? येत असले तर मग हरकत नाहीं.

प्रो.—वापरतां येतात.

शि.—एक प्रकारची चोरी झाली. हें कसें जमणार ?

प्रो.—कांहीं हरकत नाहीं. वाङ्मयांत तर चोरी होऊ शकते.

शि.—बस संपलं कीं नाहीं ?

प्रो.—असे उतावीळ होऊं नका. तुमच्या फी प्रमाणें शिक्षण अजून संपलें नाहीं. विशेष हें कीं लोकप्रिय होण्याचा प्रयत्न करावा.

शि.—तें कसें ?

प्रो.—" अपटुडेट " रीतीनें मोठ्या माणसांचीं नांवें घ्यावींत हल्लीं स्वर्गस्थ सर फिरोझशाहा मेहेता आणि ऑ. गोखले यांचीं नांवें घेतल्यानें अपटुडेट राहतां येईल.

शि. ठीक आहे. हें येईल.

प्रो.—श्रोत्यांत खास प्रिय होण्याकरितां त्यांच्या वेळेची आपणाला फार काळजी आहे असें दाखवीत म्हणावें- "जास्त बोलून आपणाला कंटाळा आणीत नाहीं. आपला वेळ मी फुकट घेणार नाहीं. " म्हणजे श्रोते म्हणतील कीं, ' चालूं द्या. चालूं द्या." मग थोडा वेळ सुरू ठेवावें. असें केल्यानें लोकप्रियता सांभाळली जाईल.

शि.—बस. आतां पुष्कळ माहीत झालें. जयजय.

प्रो.—फीचे रुपये.

शि.—सर्व लक्षांत राहिलें. फक्त तेंच विसरलों. घ्या ह्या नोटा आणि हा आणा--रसिदीची जरूरी नाहीं. आतां रजा द्या. ( शिष्य जातो )

प्रो.—अशी कमअकल माणसें दुनियेंत जगत आहेत तोंपर्यंत आपल्या पोटाला चिंता नाहीं. बाकी वक्तृत्व ! खरें वक्तृत्व असें शिकतां येणार नाहीं आणि शिकवितांहि

येणार नाहीं. वक्ता देखील कविप्रमाणें जन्मतःच व्हावा लागतो. ज्याला वक्ता व्हावयाचें असेल त्याचा कंठ मधुर असावा, आकृति आकर्षक असावी, आणि विचार नव्या पद्धतीनें सांगितले जावे. आजकाल पाहावें तों कठोर स्वर, भयंकर रूप आणि नकली विचार--जणूं काय ग्रामोफोनच्या रेकॉर्डस--या साधनांवर लोक वक्ते होऊं इच्छितात. अरे ! हें सर्व ठीक, पण याहि पेक्षां--( शिष्य पुनः प्रवेश करतो )

शि.--माफ करा ! दोन गोष्टी विचारावयाच्या राहिल्या

प्रो.--दोन काय ? दोनशे विचारा. पण आज. उद्यां उभा नाहीं राहू देणार. कारण अशी सूट देऊं लागलों तर मला फार त्रास होईल.

शि.--कपडे कोणते वापरावेत ?

प्रो.--अप-टु--डेट.

शि.--पाटलोण ?

प्रो.--होय.

शि.--टाय कॉलर ?

प्रो.--हो.

शि.--दक्षणी जोडे ?

प्रो --ते काय करावयाचे ?

शि.--कां ? ते अप-टु-डेट आहेत ना ?

प्रो.--दक्षिणी जोडे अप-टु-डेट ?

शि.--अप-टु-डेट या अर्थानें कीं देशाभिमानाच्या गप्पा मारणें

हल्लीं अप-टु-डेट समजलें जातें; आणि देशाभिमानाशीं दक्षणी जोड्यांचा जितका संबंध आहे तितका दुसऱ्या कोणाची ?

प्रो.—छे ! छे ! हें नाहीं चालणार.

शि.--डोक्यावर काय घालावें ? पगडी कीं टोपी कीं हॅट ? का कांहींच नाहीं पगडीवांचून बाकी कांहीं सांगा. पगडीनें माझें डोकें दुखतें; आणि वीस पंचवीस वर्षांनीं कोणी पगडी घालील असें मला नाहीं वाटत. म्हणून तिच्याशिवाय सांगा.

प्रो.--टोपी किंवा हॅट चालेल.

शि.--दोन घरचा पाहुणा उपाशी. अशी विकल्पानें गोष्ट नका सांगू. टोपी कीं हॅट ? काय ? किंवा डोक्यावर कांहींच नाहीं घातलें तर ?

प्रो.--चालेल.

शि.—बोलतांना थकलों तर काय करूं ?

प्रो.—पाण्याची व्यवस्था करावी.

शि.—पाण्याची व्यवस्था असली आणि कदाचित् न थकलो तर त्या पाण्याचें काम करावयाचें ?

प्रो.—तरीहि पाणी प्यावें. त्यानें महत्त्व वाढतें.

शि.-आतां मला वाटतें कीं वक्तृत्वाचें मूळ तत्त्वच नाहीं तर सारें साख मी शिकलों. चला रजा घेतों. नमस्कार.

प्रो.—नमस्कार.

## प्रवेश दुसरा

स्थळः--जाहीर सभागृह.

पात्रें:--तल्लकचंद, वखतचंद, स्वरूपचंद वगैरे सभासद; आणि शिखाऊ वक्ता.

( धार्मिक शिक्षण सरकारनें सक्तीचें करावें असा ठराव करण्याकरितां बोलावलेली सभा भरली आहे. टेबलावर पाण्याचा ग्लास ठेवला आहे. शिखाऊ वक्ते पाटलोण, हाफ कोट, टाय--कॉलर वगैरे कपड्यानिशी उघड्या डोक्यानें प्रवेश करतात. )

स्वरूप. -आजच्या सभेचें अध्यक्षस्थान शेठ तल्लकचंद यांनीं मंडित करावें असा मी ठराव मांडीत आहें. शेठजींना सूर्यचंद्रहि ओळखतात. ( हंशा ) म्हणून ज्यास्त मी कांहीं सांगत नाहीं.

वखत.--स्वरूपचंद यांनीं मांडलेल्या ठरावला मी अन्तःकरणपूर्वक टेका देतों.

[ हंशा; तल्लकचंद अध्यक्षस्थानीं बसतात. ]

तल्लक.--बंधुंनो, आजची सभा कां बोलावण्यांत आली आहे तें तुम्ही सर्व जाणता. धार्मिक शिक्षण सक्तीचें करण्याविषयींचा ठराव करून तो सरकारकडे पाठवावयाचा आहे. तो ठराव मांडण्याकरितां जे गृहस्थ बोलणार आहेत त्यांनीं वक्तृत्वाचें शिक्षण घेतलेलें आहे. म्हणून या सभेंत त्यांच्या इतकी लायकी कोणाची नाहीं. त्यांना बोलण्याविषयीं मी विनंती करतों.

वक्ता—सभ्य स्त्री पुरुषांनो !

दोन सभासद—Out of order ! Out of order ! अध्यक्ष महाराज येथें आमच्यांत स्त्री कोण आहे ?

वक्ता-( मनांत ) पोपटपंची ! प्रोफेसरांनीं शिकविल्याप्रमाण बोललों. पण येथें तर कोणी स्त्रिया नाहींत. जरा खुशामतीनें सुधारून घेतों. ( सभेस ) महेरबान सद्गृहस्थांनो ! आजचें अनुपम कर्तव्य—

दोन तीन सभासद-अध्यक्ष महाराज, स्त्री हा शब्द वक्त्याला मागें घ्यायला सांगा, आमचा अपमान झाला.

तह्लुक—हूं, चालूं द्या.

सभासद—अपमान ! अपमान !

वक्ता-( मनांत ) जरा जास्त खुशामत हवी आहे. ( सभेस ) अतीव मायाळु आणि जाज्वल्यमान सद्गृहस्थांनो, आजचें कर्तव्य, आजचें अत्युत्तम, अनुपम कर्तव्य बजावीत असतांना माझें हृदय आनंदानें उचंबळून येत आहे. आज आपण एकत्र जमलों आहोंत तें आपल्या धर्माकरितां, आपल्या प्रगतिकरितां, आपल्या उन्नतिकरितां होय. आपली आधुनिक अधोगति आपल्या धार्मिक अधोगतिमुळेंच झाली आहे. (मनांत) कांहीं अलंकार नाहीं सुचला (प्रगट) आपण अधोगतीच्या कुपांत निमग्न झालों आहोंत याचें कारण धार्मिक शिक्षणांचें आपणास पान नाहीं, धार्मिक

रहस्याचें ज्ञान नाहीं. धार्मिक सत्यरूपी दीपाचा प्रकाश नाहीं हें होय. ( टाळ्या. पुढें बोलण्यापूर्वी वक्ता टेबलावर ढब, ढब, असा अवाज करतो. ) मीं खात्रीनें सांगतों कीं ( एकीकडे एक सभासद मोठ्यानें, 'बोलण्यापूर्वी हात ठोकतो ! जेवणापूर्वी तोंड धुतो ! ') ज्या लोकांना शिक्षण धार्मिक तत्त्वांच्या आधारावर मिळत नाहीं त्या लोकांचें शिक्षण पायावांचूनच्या घरासारखें असतें. ( मनांत ) टाळ्या कां नाहीं ? हं. फिरोजशहा. ( प्रगट ) शाळांतून धार्मिक शिक्षण असावयाला पाहिजे असें लोकमान्य, स्वर्गस्थ हिंदु-धर्माचें नायक सर फिरोजशाहा यांचें आग्रहाचें म्हणणें होतें. ( समोरून एक सभासद—हा काय बोलतो आहे ? हिंदुधर्माचें नायक सर फिरोजशाहा ? ) ( मनांत ) सर फिरोजशहाचें नांव घेऊनहि टाळ्या नाहीं. ! ठीक जरा भावना अजमवून पाहातो. ( वक्ता रडू लागतो. रडून राहिल्यावर ) ( प्रगट ) अफसोस आतां माझें हृदय भरून येत आहे., दुर्दैवानें आपलें आयुष्य पायावांचूनचें बनलें आहे. जास्त बोलून आपणाला कंटाळा आणीत नाहीं. फक्त इतकेंच ( सभासद—go on, go on चालूं द्या, चालूं द्या ) जशी आपली इच्छा. आपणाला नाराज करावयाला मी असमर्थ आहे.आपलें घर पायावांचूनचें आहे.आपल्या पिढीविषयीं मला वाईट वाटतें. आपण तर वृद्ध झालों.

पण आपलें उगणारे, उमलणारे, कोंवळे वृक्ष--आपलीं बालकें- त्यांचें काय व्हावयाचें ? त्यांचें भविष्य आपल्या हातांत ठेवीप्रमाणें आहे. आपणाला ज्यास्त न थांबविनां इतकेंच सांगावयाचें--( सभासद, go on, go on: चालूं, द्या चालूं द्या. ) (मनांत) दूसऱ्यांदा चालूं ठेवण्याला सांगितल्यावर काय करावयाचें तें प्रोफेसरांनीं शिकविलें नाहीं. आणि आतां माझं बोलणें संपत आलें आहे. कांहींच सांगू शकेन असें नाहीं. तरी पण युक्ति करून पाहातों. ( प्रगट ) आपला स्नेह मला कळतो; पण आतां अधिक बोललों तर अध्यक्ष महाराजांना तस्दी दिल्यासारखें होइल.

अध्यक्ष -चालूं द्या मी ऐकायला तयार आहें.

वक्ता.-आपण वेळ देतां हा आपला मोठेपणा, पण मी जर थांबलो तर ता उद्धटपणा होईल.

अध्यक्ष-अजून मुख्य बाबत तर बाकी आहे. वेळ पुष्कळ आहे. चालूं द्या.

वक्ता--( अधिक कांपू लागतो. दोन तीन मिनिटें डोकें खाजवून नंतर कांपत कांपत उभा राहतो )

सभासद-go on, go on, चालूं द्या, चालू द्या. ( टाळ्या ) चालूं द्या, चालूं द्या.

वक्ता--( अधिकच कांपतो. मनांत ) काय चालवूं ? कपाळ, पळून जाउं द्या. ( वक्ता हॉलमधुन पळून जाण्याचा

प्रयत्न करतो. धावत असता ठोकर लागून पडतो; आणि उठून पळून जातो. )

दोन सभासद—वक्ते आजारी पडले? ( हंशा. प्रचंड हंशा. वक्ता पुनः प्रवेश करतो. )

वक्ता—( मनांत ) तें पाणी तर राहून गेलें वाटेल तें होवो. व्यायल्यानें महत्त्व तर टिकेल. ( टेबलावरील ग्लासांतील पाणी भरकन् पिऊन पळून जातो. खूप हंशा. प्रचंड हंशा )

अध्यक्ष:—सभा आज बरखास्त करण्यांत येत आहे. वक्त्यांना कांहीं तरी झालें असावेसें दिसतें. कदाचित् कंठ बसून गेला; पाणी प्यावें लागलें. उद्यां याच जागीं याच वेळीं सर्वजण जमूं या. ( सर्व जातात. )

३

# काठीची करामत

## प्रवेश पहिला

## शेठजींचें फरमान

स्थळ:—रामलाल शेठाचें घर

पात्रें:—रामलाल शेठ व त्यांचा गुमास्ता बीकणलाल

रामलाल—(स्वगत) अहाहा ! नशीब ! काय अजब युक्ति ! कनैयालाल काकांचा बावीस लाखांचा डल्ला ! बस, आला. मिळाला. तिनशे माईल दूर पण आज माझ्या मुठींत आहे. थोडीशी युक्ति कीं काम फत्ते. काकांनीं वील करून आपली मिळकत मला दिली आहे. ( कागद पाहून ) हें राहिलें तें वील. कोडीसील करून हें वील रद्द करण्यांत आलें आहे. हें मला माहीत आहे, आणि कोडीसीलमध्यें मिळकतीचा वारस स्वतःचा मुलगा परमेश्वरलाल आहे, असें लिहिलें आहे, हेंहि मला माहीत आहे. म्हणून कोडिसील मिळवून तें फाडून टाकलें कीं सर्व मिटलें; कारण तें रजिस्टर्ड करवून घ्यायला काकांना पुरेसा वेळ मिळाला नव्हता. कोडिसील काकांचे मित्र मि. लोभीलाल यांच्या कबज्यांत आहे. त्याचें कसें ? ( विचार करून ) लोभीलाल यांस बावीस लाखांपैकीं एक लाख देण्याचें वचन मीं दिलें

असून त्याबद्दल त्यानें कोडिसील माझ्या स्वाधीन करावें असें ठरलें आहे, तेव्हां ती युक्ति साधून घ्यावी. ठीक असेंच. पण तें मागवून कसें घेऊं ? स्वत: घ्यावयाला जावें तर तें ठीक नाहीं; कारण या वीलाला देखील मला जीवाप्रमाणें जपायला हवें. तें घेऊन त्याच्याजवळ गेलों आणि तिथें तें हरवलें किंवा कोणीं जबरदस्तीनें काढून घेतलें तर सर्वच नाश. इन्श्युअर्ड पोस्टानें मागवूं का ?–पण तेंहि ठीक नाहीं. पोस्टांतून दस्तैवज नाहींसा झाला तर मला फार झालें तर पैसे मिळतील, आणि तेंहि किती ? कांहीं बावीस लाखांचा विमा थोडाच उतरवितां येणार ? ( थोडा अधिक विचार करीत ) हं. हं. बस. एक मार्ग आहे, आणि तो चांगला आहे, त्या नव्या वाण्याला माझें गुपित माहीत आहे. ( मोठ्यानें ) अरे बीकणलाल, बीकणलाल, बीकण.

( बिकणलाल प्रवेश करतो )

बीकण.–जी.

रामलाल–तुला मुंबईस जावयाचें आहे.

बीकण.–केव्हां ?

रामलाल --आजच. तिथें जाऊन लोभीलाल यांस भेटून, तो कागद तावडतोब आणावयाचा आहे.

बीकण–चिठ्ठी द्या म्हणजे सेवक तयार आहे.

रामलाल- मीं त्याला पत्र लिहिलें आहे. तूं फक्त त्याच्याजवळ जा, आणि तो तुला दोन प्रश्न विचारील. त्याचीं मी शिखवीन तशीं उत्तरें दे म्हणजे तो तुला कागद देईल. कागद जसा सीलबंद देईल, तसा सीलबंद रुजू कर.

बीकण- प्रश्न काय व उत्तरें काय तें सांगा.

रामलाल--त्यानें विचारलें "बे बे किती"? तूं सांग "बावीस लाख." नंतर विचारील "त्यांतून उणे किती?" तूं सांग, "एक लाख एकशे एक" राहील लक्षांत?

बीकण--घोकल्यानें राहील. पण असले खोटे गुणाकार आणि वजाबाक्या या वाण्याच्या जिभेनें नाहीं घोकल्या जाणार आम्हीं वाणी लोक झोंपेंतहि आंकड्यांची मोजदाद चुकत नाहीं. तर असला गडबडघोंटाळ्याचा हिशोब मोजतांना गुमास्ता नात्याच्या माझ्या अब्रूला धक्का लागेल, साहेब.

रामलाल--धन्याचा हुकूम पाळणें हीच नोकराची अब्रू; समजलास?

बीकण.--पण असलें विचित्र, असलें हंबग, असलें—

रामलाल--बस, बस, बस. गुमास्त्याला शेठाच्या कामावर टीका करण्याचा हक्क नाहीं. हुकूम आणि त्याचा अंमल--दुसरी गोष्ट नाहीं बस, लवकर नीघ जा.

बीकण. जशी इच्छा. ( जातो )

रामलाल–लोभीलाल यांस आत्तांच पत्र टाकतो. ( लिहून पत्र वाचतो ) श्रीयुत परमपूज्य निस्वार्थी ( मनांत ) हे पुण्यशाळी गृहस्थ स्वर्गांत बसायला योग्य आहेत, असें त्यांना खुष करण्याकरितां (प्रगट) स्वर्गस्थतुल्य स्नेही भाई लोभीलालभाई,

आपल्या कबुलीप्रमाणें एकलाख घायला मी माझा मनुष्य बीकणलाल यांस तुमच्याकडे पाठविला आहे. त्याला तें कोडिसील द्या. पोस्टानें कोडिसील मागविणें ठीक न वाटल्यामुळें, आणि स्वतः येणें पण उचित न वाटल्यामुळें, मीं माझ्या मनुष्याला पाठविलें आहे. तो मनुष्य माझ्या खात्रीचा आहे. त्याला चिठ्ठी दिली असती, पण चिठ्ठी कोणी चोरून घेऊन कांहीं ठगविद्या वापरली गेली तर मी मारला जाईन. तसेंच दुसऱ्या तऱ्हेनें कांहीं घोंटाळा होऊं नये म्हणून मीं त्याला दोन अर्थहीन उत्तरें शिकविलीं आहेत. तुम्हीं मात्र दोन प्रश्न विचारावेत. प्रथम “ बे बे किती ? ” आणि नंतर “ त्यांतून वजा किती ? ” बे बे बावीस लाख आणि एक लक्ष एकशे एक असें त्यानें सांगितलें कीं विलंब न करतां त्याला कोडिसील द्या. कोडिसील मिळालें कीं दुसऱ्याच दिवशीं एक लाखाचा चेक पाठवून देईन. हीच विनंती.

आपला, साक्षररत्न सदा शुभेच्छक, इहलोकांत तसेंच परलोकांत आपला नेहमींचा उत्तमोत्तम मित्र.

शेठजी रामलाल, खुद्द.

## प्रवेश दुसरा

## बीकण गुमास्त्याचें घाभरट पाऊल

स्थळ:-रस्ता.

पात्रें:—बकिणलाल व परमेश्वरलाल.

बीकण.—( रस्त्यानें बडबडत ) शेठजींचा मेंदु बिघडलेला दिसतो. लोभीलाल जवळून एक कागदाचें चिटोरें आणावयाचें त्यांत गडबड केवढी ! आणि त्यांत मूर्खपणा ओतप्रोत भरलेला; लोभीलाल म्हणेल "बे बे ?" तेव्हां मीं सांगावयाचें, "बावसि लाख" आणि त्यानें विचारलें, "त्यांतून उणे काय ?" कीं मीं सांगावयाचें, "एक लक्ष एकशें एक".

परमे.—( मागें ऐकत मनांत ) लोभीलाल ? कागद ! नक्की ठरलेलें कोडिसील लांबविण्याची तजवीज दिसते.

बकिण.—( घोकीत ) बे बे बावसि लाख—त्यांतून उणे काय ? एक लक्ष एकशे एक, एक लक्ष एकशे एक, एक लक्ष एकशे एक. बस इतकें म्हटलें कीं लोभीलाल रामलालचा कागद देऊन टाकील.

परमे.—( मनांत ) हा वाणी गाभरट दिसतो. तेव्हां हातचलाखी वापरून त्याला पुढें जातांना अटकवावें आणि आपणच जाऊन त्याच्या नांवानें कागद मिळवावा. युक्तिबाज रामलालनें कोडिसिल मागविलें आहे हें नक्की. कोडिसील त्याच्या हातांत गेलें कीं माझा सत्यानाश.

( मोठ्यानें ) अरे ए ! तूं कोण ? (बीकणलालच्या खांद्यावर जोरानें हात ठेवून ) कोण आहेस तूं ?

बीकण–( खांद्यावर हात फिरवीत, केविलवाण्या तोंडानें ) तो तर मीSS

परमे.–मी म्हणजे कोण ?

बीकण अरे मी मी. ( मनांत ) खर्चीस आहे नुसता. अजून खांदा दुखतोय्. पण धैर्यानें वागावें. कमीपणा दाखवूं नये.

परमे –मी म्हणजे कोण ? आणि तूं काय करतोस ?

बीकण–मी म्हणजे मनुष्य, आणि मी येथें चालण्याचें काम करीत आहें. ( खांदे उंच करून व दोन पावलें मागें सरून ) डोळे पाह्यला दिले आहेत कीं खायला !

परमे.–जातो आहेस कुठें चालून ?

बीकण–मी धारलें आहे तिथें.

परमे.–असा जबाब नाहीं चालणार. ही माझी वज्रासारखी मुष्टी पाहिलीस ? तूं कोण आहेस ? कुठें जात आतेस ? कां जातोस ? हें सर्व मला तूं सांगितलेंच पाहिजेस.

बीकण.–मी मनुष्य आहे. ( मागें दाखवीत ) असा आलों, असा ( समोर हात करून ) जात आहें, आणि जिथें जात आहें तिथें जात आहें. फक्त माझ्याच कामाकरितां. यांत जरा देखील खोटें नाहीं.

परमे.–मला चौदावें रत्न दाखवावेंच लागणार.

बीकण.–काय म्हणून ?

परमे.—सरळ जबाब मिळत नाहीं म्हणून. पाहाच थोडेंसें ( दोन चार बुक्के मारतो )

बीकण.—अरेरेरे ! ( पाठीवर हात फिरवीत ) हा तर जुलूम होतो आहे.

परमे.—हें तर कांहींच नाहीं. मी अजून जोर वापरलाच नाहीं. बोल तूं कोण आहेत ? कुठें जातोस ? कां जातोस ? सांगायचें आहे कीं नाहीं ? तूं बीकणलाल आहेस

बीकण.— होय, मी बीकणलाल. माझे शेठ रामलाल यांनीं लोभीलालजवळून एक कागदाचें चिटोरें मागविलें आहे तें घेण्याकरितां मी मुंबईला जात आहें. त्यांत काय ? मी बीकणलाल आहे. मग त्याचें काय ?

परमेश्वर.—काय म्हणतोस ? माझें नांव आणि माझें काम लुबाडून घेतांना शरम नाहीं वाटली ? शरमतहि नाहींस आणि घाबरतहि नाहींस.

बीकण.—( मागें सरून ) मी कोणाचें नांव घेतलें नाहीं आणि कोणाचें कामहि घेतलें नाहीं.

परमे.—खरा भामटा दिसतोस. मी बीकणलाल स्वतः तुझ्या समोर उभा असतांना माझेंच नांव आणि माझेंच काम धारण करायला तुझी हिंमतच कशी होते ?

बीकण.-माझेंच नांव बीकणलाल आहे. माझी इच्छा असली तरी मला तें बदलतां येणार नाहीं, कारण गेल्या पंचवीस वर्षांपासून मला याच नांवानें हांक मार-

ण्यांत येत आहे. सराफकट्टयावर जरा जाऊन पाहा, लोक तुला बीकणलाल म्हणतात कीं मला ?

परमे.—मग तर मला तुला हात दाखविलाच पाहिजे. (मारतो)

बीकण.—धांवा हो धांवा. पोलीस. पोलीस. अहो देवतांनो, तुम्हीं कोणच्या देवळांत लपून बसल्या आहांत ? हा तर मला मारून टाकील.

परमे.—( जमिनीवर जोरामें लाठी आपटीत ) चुप कर, नादान चूप रहा. बोल, अजूनहि बीकणलाल तुलाच बनावयाचें आहे काय ?

बीकण—बीकणलाल तर आहेच बनण्याची तर गोष्टच नाहीं. मारल्यानें माझें नांव कांहीं थोडेंच बदलणार होतें ?

परमे.—अजून हवा आहे तुला ( मार देतो )

बीकण--मी काय करूं, माझ्या महेरबान. वस्तुस्थिति कांहीं बदलता येते ? माझें नांव मी कुठें टाकूं ?

परमे.—अजून तेंच ( भुईवर लाठी आपटतो ) बरोबर बोल.

बीकण--मी बीकणलाल होतों, पण मारामुळें अरेरेरेरे! मिळालेल्या मारामुळें मी आतां बीकणलाल नाहीं असें म्हणतों.

परमे.--अजून, होतों राहिलेंच ? ( धपाटे लगवितो )

बीकण. हा मार इतक्या जोरानें बसतो आहे कीं मला स्वतःलाच माझ्या नांवाविषयीं शंका येऊ लागली आहे. ( मनांत ) पण हें काय ? नांव बदलायचें ?

परमे.—बडबडतो आहेस काय ?

बीकण.—जरा मारत नसलास तर मला एक शंका आहे ती विचारतों.

परमे —काय ? लवकर बोल. नाहीं मारत.

बीकण.—काय खरोखरच; तकरारीकरितां नाहीं, पण खरंच मी बीकणलाल नाहीं ?

परमे.—( लाठी फिरवत ) पाहिलस हें ?

बीकण.—( मागे फिरून ) होय पाहिला आहे आणि चाखलाहि आहे. पण मार बसला म्हणून काय टाकून देऊं ? आणि तें टाकल्यावर माझें कसें होणार ? माझें **नांवच** गेल्यावर राहिलें काय ? **म्हणजे माझें नांव. आणि माझें नाव म्हणजे मी. काय जीवंतपणीं स्वतःला मेला असें मानूं** ? अरे हा ( दोन पावलें मागें सरून छाती ठोकीत ) हा पाहा रामलालचा गुमास्ता मी नाहीं का ? काय त्यानें मला मुंबईला नाहीं पाठिवलें ? कागद ज्याला आणायला सांगितला तो मीच नाहीं का ? हें सर्व मी, आणि हें सर्व बीकणलाल. मला आपला जाऊं दे. जाऊं दे भाऊ. फुकट कां त्रास देतोस ?

परमे —जातोस कुठें ? एक पाऊल सरकलास तर ह्या दंड्यानें तुझ्या पाठीवर घाव बसलास म्हणून समज.



परमेश्वर:—एक पाऊल सरकलास तर ह्या दंडयानें तुझ्या पाठीवर घाव बसलाच म्हणून समज. पान १९०.

बीकण.—मला मुंबईला जाण्याकरितां गाडीवर जावयाचें आहे.

परमे.—तुला जावयाचें आहे कीं मला ? मीच बीकणलाल आणि मीच रामलालचा गुमास्ता, लोभीलाल जवळून मलाच कागद आणावयाचा आहे.

बीकण.—( मनांत ) लोभीलाल ! हें नांव त्याला कसें कळलें ? खरोखर, मला वाटतें हाच बकिणलाल असावा; कारण बीकणलालावांचून दुसरा कोणी लोभीलालचें नांव जाणत नाहीं. चला, खरी गुपित गोष्ट विचारून खात्रीच करतो. ( प्रगट ) लोभीलालजवळ काय सांगावयाचें तें सांग पाहूं ?

परमे.—लोभीलालनें विचारलें "बे बे" ? तेव्हां सांगावयाचे "बावीस लाख" आणि विचारलें "त्यांतून किती उणे ?" तर सांगावयाचें "एक लक्ष एकशे एक" म्हणजे तो मला कागद देईल.

बीकण.—( मनांत ) खरंच, हाच बीकणलाल. असें नसेल तर माझी ही गोष्ट हा जाणणार कशी ? ( प्रगट ) तूं अशा गोष्टी सांगतोस कीं, तूं बीकणलाल आहेस असें मला म्हणावेंच लागते. पण मग मला शंका वाटते ती ही कीं **मी कोण ? काय मी बीकणलाल नाहीं ?**

परमे.—मी जेव्हां बीकणलाल हें नांव टाकेन तेव्हां तुला बीकणलाल व्हावयाचें असलें तर हो. पण तोंपर्यंत बीकणलाल म्हणून मिरवलास तर मेलाच म्हणून समज.

तोंपर्यंत बीकणलाल खेरीज जो कोणी असशील तो तूं ज्याप्रमाणें रुचि नाहीं ती अरुचि, सुख नाहीं तें असुख, त्याप्रमाणें तुला नांवच हवें असेल तर, मी जोंपर्यंम बीकणलाल आहे तोंपर्यंत तूं अबीकण-लाल म्हणून फीर.

बीकण--यांत मला तर कांहीं समजत नहीं पण असेल ! बरं बुवा, तूं बीकणलाल आणि मी अबीकणलाल. वाणीयाची मिशी खाली ( मनांत ) कदाचित् माझे न व धारण करून कारस्थान रचील. तरीहि मला त्यांत काय? काय बँकेंत थैल्या आहेत तर त्या नेणार आहे.

परमे.—जर मुंबईस गेलास तर मेलाच म्हणून समज.

बीकण-- ( मनांत ) मरण्यापेक्षां येथेंच ठीक आहे. शेठ रागावतील तर जवाब देईन. पण या दांडगेश्वराच्या हातचा मार नाहीं खाववत. (मोठ्यानें) बरें आहे.

( बीकणलाल जातो. )

परमे.—आतां मुंबईस जाऊन कोडिसील मिळविणें हें माझें पहिलें काम.

### प्रवेश तिसरा

## कोडिसील नापत्ता

स्थळ:—लोभीलाल शेठाचें घर. पात्रें:—लोभीलाल आणि परमेश्वरलाल.

लोभीलाल—आज त्या रामलालचा मनुष्य कोडिसील घ्यायला

यायला हवा. रामलाल स्वतः आले असते तर बरें झालें असतें. कोणत्याहि प्रकारचा दगा होण्याचा संभव राहिला नसता. पण असेल नवरा मरो की नवरी मरो पण भटाचें पोट भरो—या न्यायानें कांहीं अनिष्ट झालें तरी मला काय ? मला माझें एक लक्ष मिळालें कीं झालें. ( पडल्या पडल्या वर्तमानपत्र वाचतो )

परमे.-सलाम, शेठजी. लोभीलाल आपलें नांव काय ?

लोभी.-होय. तुमचें नांव ?

परमे -माझें नांव बीकणलाल. शेठजींनीं मागीतलेला तो कागद घ्यायला मी आलों आहें.

लोभी.—तुलाच रामलालनें पाठविलें ? बे बे किती सांग ?

परमे.—बावीस लाख.

लोभी.—त्यांतून उणे किती ?

परमे.—एक लक्ष एकशे एक.

लोभी.—बरें आहे. घे हा कागद. संभाळून घेऊन जा. (कोडिसील देतो. लोभीलाल घरांत जातो.)

परमे. ( सील फोडून कागद वाचतो ) हेंच, हेंच तें कोडिसील. यांत स्पष्ट लिहिलें आहे कीं " पूर्वीचें वील रद्द करीत आहें आणि माझी मिळकत परमेश्वरलाल यास देत आहें. " अरे ! अरे ! रामलाल, मला बीनवारस ठरविणारे वील नेहमीं पुढें करून या कोडिसीलची हकिकत तूं इतके दिवस कशी लपवून ठेव-

लीस ? काय तुझी लफंगेगिरी ? हें कोडिसील हस्तगत करून तूं तें फाडून टाकण्याचा विचारांत होतास काय ? आणि वीलांत तुला देऊं केलेली मिळकत पचविण्याचा तुझा विचार होता काय ? पण कांहीं हरकत नाहीं. आतां सर्व माझ्या हातांत आलें आहे.

प्रवेश चौथा

## बीकणलालावर विश्वासघाताचा सेशन्स खटला

स्थळः—सेशन्स कोर्ट

पात्रें:—बीकणलाल, जज्ज, पांच ज्यूरर, दोन वकील, शिरस्तेदार आणि रामलाल.

जज्जः—काय बीकणलाल, आतां तुला कांहीं सांगावयाचें आहे ?

बीकण.—मला मात्र एवढेंच सांगावयाचें आहे कीं, रामलाल शेठ ज्या कागदाला बावीसलाख कींमतीचा समजतात तो घेऊन जाणारा मी स्वतः नाहीं. कदाचित् बीकणलाल तो कागद घेऊन गेला असेल, पण तो हा बीकणलाल नाहीं, पण कोणी सामर्थ्यवान बीकणलाल आहे. तो मी नाहीं, पण जो मला, मी दुसरा कोणी असला पाहिजे, असें म्हणत होता तो. मी..मी तर अशक्य आहे. पण तो दुसरा **मी** फार जबर आहे. **मी मी** तर बोलतांना देखील घाबरतो, मायबाप. पण तो दुसरा **मी** मला मारीत असतांनाहि कांपत नव्हता. **बीकणलालनें** कागद

लांबविला असेल, पण तो या बाभरट बीकणलालनें नाहीं. लोभीलाल शेठ कागद दिल्यावर चारेक तासांनीं वारले हें माझें दुर्दैव होय. त्यांच्या वहींत **बीकणलाल** असें नांव निघतें खरें. पण तो मी नाहीं. माझें नांव लुबाडून घेणारा दुसरा कोणी तरी. हा मी ( छातीवर हात ठेवून ) म्हणजे **तुमच्या समोर प्रत्यक्ष उभा असलेला तो मी, म्हणजे डोक्यापासून पायापर्यंत तुम्हांला दिसणार मी,** (अभिनय करीत) या बाबतींत अगदीं निर्दोष आहे.

सरकारी वकील:—नामदार जज्ज आणि ज्युरींतील सद्गृहस्थांनो, आपल्यासमोर असलेला केस इतका सरळ आहे कीं मी फार लांबविणार नाहीं. रामलाल शेठ यानें एक किंमती कागद घेऊन येण्याचें काम या बीकणलालवर सोंपविलें. ती गोष्ट रामलालनें आपल्या जुबानींत तुमच्या समोर सांगितलीच आहे. लोभीलाल शेठ कागद दिल्यावर लागलीच मरण पावला-( जज्जाकडे बघत ) साहेब, परमेश्वरानेंच त्याला त्याच्या लोभाचा बदला दिला-म्हणून आम्हीं अगत्याचा पुरावा रुजू करूं शकलों नाहीं, पण लोभीलालच्या डायरींतून असें निघतें कीं, "रामलालच्या संकेताप्रमाणें वागणाऱ्या बीकणलालला आजरोजीं कोडिसील दिलें." हा लेख लोभीलालच्या स्वतःच्या हातचा आहे. म्हणून आमच्या

म्हणण्याला दुजोरा मिळत आहे. बीकणलाल यांस गुन्हेगार म्हणून जाहीर करण्याविषयीं मी आपणाला विनंती करतों.

बीकणलालचा वकील—नामदार जज्ज आणि ज्युरींतील सद्गृहस्थांनो, बीकणलालचें दुर्भाग्य कीं लोभीलाल मरून गेले आहेत. नाहीं तर लोभीलालनें स्वतः पाहून सांगितलें असतें कीं, कागद घेऊन जाणारा बीकणलाल हा कीं दुसरा कोणीं. आपल्या समोर उभा असलेला बीकणलाल म्हणतो कीं " कागद घेऊन जाणारा मीं नाहीं तर माझा नामधारी दुसरा कोणी तरी आहे. " आतां लोभीलालच्या डायरींतून फक्त इतकेंच निघतें कागद बीकणलाल घेऊन गेला. पण त्यामुळें कांहीं हाच बीकणलाल तो कागद घेऊन गेला, असें सिद्ध होत नाहीं. वाटेल तो मनुष्य वाटेल त्याचें नांव नाहीं का सांगूं शकणार ? डायरींत फक्त नांव आहे, पण ज्या नांवाचा मनुष्य कागद घेऊन गेला तो हा आपल्या समोर उभा असलेला बीकणलाल आहे असें कुठेंच शाबीत होत नाहीं. तें शाबीत करणें प्रॉसिक्युशनचें काम आहे. तें सिद्ध झालें नसल्यामुळें या बीकणलालला संशयाचा फायदा देण्याबद्दल मी आग्रहाची विनंती करतों.

जज्जः—ज्युरीच्या सद्गृहस्थांनो, तुमच्या समोर जो केस रुजू

झाला आहे त्याचा तपशील तुम्हांला माहीत आहेच. आरोप फार मोठा आहे. बीकणलालनें रामलालच्या अमुक एका कागदाच्या बाबतींत विश्वासघात केला आणि म्हणून इंडियन पीनल कोडच्या ४०९ कलमाप्रमाणें तो शिक्षेला पात्र ठरतो, असा त्याच्यावर आरोप आहे. पुराव्यांत रामलालची साक्ष आणि लोभीलालची डायरी दाखल झालीं आहेत. डायरींतून असें निघतें कीं, बीकणलाल कागद घेऊन गेला. पण तो बीकणलाल हाच कीं दुसरा कोणी, असें डायरीवरून सांगावें कीं नाहीं, याचा तुम्हाला विचार करावयाचा आहे. आरोपी असें म्हणतो कीं, बीकणलाल दुसरा कोणी तरी आहे. पण त्याच्या बोलण्यावर किती विश्वास ठेवावयाचा याचाहि तुम्हांलाच विचार करावयाचा आहे "**हा मी आणि तो मी,**" अशा विरुद्ध वचनांवरून आरोपी वेडा असल्याचा भास झाला तरी तसें मानून त्याला निर्दोष ठरविणें मी फारसें उचित मानत नाहीं कारण त्याच्या वकीलानें किंवा त्यानें असें कांहींहि सांगितलें नाहीं कीं त्यावरून आरोपी वेडा आहे असें सिद्ध होईल.

( कांहीं वेळ स्तब्ध राहून, नंतर आपापसांत बोलण्यांत पंच कांहीं वेळ घालवितात )

सरपंचः—साहेब, आम्हांला एकांत हवा आहे. आपापसांत मतभेद आहे.

जज्ज:—बाजूला जाऊन पाहिजें तें करा.

( पंच बाजूला जातात. )

सरपंच—मला वाटतें अपराध सिद्ध होत नाहीं. लोभीलालकडून बीकणलाल कागद घेऊन गेला असें डायरीवरून दिसतें. पण तो बीकणलाल म्हणजे हाच बीकणलाल असें शाबीत करण्यांत आलेलें नाहीं; म्हणून आपण त्याला निर्दोष ठरवावा.

दु. पंच—असें कसें सोडतां येईल ? सोडलें तर जज्ज साहेबांना आवडेल ?

ति. पंच—वाहवा, जज्जसाहेबांना आवडेल कीं नाहीं, त्याच्या फिकीरींत हे पडले आहेत. मिस्तर जरा, इंदिपेंदन्स तर राखा. छोडून द्या, आपणाला काय ?

चौ. पंच—सोडा. भाई, दया धर्मका मूल है. धर्मो भविष्यति सोडून द्या, बिचारा आशीर्वाद देईल. तोहि सुटेल आणि आपणहि या उरस्फोडींतून सुटूं. हा वकील सांगतो आहे तें खरें वाटतें, आणि तो वकील सांगतो तर त्याचेंहि खरें वाटतें. अशा अडचणींत दया दाखविली कीं, रस्ता सरळ.

पां. पंच—छोड दो छोड.

सरपंच—तें तर ठीक, पण युक्तिवाद तर करा. ( दुसऱ्या पंचाकडे बोट करीत ) म्हणजे यांची शंका दूर होईल.

दु. पंच—मला वाटतें हा भामटा आहे. त्याला सोडल्यानें

आम्हां व्यापाऱ्यांचा सत्यानाश होईल. गुमास्ते त्याचेच अनुकरण करतील.

सरपंच–परिणामाचा विचार आपण करावयाचा नाहीं आपण फक्त पुराव्याकडेच पाहावयाचें.

दु. पंच–पुराव्याबिराव्याचे आम्हांला नाहीं कांहीं समजत. तें सर्व इंग्रजी शिकलेल्यांना सोंपविलें आहे. सोडायचा असेल तर सोडा. माझा तरी तो शत्रु थोडाच आहे.

ति. पंच–सोडून द्या. सोडून द्या.

सरपंच–( मनांत ) हे सर्व अकलेचे खंदक दिसतात. पण पण एकमत होतात हें तरी ठीक म्हणावयाचें. ( मोठ्यानें ) मग काय निर्दोषच ना ?

दु. पंच–होय. असेंच.

ति. पंच–निर्दोष, निर्दोष.

( पंच कोर्टांत बसतात. )

शिरस्तेदार–काय, मग तुमचा काय निर्णय ठरला ?

सरपंच–हा बीकणलाल निर्दोष आहे असें आम्हीं एकमतानें ठरवीत आहोंत

जज–बीकणलाल, पंच सर्वानुमतें तुला निर्दोष ठरवीत आहेत, म्हणून मी तुला सोडून देतों.

बीकण.–मेहेरबान जज साहेब आणि ज्युरीच्या सद्गृहस्थांनो मला बोलावयाचा हक्क नाहीं, पण मी बोलतों. हा गरीब वाणी आज नाहक मारला गेला असतां. श्री.

सत्यनारायण देव तुमचे भलें करील. आजच संध्या-काळीं सत्यनारायण करवीन. दया असूं द्या, साहेबांनो. ( सर्व जातात. )

प्रवेश पांचवा

## रहस्याचा उलगडा

स्थळः–रामलालचें घर.–पात्रेंः–रामलाल आणि परमेश्वरलाल.

परमे –कसं काय ? रामलाल ! हेंच का तें कोडिसील ?

रामलाल–आश्चर्य आहे ! हो, तेंच. तर मग बीकणलाल कोण ?

परमे.–तो मी स्वतःच. मीच तो जबरदस्त बीकणलाल. कोडिसीलच्या आधारावर माझ्या पित्याची बावीस लाखांची मिळकत उपभोगणारा मीच आहे. तें वॅल निरुपयोगी आहे

रामलाल.–सत्यानाश.

परमे.–पुरेपुरा. एकदम हें घर, ही वाडी, ही सावकारी-इत्यादि सर्व सोडून येथून चालता हो. दुष्ट कुठचा ! नाहीं तर तुझ्या हातापायांत शृंखला टाकायला समर्थ ठरणारें तूं लोभीलालला लिहिलेलें हें पत्र ( पत्र दाखवितो ) त्याच्या मरणानंतर त्याच्या घरांतून मी मिळविलें आहे. ( पाय ठोकून ) एकदम चालता हो.

( रामलाल खालीं तोंड करून जातो. परमेश्वर घरांत जातो. )

४

# धंद्याची पसंती

पात्रें:—शेठ कमकल, डॉक्टर स्टेथेस्कोपवाले, बॅरिस्टर धमालसिंह, शिक्षक द्रव्यहीन, मर्चंट इंपोर्टएक्सपोर्टवाले, मि. सट्टेबाज नशीबवाले, फौजदार ऑर्डरवाले, आणि निपूणलाल.

प्रवेश पहिला

स्थळ:—शेठ कमकल यांचा दिवाणखाना.

शेठ कमकल:-भाई निपूण! "कचऱ्याच्या" विचारांत न् विचारांत हल्लीं मला रात्रीची झोंपहि येत नाहीं. त्याला धंद्याला लावून देण्याकरितां गेलीं चार पांच वर्षे खटपट करीत आहें. पण त्याच्या योग्य धंदा सांपडतहि नाहीं, आणि त्याला स्वतःला शोधायचा सुचत नाहीं.

निपूण:—एका वृद्ध बापाची वृद्ध होत असलेली काळजी मी बरोबर समजू शकतों. मी तर त्याला रोज सांगतों कीं, कंचनभाऊ, कंचनभाऊ, तूं एखादा धंदा शोधून काढलास तर ठीक होईल.

शेठ:--असा बहकलेला तरुण कांहीं मार्गाला लागणार आहे? कंचन? कंचन कीं कचरा? कचरा, कचरा, हजार वेळां कचरा. हेंच पाहाना, या बाबतींतहि मी तुला अनेक वेळां सांगितलें, पण तुला तुझ्या मित्राविषयीं जेवढें

वाटतें तेवढें या त्याच्या वृद्ध बापाविषयीं वाटत नाहीं.

निपूण:–त्याला मी काय करणार ? मित्र या नात्यानें मी त्याला सल्ला देतों, पण तो ऐकत नाहीं त्याला काय करणार ? तो तर असें म्हणतो कीं, या स्वातंत्र्याच्या युगांत वयांत आलेला मुलगा बापापासूनहि अगदीं स्वतंत्र असतो; तर मित्राची ती काय बिशात ? तो म्हणतो, कचरालाल या नांवाची मला लाज वाटते. हिंदुंच्या जंगली चालीप्रमाणें एका जंगली आत्याबाईनें एका जंगली वेळीं जंगली पद्धतीनें माझें नांव कचरालाल ठेवलें. तें कायम ठेवायला मी कांहीं थोडाच बांधला गलों आहे ? नाहींच, अलबत् नाहींच. माझ्या बापाचेंहि नांव माझ्या नांवापुढें शोभेल अशा तऱ्हेनें फिरविण्याकरितां देखील तेवढ्यापुरता मी मुखत्यार आहे. म्हणून आतां यापुढें कचरालाल कमकलच्या ऐवजीं कंचनकुमार कांतिलाल असें मी माझें व माझ्या बापाचें नांव जाहीर करीतों.

शेठ:–( आवेशानें ) हंSSS !

निपूण:--शेठजी जगाला काय ? कंचन नांव कांहीं मीं नाहीं ठेवलें. तो स्वत: तें वापरतो, म्हणून मीहि त्याच नांवाचा उपयोग करतो. ज्यास्तींत म्हणजे तुमचेंहि नांव त्यानें कमकलच्या ऐवजीं कांतिलाल ठेवलें आहे. यांत मी काय करणार !

शेठ:--निपूणभाऊ ! मी मेलों, मला कांहीं होतें आहे. या

बहकलेल्या युगांत बहकलेले तरुण स्वतःचें व स्वतःच्या बापाचें नांव बदलीत असलेले मीं माझ्या बहकलेल्या, शेफारलेल्या, बिघडलेल्या मुलाच्या बाबतींतच पाहिलें. निपुणभाऊ, तूं त्याचा परम मित्र आहेस. त्याला इतकें समजून सांग कीं, आज साठ वर्षे चालत आलेलें माझें कमक्कल हें नांव तरी बदलूं नकोस. त्याची समजूत घाल, कांहीं वाटेल तें कर, पण मला कमक्कलचा कमक्कल राहूं दे. मी तुझी विनंती करतों, तुझी आजीजी करतों, तुझ्यासमोर पागोटें उतरवितों—

निपूण:–हं, हं, हं, शेठ, मला लाजवूं नका, मी तुमचा दास आहे, पण—

शेठ:–पण नाहीं चालणार, त्याची समजूत घाल, जा बाबा.

निपूण:--समजूत घालीन, पण—

शेठ:--पण सोडून बोल. यानें तर मला दुनियेंत खाली तोंड घालावें लागेल. यानें आमच्या मागच्या व पुढच्या सर्व पिढ्यांना काळीमा लागेल.

निपूण:--( एकीकडे ) खरोखर, काळीमा लागत असेल. काय म्हातारा बकतो आहे. ( मोठ्यानें ) शेठ, मी त्याची समजूत घालीन, त्याला अटकविण्याचा प्रयत्न करेन, पण–

शेठ.--पण बीण नाहीं.

निपूण.--असें आहे कीं गोष्ट आतां त्याच्या हातांत नाहीं, पण —

शेठ.--पण बाणि कांहीं नाहीं.

निपूण.--घरांतच त्यानें नांव बदललें आहे असें नाहीं, पण —

शेठ.--मित्रांत बदललें असलें म्हणून काय ?

निपूण.--अहो ! मित्रांतच फक्त नाहीं, पण—

शेठ --तें कांहींहि असो पण ही गोष्ट ठीक नाहीं.

निपूण.--तें मला कबुल आहे, पण—

शेठ.--पण पण पण पण काय लावलें आहे ? पण सोडून बोल.

निपूण.--बोलेन, पण बोलून काय होणार ?

शेठ --आहे काय तें मोठें महाभारतासारखें काम ! न व्हायला काय झालें.

निपूण.--त्यांत असें आहे कीं त्यानें जाहीर रीतीनें आपले नांव बदललें आहे. म्हणून आतां कांहीं होईल असें नाहीं. पाहा. वाचा हें. ( खिशांतून क्रॉनिकल काढून देतो )

शेठ.--( अडखळत अडखळत वाचतात )

No...No...No...Noti...Noti...Notice.................. Notice is hereby given that I, Kacharalal, feeling ashamed of being recognised by that wretched name, do from today assume the name of Kanchankumar instead, and feeling equally ashamed of being known as the son of Sheth Kamakkal (i. e. No Intelligence ), do from to-day revise, reform, and convert my father's name into Sheth Kantilal, so that from to-day I will

be known as Kanchankumar Kantilal ( i. e. Gold like Prince, Beauty boy ), and if anybody addresses me as Kacharalal Kamakkal ( i. e. Dirt Boy, No Intelligence), I will take it to be an insult, may, I will deem it highly defamatory, and even have him or her, as the case my be, either civilly or criminally or in both ways, punished for his or her conduct. In this age of progress, liberty and reform, I belive, I will be setting a very nice example by thus revising, reforming and converting not only my name but my father's name as well, for I am sure many young men must be grumbling and boiling and feeling ashamed of being known as son of fathers whose names are an index of stupidity or worthlessness ( as in Kamakkal or Mafatlal i. e. No intelligence or Cheap–Boy ) and nothingness or mischievousness ( as in Amthalal or Gadbaddas, i. e. Trifle Boy or Mischief–servant ) or dirt or mendicancy ( as in Punjabhai or Bhikabhai i. e. Dirt–Brother or Mendicancy Brother ), or bird, or beast or plant nature (as in Popatbhai or Vaghajibhai or Marghabhai or Tulsibhai, i, e., Parrot–Brother or Tiger–Brother, or Cock–Brother or Tulsi–Plant Brother ), and so on, and so on, as stupidity might permit. May it be known that this is done with full Consciousness and with a determined mind, this first day of the month of January 1919.

शेठ–अफसोस, अफसोस, इतके दिवस बाप मुलाचें नांव ठेवीत असे! आतां मुलें आपल्या बापाचें नांव ठेवतात;

स्वतंत्रता आणि सुधारणेच्या नांवानें अफसोस, अफसोस.

निपूण--शेठ ती गोष्ट जाऊं द्या. त्यांत फुकट जीवाला त्रास होणार. आतां आज आपण कंचन कारितां कोणता धंदा उत्तम तें नक्की करावयाचें ठरविलें होतें, त्याचें मग काय झालें ?

शेठ--मी माझे मित्र डॉक्टर स्टेथेस्कोपवाले, बॅरिस्टर धमालसिंह, शिक्षक द्रव्यहीन, मर्चंट इंपोर्टवाले, मि. सट्टाशूर नशीबवाले आणि फौजदार ऑर्डरवाले यांना पत्रें लिहिलीं आहेत; आणि ते सर्व इतक्यांत येतील. पाहा कोणी आले. ( बॅरिस्टर धमालसिंह आणि शिक्षक द्रव्यहीन प्रवेश करतात. )

बॅरिस्टर--गुड मॉर्निंग, मि. कमकल ( जोरानें आणि दमांत शेक हँड करतो. शेठजी उभे असतात, ते अर्धवसले होतात. )

शेठ--बसा, मि. धमालसिंह, या, शिक्षक द्रव्यहीन.

बॅरिस्टर--पत्र वाचून मला फार वाईट वाटलें. तुमचा कचरा

निपूण--मि. धमालसिंह, त्यानें आपल नांव कंचन कुमार असें बदललें आहे.

शेठ--चुलींत जावो तो आणि त्याच्याबरोबर त्याचें नांव. त्यानें स्वतःचें नांव बदललें तें एक असो, पण माझेंहि नांव बदललें त्यानें, बॅरिस्टर साहेब ! माझ्या लाडावलेल्या मुलानें क्रॉनिकलमध्यें जाहीर केलें आहे कीं, माझें आणि माझ्या बापाचें नांव कचरा कमकलच्या ऐवजीं

वं चनकुमार कांतिलाल असें या पुढें ओळखलें जाईल. धमाल, माझ्या लाडक्या धमाल, एखादा कायदा दाखीव, एखादा कायदा. माझें नांव तो अशा तऱ्हेनें बदलू शकतो काय ? इंजंक्शन देवीव, बाबा इंजंक्शन.

बॅरिस्टर -( एकीकडे ) There is no Law civil or Criminal, Indian or European, national or international, which can prevent a man from changing his father's name. The old fool has lost his common sense. He cannot control his son. How can the law do so ( मोठ्यानें ) नाहींच. बेलाशक नाहींच. त्याचें वर्तन अगदीं कायद्याविरुद्ध आहे.

शेठ--शाबास माझ्या मित्रा ! आतां मी जिवंत राहूं शकीन. चिंरजीवांना कायद्यानें वश करतां येईल. चला तर, करा इंजंक्शनाची तयारी.

बॅरिस्टर--आनंदानें. पैशाबरोबर करा माझ्या खिशाचें जंक्शन म्हणजे देवबितो तुम्हांला इंजंक्शन. काय समजलांत ? या बाबतींत माझा सल्ला एका मित्राचा फुकट सल्ला न मोजतां. एका प्रख्यात बॅरिस्टराचा महाग सल्ला मोजला पाहिजे. फी पडेल, आणि तीहि पुष्कळ. कोर्टांत नेऊं आपण केस. Kam-akkal vs. Kacharalal. अशा कामांकरितां सेवक नेहमीं तयार आहे.

शिक्षक--ही गोष्ट आपणाला कांहीं बरी नाहीं वाटत. बापा-

विरुद्ध मुलगा, असा दावा लढला जाणें ठीक नाहीं वाटत.

( मर्चंट इंपोर्ट एक्सपोर्टवाले, सट्टेबाज नशीबवाले, आणि फौजदार ऑर्डरवाले प्रवेश करतात. )

शेठ - नमस्कार, मित्रांनों ! सर्व बरे वेळेवर आलांत. सर्व साहेब खुशींत आहेत ना ?

१ मर्चंट } ( तिघे बरोबर ) १ थँक यु.
२ सट्टेबाज } ( तिघे बरोबर ) २ होय शेठजी.
३ फौजदार } ( तिघे बरोबर ) ३ अलबत्

शेठ—माझ्या कचऱ्याला कुठल्या लाइनींत टाकावा या विषयीं आपला सर्वांचा सल्ला घेण्याकरितां ही तस्दी मीं आपणाला दिली आहे, तें आपण जाणतच आहांत.

बॅरिस्टर
डॉक्टर } ( तिघे बरोबर ) असें कीं उत्तम धंदा—
शिक्षक

शेठ--उत्तमांत उत्तम धंदा कोणता ?

बॅरिस्टर
डॉक्टर } (तिघे बरोबर) असें कीं उत्तमांत उत्तम धंदा -
शिक्षक

शेठ—मित्रानों, जरा एकामागून एक बोललांत तर उपकार होतील.

१ बॅरिस्टर } ( तिघे बरोबर ) १ बॅरिस्टरचा.
२ डॉक्टर } ( तिघे बरोबर ) २ डॉक्टरचा.
३ शिक्षक } ( तिघे बरोबर ) ३ शिक्षकाचा.

शेठ--आपल्यांपैकीं प्रत्येक स्वतःच्या धंद्याला उत्तमांत उत्तम समजतां, हें ठीक आहे, पण —

बॅरिस्टर--( शिक्षकासमोर ) शिक्षक ! पंतोजी ! भिकारी ! मि. द्रव्यहीन, तुमचें काम उत्तम तर खरें, पण जरा खिशाकडे नजर ठेवून मग अभिप्राय द्या. ( शिक्षकाच्या खिशांत हात घालून पाकीट काढतो, आणि तें रिकामें आहे असें दाखवितो. )

शिक्षक--शिक्षक श्रीमंत बनतो असें मी कुठें म्हणतों ? पण उत्तम धंद्याची गोष्ट करीत असाल तर तो शिक्षकाचाच होय.

डॉक्टर--मग काय मरणाच्या पंथाला लागलेल्या लोकांना वांचविणें हें उत्तम नाहीं ? एक वेळां आजारी पडा आणि पाहा आम्ही आमचें महत्त्व पटवून द्यायला किती समर्थ असतों तें.

बॅरिस्टर--मरणाऱ्याला कोण वाचवूं शकतो ? आहे कोणी असा डॉक्टर जो मरणाऱ्याला जीवंत राखूं शकेल ? बॅरिस्टर हुशार असेल तर तो खरेंच मरणाऱ्याला जिववूं शकेल. फांशी सारखी शिक्षा देखील फिरवूं शकणारी शक्ति ती आमची शक्ति आहे. अशा तऱ्हेनें मरणाऱ्याला जीवंत ठेवणारी शक्ति ती आमची शक्ति आहे.

शिक्षक--ईश्वरासमोर गुन्हेगार बनविण्याची शक्ति ती तुमची शक्ति, पांढऱ्याचें काळें आणि काळ्याचें पांढरें

करण्याची शक्ति ती तुमची शक्ति, खोटें तें खरें दाखविण्याची शक्ति ती तुमची शक्ति.

बॅरिस्टरः—अरे, आमच्यावांचून सिद्धीच कुठें आहे ? एखादें सुधारणेचें मंडळ असलें तरी तिथें आमची जरूरी पडते. एखादें राजकीय मंडळ असलें तरी तिथें आमची जरूरी भासते. एखादी कंपनी उभारावयाची असली तरी आमची जरूरी लागते. एखादें शिक्षणप्रसारक मंडळ चालवावयाचें असलें तरी आमच्यावांचून अडतें. समाजाच्या सर्व प्रकारच्या चळवळींत आमची गणपतीपूजा तर खरीच. सर्व ठिकाणींच आमचें पाऊल पुढें.

शिक्षक.—नफ्फट माणसांनीं पुढें पुढें केल्यानें कांहीं त्यांची लायकी सिद्ध होत नाहीं. देशाचा नाश तर आमच्यावांचून होईल. आमच्या सहवासांत येणारे आम्हांला आशीर्वाद देतात, तर तुमच्या सहवासांत येणारे लोक तुमच्या मागें शिव्या देतात. आम्हीं आमच्या विद्यार्थ्यांना आमचें उत्तम आत्मतत्त्व **देतों**, तर तुम्हीं आपल्या अशीलांकडून जें मिळेल तें **घेतां**; आम्हीं **देण्यांत** राजी असतों तर तुम्हीं **घेण्यांत** राजी असतां. आतां सांगा उत्तम कोण ? उमदा कोण ? ज्या देशांत उत्तम डॉक्टर किंवा वकील असतात तो देश सुखी नसतो, तर ज्या देशांत उत्तम शिक्षक असतात तो.

मर्चंट.--मास्तर, वाहवा ! खूप केलीत. सुखी तर तो देश कीं ज्यांत पैसा रेलचेल असतो. माझ्या मित्रांनो, व्यापाराशिवाय सर्व उपाशी मरतील. धंदा फक्त व्यापाऱ्यांचाच उत्तम समजा.

सट्टेबाज.--पण तो तुम्ही करतां तसा व्यापार नाहीं, हं. खूप मेहनत करावी लागणारा व्यापार नाहीं, तर आम्हीं करतों तसा मोठा व्यापार. बस् ' दिले; ' आणि ' घेतले; ' समजलांत ? संध्याकाळ झाली कीं खिशे तर्रर्र. बस्, उडवा सट्टेबाजी. समजलांत ?

मर्चंट.--सट्टेबाजीनें कोण यशस्वी झाला आहे ? सट्टा हंसवितो आणि सट्टाच रडवितो.

बॅरिस्टर.--छट् ! असले बायकी विचार मला संमत नाहींत सट्टा हा आबाद धंदा आहे. सट्टेबाजींत पाहतां पाहतां मुंबईतील वकील, बॅरिस्टर, व दुसरे किती तरी श्रीमंत होऊन बसले आहेत.

मर्चंट.--तें खरें पण—

सट्टेबाज.—पण काय ? मेहनतीवांचून कमविलें तर तें खरें. मेहनत करून तर मीलचा मजूरहि कमवितो, समजलांत ?

शिक्षक.- पण त्यांत ईश्वर राजी नसतो. निढळाच्या घामाचा पैसा चांगला.

सट्टेबाज.--म्हणूनच तुम्ही पंतोजी दरिद्री राहिलां आहांत समजलांत ? ईश्वर राजी आहे कीं नाहीं हें पाहण्याचा

एकच मार्ग आहे. समजलांत ? पहा हें वर्षफळ, ही पत्रिका, हें टिप्पण, आणि त्या बरोबर ज्योतिषी महाराजांचा अभिप्राय. हीच मोठ्यांत मोठी गाष्ट आहे. समजलांत ? (खिशांतून कागद काढून दाखवितो.)

फौजदार--पण पैसा आणि नशिबानें काय होणार ? पैसा आणि नशीब हीं दोन्हीं सत्तेचीं शेपुटें आहेत. सत्तेनें दोन्हीं मिळवितां येतात. शेट, कचऱ्याला पोलिस-फोर्समध्यें दाखल करा. पाहा मग तिथें तो कसा वाढतो तो.

सट्टेबाज.--शेठ, जन्माच्या सत्यानाशापेक्षां दुसरें कांहींहि होणार नाहीं तिथें, समजलांत ?

फौजदार--हें पाहा वाटेल त्याच्यावर हुकूम सोडतां येतो, वाटेल त्याच्याकडून पैसा मिळवितां येतो, वाटेल त्याची अब्रू घेतां येते, आम्हीं मनांत आणलें तर हुकूम, सत्ता, ऐट, पैसा—आम्हांला सर्व सहज मिळतें.

सट्टेबाज.--पैसा लांच खाऊन मिळवाल तेव्हां. पगारांत उत्पन्न नाहीं होणार, समजलांत ? ऐट तर खोटी सत्ता वापराल तेव्हां, खऱ्या रीतीनें तर मारतां नाहीं येणार, समजलांत ? सत्ता तर नियमांत ठेवायला पाहिजे. विचार केल्यावांचून वापरली तर मेलाच समजा, समजलांत ? हें सर्व ठीक तर सट्ट्यांनींच

मिळतें, समजलांत ? पोलिस बॅरिस्टर, डॉक्टर, सर्व आम्हांला नमून असतात; साहेब-साहेब करूं लागतात. समजलांत. म्हणून उडवा सट्टेबाजी. सट्टेबाजीच खरी, बाकी सर्व खोटें.

शेठ--सट्टेबाजीनें फार लाकांचें नुकसान होतें, त्याचें काय ?

निपूण--माझें मतहि शेठजींच्या मताप्रमाणें आहे. पालणजी शेठांनीं कमविलें आणि दुल्लभशहांनीं कमविलें आणि शेखअल्लीनें कमाविलें आणि हिरालालनें कमविलें यांत काय ? पण फिरोजशाहा फसले गेले आणि मरघालाल मरून गेले, चंपी म्हातारी चपकून उठली आणि जीवकोर जखडून गेली, फीदाअल्ली फसले आणि हकीमजींना श्वास लागला, आशालालनें आत्महत्या केली, आणि ईश्वरलालनें अब्रू घालविली. या सर्वांचें काय ? दोन चार इसमांनीं कमविलें असेल, पण हजार बाराशें मंडळींना रडावें लागलें त्याचें काय ?

मर्चंट. म्हणूनच मी म्हणतों आपला सरळ व्यापार चांगला.

शिक्षक.--म्हणूनच मी म्हणतों निढळाच्या घामाचा पैसा कामाचा. शिक्षकाचा धंधा वंदा. त्या धंद्यांत नियमित आयुष्य, नियमित द्रव्यप्राप्ति, नियमित —

सट्टेबाज--नियमित दरिद्रता समजलांत ?

शिक्षक--" समजलांत " " समजलांत ", काय ? काय मूर्ख आहोंत काय कीं सारखे "सजमळांत," "समजलांत"

सांगत आहांत ?

शेठ-मित्रांनो, अशा चर्चेचा कंटाळा आला. आपण मला कोणता धंदा उत्तम, तें थोडक्यांत सांगा.

बॅरिस्टर, डॉक्टर, सट्टेबाज, शिक्षक, मर्चंट, फौजदार:—( एकदम ) माझा.

शेठ—मित्रांनो, जरा हळु.

बॅरिस्टर.—( शिक्षकाला उद्देशून ) एका साधारण पंतोजीची दुनियेंत काय किंमत ?

शिक्षक.—माझा अपमान ? ( बॅरिस्टरच्या थोबाडींत देतो )

बॅरिस्टर.—( शिक्षकाचा गळा दाबीत ) अरे भिकारड्या, कायदा काय म्हणतो तें आतां पाहा.

फौजदार.—कायदा असें म्हणतो कीं, दोघेहि गुन्हेगार आहांत. तुमच्या दोघांची अब्रू आतां माझ्या हातांत आहे, माझ्या.

शेठ.-मित्रानो, माझ्या घरांत ही धांदल नको. आपण आपापल्या घरीं जाण्याचें करावें.

डॉक्टर.—पण धंधा तर माझाच उत्तम. पाहा, हे दोघे आतां माझ्या दवाखान्यांत येतील.

सट्टेबाज.—तर काय, माझें बोलणें वायां जाईल ? शेठ कचऱ्याला शेरबाजारांत पाठवा, समजलांत ? शेरदलाल बनवा, समजलांत ?

मर्चंट.—शेठ, मीं सांगितलें तें,

डॉक्टर.—नाहीं शेठ, मीं सांगितलें तें,

बॅरिस्टर.—मिस्टर शेठ, मीं सांगितलेलें,

शिक्षक–अहो शेठजी, मीं सांगितलेलें,

फौजदार.-शेठ, मीं सांगितलेलें.

शेठ. मित्रांनो या आतां. मी सर्वांनीं सांगितल्याप्रमाणें करीन. आणि मुलाला पहिल्या वर्षी डॉक्टर, दुसऱ्या वर्षी बॅरिस्टर, तिसऱ्या वर्षी शिक्षक, चवथ्या वर्षी पोलीस इन्स्पेक्टर, पांचव्या वर्षी इंपोर्टएक्सपोर्टवाला, आणि शेवटल्या तडाक्याला सट्टेबाज. यावेत, माझ्या मित्रांनो, यावेत. जास्त वेळ थांबलांत तर भांडण होऊन माझ्या फर्नीचरचें नुकसान होईल अशी मला भीति वाटते. बरें आहे, या, माझ्या मित्रानो

सट्टेबाज.–येतों, समजलांत? नमस्कार, समजलांत! नमस्कार, डॉक्टर स्टेथेस्कोपवाले, समजलांत? साहेबजी, मि. ऑर्डरवाले, समजलांत? नमस्कार, मित्रांनो, समजलांत? ( जातो )

शेठ.–नमस्कार, मित्रांनो. ( सर्व जातात )

शेठ.–चिरंजीवांना ठराव पाठवून देतों. पाहतों त्याप्रमाणें वागतात कीं नाहीं. नाहींतर कायदा आहेच. बॅरिस्टर साहेब हो म्हणालेच आहेत, इंजंक्शन देवविण्याचें.

## प्रवेश दुसरा

स्थळ:—कंचनकुमाराचा ड्रॉईंग हॉल.

कंचन.–हॅलो! निपूण my friend! What has that council of fools decided?

निपूण.—असें नक्की करण्यांत आलें आहे कीं, तूं एक वर्ष डॉक्टर व्हावेस, एक वर्ष बॅरिस्टर, एक वर्ष शिक्षक, एक वर्ष पोलिस इन्स्पेक्टर, एक वर्ष इंपोर्टएक्स्पोर्ट-वाला, आणि एक वर्ष सट्टेबाज. अशा तऱ्हेनें पाळी-पाळीनें तूं धंद्यांत प्रविण व्हावेस आणि धंदाप्रदक्षिणा पुरी करावी.

कंचन.—म्हाताऱ्या कुजक्या मेंदूला दुसरें काय सुचणार ? Diseased brain, diseased brain. म्हाताऱ्याला क्लॉनिकल दाखविलें का ?

निपूण.—दाखविलें.

कंचन.—टेंपरेचर किती डिग्री चढलें ?

निपूण.—मित्रा, तूं चुकतोस. तूं तुझें नांव बदललें हें ठीक, पण तुझ्या बापाचें नांव बदललेस यांत उद्धटपणाची परिसीमा झाली.

कंचन.—उद्धटपणाची ? छे ! छे ! ती तर स्वतंत्रतेची परि-समाप्ति, परिपूर्णतेची परिसीमा, काय समजलांस ? परिपूर्णतेची परिसीमा.

निपूण.—सुधारणा कीं कुधारणा ?

कंचन.—सुधारणेची सर्वांगीण श्रेष्ठता.

निपूण.—मूर्खपणा.

कंचन.—प्रगति.

निपूण.—अज्ञान.

कंचन.—प्रकृष्ट ज्ञान.

निपूण.- बापाचा अपमान.

कंचन.--बुद्धीचा सन्मान.

निपूण. जगांत निंद्य.

कंचन.--मनांत वंद्य.

निपूण --You are a hoapless chap.

कंचन.- And yon a timid goose.

निपूण.--बस, बस, पुरे, पुरे. उपकार होतील. पण धंदा पसंत करण्याचे काय ठरलें ?

कंचन --मीं तर केव्हांच पसंत करून ठेवला आहे.

निपूण.--काय, व्यापार करणार ?

कंचन. -नाहीं, व्यापारावांचून श्रीमंत व्हावयाचें आहे.

निपूण --काय सट्टा करणार ?

कंचन - नाहीं. सट्टा नाहीं, पण एका दृष्टीनें आहे. सट्टयांतील नुकसान त्यांत नाहीं असा सट्टा करावयाचा आहे. नशीबाचा डाव साधल्याचा तो सट्टा आहे.

निपूण.--काय ? बॅरिस्टरीचा धंधा ?

कंचन.--नाहीं, त्याहिपेक्षां ज्यास्त मेंदूला त्रास, त्याहिपेक्षां ज्यास्त वादविवाद, त्याहिपेक्षां ज्यास्त उमदेपणा ज्यांत आहे असा धंदा मी मनांत योजिला आहे.

निपूण. -काय तो डॉक्टरचा धंदा का ?

कंचन. नाहीं त्याहिपेक्षां उमदा. ज्यांत खोल रुजलेल्या रोगाचें औषध करावें लागतें असा तो धंदा आहे. ज्यांत खरा उपकार केला जातो. असा तो धंदा आहे.

निपूण.- काय आहे तो धंधा ?

कंचन.—सांगूंच ? सांगूंच का ? हें पाहा, तो धंदा असा आहे कीं त्यांत कोणत्याहि प्रकारचे श्रम करावे लागत नाहींत, कोणत्याहि प्रकारची काळजी नाहीं, कोणत्याहि प्रकारचा तोटा नाहीं. त्या धंद्यांत जगत्‌मात्राचें हित आहे, आणि सारें जग त्याला स्वीकारतें. मात्र एवढेंच कीं हा धंदा सर्वांना युक्तीनें करतां येत नाहीं. आणि म्हणून विनाकारण दुसऱ्या धंद्याच्या दावणींत पुष्कळांना स्वतःला अडकवून घ्यावें लागतें.

निपूण.- पण तो कोणता धदा ?

कंचन.—तो जो आहे तो आहे, पण आहे अत्यंत श्रेष्ठ प्रतीचा. उत्तमांत उत्तम. उपकारकांत उपकारक.

निपूण.- त्यांत स्वातंत्र्य तर असेलच. तूं स्वातंत्र्याचा तर खास भक्त आहेस.

कंचन.- अर्थात्, त्यांत स्वातंत्र्य आहे, पण तें थोडेंसें घालवावें लागतें. त्यांत साऱ्या दुनिनेकडे बेपर्वाईनें पाहिलें तरी चालतें, फक्त एका दिशेंत परतंत्रता सहन करावी लागते.

निपूण.--पण तो आहे कोणता, हें सांगशील तर खरा.

कंचन.--सांगू ? काय सांगूच ? हें पाहा, तो धंधा मी असा ठरविला आहे कीं,

**एकच्या एक व श्रीमंतांत श्रीमंत अशा एखाद्या**

**म्हाताऱ्या बापाच्या एकुलत्या एक मुलीबरोबर मी लग्न करावें.**

ऐक; बरोबर ऐक. ( पुनः तेंच बोलतो )

निपूण.--My Lord ! बाकी सर्व ठीक, पण ' एकच्या एक बापाची' म्हणजे काय ? बाप तर एकच असतो ना ?

कंचन.-ऐक माझें म्हणणें असें कीं ती मुलगी अशी असावी कीं मागें पुढें तिला बापावांचून कोणी नसावें. तिचा बाप गेला, माझा भावी सासरा गेला, कीं राजेश्रींचा सारा पैसा—ओहो ! कसा जसा कांहीं माझ्या डोळ्यासमोर त्याचा ढंग मला दिसतो.

निपूण.--हा तर कांहीं धंदा !

कंचन.-हांय, धंदा. यांत यश मिळालें कीं, गंगेंत घोडे न्हाले.

निपूण -बरे आहे मी म्हातारबाबांना तुझा विचार कळवितों. ( जातो )

कंचन.--Radical reform ! Radical reform ! Reform radical ! Reform every where ! प्रत्येक बाबतींत सुधारणा करण्याची जरूरी आहे.